जैनवाङ्मयकुसुममाला पुष्प ७ वें.

# श्रीमहावीरचरित्र

प्रसिद्ध मिति
मार्ग. शु. ५
वीर सं. २४७७

किंमत १।। रु.

लेखक
अज्ञात.

# प्रस्तावना.

श्री. अज्ञात उर्फ मोतीलाल गांधी यांनीं प्रस्तुत 'श्री महावीर चरित्र' लिहून जैनधर्मानुयायींच नव्हे तर सर्व मराठी वाचकांवर उपकार केले आहेत, असे हें पुस्तक वाचणाऱ्यांस वाटल्यावाचून राहणार नाहीं. सामान्य वाचकांपैकींच पण त्यांच्याहून कांहीं गुणांनीं श्रेष्ठ अशा पुरुषाचें चरित्र वाचकांना एका दृष्टीनें जास्त मनोरंजक वाटण्याचा संभव आहे. कारण अशा चरित्रांत साधारण माणसाच्या अनुभवाच्या गोष्टींचाच मुख्यतः समावेश होतो व अशा सर्वसाधारण प्रसंगीं आपल्याहून कांहीं अंशीं थोर असणाऱ्या चरित्रनायकानें काय केलें हें जाणण्याची उत्कंठा वाटते. शेंकडो जन्मांत ज्यांनीं आत्मोन्नतीची पूर्वतयारी अलौकिक प्रमाणांत केली असल्यामुळें चरित्र विषयभूत आयुःक्रमांत ज्यांचें जीवन सामान्य दृष्टीनें अतिशय चमत्कृतिपूर्ण झालेलें असतें त्यांचें चरित्र अशा वाचकांना, कीं ज्यांना स्वतःच्या व चरित्रनायकाच्या जीवनांत कांहींतरी साम्य पाहण्याची इच्छा असते त्यांना, आकर्षक वाटणें कठीण आहे. परंतु अशा मुक्तात्म्यांचीं चरित्रें निराळ्याच भावनेनें वाचलीं पाहिजेत. आपल्या आकुंचित जीवनांत येणारे लहानसान अनुभव, छोट्यामोठ्या पण सांसारिक अडचणी व त्यांतून पार पडण्याचे सांसारिक मार्ग श्रीमहावीरस्वामींच्या चरित्रांत आढळणार नाहींत. परंतु अशा गोष्टींकरितां त्यांचे चरित्राकडे जाणें हेंच चुकीचें आहे. फुटक्या शिंपल्या गोळा करण्यासाठीं समुद्राच्या तळाला जाणें मूर्खपणाचें आहे. त्या पाहिजे असल्यातर गांवोगांवचे उथळ ओढे काय कमी आहेत ? परंतु ज्यांना असल्या शिंपल्याऐवजीं बिनमोल मोतीं हवीं असतील त्यांनीं महासागरांत बुडी मारावी व तेथेंच त्यांच्या प्रयत्नाला यशहि येण्यासारखें असतें. ज्या दुःखपरिणामी सुखाच्या आशेनें प्रत्येक जीव अगणित वर्षें धडपडत आहे व इतकें करूनहि जी आशा कधीं तृप्तच होत नाहीं त्या आशेनें केल्या जाणाऱ्या विफल धडपडींतून आत्म्याची कायमची सुटका व्हावी व शाश्वत आनंद प्राप्त व्हावा अशी इच्छा ज्यांच्या अंतःकरणांत जागृत झाली असेल त्यांना या चरित्रांत मार्गदर्शक प्रकाश मिळेल. श्रीमहावीरचरित्र तें कोणीहि लिहिलेलें असो, हा एक धर्मग्रंथ आहे याच दृष्टीनें हें चरित्र हातीं घेतलें पाहिजे व त्या दृष्टीनें हें पुस्तक वाचणाऱ्यांना पुष्कळच फायदा होईल यांत शंका नाहीं.

या पुस्तकांतलि कांहीं भाग साधारण माणसाला असंभवनीय वाटतील व श्रद्धायुक्त वाचकांनाच अशा कथा आवडतील. पण हा भाग या चारित्रांतील महत्त्वाचा भाग नव्हे. तर महावीरस्वामींच्या कालांतील धर्मांची अवनति आणि ती दूर करण्यासाठीं त्यांनीं जीं तत्वें प्रतिपादन केलीं तीं तत्वें, यांचा अभ्यास करण्यास हें पुस्तक उपयोगी आहे, याच गोष्टींत या पुस्तकाचें महत्त्व आहे. रा. गांधी यांनीं हें पुस्तक लिहितांना अशा जिज्ञासूंना शक्य तेवढी मदत करण्याचा हेतु आपल्या मनांत सदोदित ठेविला असावा असें स्पष्ट दिसतें. माझ्यामतें, हा हेतु त्यांनीं पुष्कळ अंशानें साध्यहि केला आहे. महावीरस्वामींचें चरित्र म्हणजे जैनधर्माचें प्रतिपादन. स्वामींच्या जन्मापासून निदान ते दीक्षा घेईपर्यंत, किंबहुना त्यांना केवलज्ञान प्राप्त होईपर्यंत, मनुष्यजन्मांत साधारणपणें येणारे अनेक अनुभव त्यांना आले असतील आणि त्यांच्या अनुभवाच्या अशा गोष्टी जर कोणी लिहून ठेविल्या असत्या तर त्या मनोरंजकच नव्हे तर बोधप्रदहि झाल्या असत्या. परंतु अशा गोष्टींना महावीरस्वामींनीं अथवा त्यांच्या शिष्यांनीं महत्त्व दिलें नाहीं. कारण जैनसिद्धांताचें पुनरुज्जीवन करण्याच्या त्यांच्या कार्याच्या मानानें, त्यांच्या लौकिकजीवनांतील लहानसान गोष्टी कांहींच नव्हत्या. त्यांचें जीवन म्हणजे जैनधर्माची प्रभावना त्यापलीकडे कांहीं नाहीं किंवा त्यापलीकडे कांहीं असणेंच शक्य नाहीं, अशा भावनेनें आजवर सर्वांनीं त्यांच्या जीवनाबद्दल विचार केला आहे. अर्थात्च या चरित्रांत जैनधर्माच्या सिद्धांतांचें संक्षिप्त विवरण हाच मुख्य हेतु असावा हे स्वाभाविक आहे.

असें असलें तरी, वीरचरित्राभोंवतीं कालाच्या प्रभावानें जमलेलें अनैतिहासिक धुकें नाहींसे करून, ऐतिहासिक दृष्टीनें खऱ्या ठरण्यासारख्या गोष्टी निश्चित करण्याचा रा. गांधी यांनीं प्रयत्न केला असून त्याचा उपयोग वाचकांना चांगला होण्यासारखा आहे. वीरकालीन समाज, राज्यव्यवस्था व वैदिक आणि बौद्धमतांतील कोणत्या वैगुण्यामुळें जैनमतास त्यावेळीं विशेष महत्त्व आलें हें रा. गांधी यांनीं शक्य तेवढ्या कसोटीनें वर्णिलें आहे. यामुळें प्रस्तुत चरित्र कोणालाहि वाचनीय वाटेल यांत शंका नाहीं.

बेळगांव
ता० १३।६।३१ } आ. बा. लठ्ठे.

# प्रस्तावना.

भारतीय संस्कृतींत भौतिकाला केव्हांही गौण स्थानच मिळालेलें आहे. हिंदवासीयांची आस्तिक्यबुद्धि अतिप्राचीन काळापासून दृढमूल झालेली असल्यामुळें पारलौकिकसुखाची श्रद्धा जन्मापासूनच त्याच्या हाडीमासीं खिळलेली असते. त्यामुळें परलोकीं आपण सुखी कसे होऊं या गोष्टीकडेच लोकांचें लक्ष लागून राहिलें. इंद्रियें देहव्यवहाराचीं केवळ उपकरणें असल्यामुळें आणि हा देह मरणानंतर येथेंच सोडून द्यावयाचा असल्यामुळें इंद्रियलोलुपता आणि शारीरिक मोह हीं परलोकहिताला अयोग्य ठरलीं. मृत्यूच्या पलीकडे आत्मा हा एकटाच अबाधित असल्यामुळें त्याला इहपरलोकीं सुख व समाधान कसें होईल या गोष्टीकडेच प्रत्येक जाणत्या माणसाचे विचार लागून राहिले. एतद्देशीय प्रत्येक धर्मांत हीच विचारसरणी आढळून येईल यांत संशय नाहीं. आत्म्याचें अमरत्व ग्राह्य ठरल्यानंतर नीतिधर्माची आणि जगांतील पारस्परिक जबाबदारीची उपपत्ति सुलभरीतीनें लावतां येते. आणि म्हणूनच या देशांत भौतिकापेक्षां अध्यात्मिक संस्कृति श्रेष्ठ ठरली आहे.

भारतीय संस्कृतीचें हेंच वैशिष्ट्य होऊन गेल्यामुळें, मानव जातीची आध्यात्मिक तृष्णा शमविण्याकरितां हिंदुस्थानांत अनेक धर्म उत्पन्न झाले. त्यांपैकीं कांहीं पूर्वीच्याच स्वरूपांत आजही राहिले आहेत; कांहींत कालानुरूप आणि परिस्थितीला अनुसरून बदलही झालेला आहे; आणि कांहीं नामशेषही होऊन गेले आहेत. एकामागून एक असे अनेक धर्म येथें उदयाला आल्यामुळें भारतभूला धर्माचें माहेरघर समजण्यांत यावें ह्यांत नवल नाहीं. प्रत्येक धर्माचें ध्येय त्याची मांडणी परिस्थितीला अनुसरून इतर धर्मांहून कांहींशी वेगळी असली तरी मनुष्याचा आध्यात्मिक हव्यास पूर्ण करणें आणि त्या दृष्टीनें जगांतील सर्व घडामोडींची उपपत्ति लावणें हेंच आहे. त्यामुळें हिंदुस्थानांतील प्रत्येक व्यक्तिमात्राच्या जीवनाला धर्माची कायमची सांगड लागून राहिली आहे. त्याच्या जीवनावर परिणाम करणारी धर्म ही एक मोठी शक्तीच झालेली आहे. त्याच्या जीवनक्रमाला हें विशिष्ट वळण फार प्राचीन काळापासून लागत आलें आहे. व्यक्तिगत आयुष्यक्रमावर प्रभाव पाडणारें एखादें विशिष्ट तत्त्व राष्ट्रीय जीवनक्रमांत आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. जगांतील अनेक देशांच्या

राष्ट्रीय जीवनाचे विशिष्टतत्त्व ज्याप्रमाणें अर्थकारण आहे याप्रमाणें हिंदुस्थानच्या राष्ट्रीय जीवनाचें विशिष्ट तत्त्व धर्मकारण आहे.

अफाट विस्तार आणि प्राकृतिक विभाग ह्यामुळें इतर दृष्टींनीं हिंदुस्थानच्या लोकांत अनेक भेद असले तरी धार्मिक जीवनाचें हें विशिष्ट तत्त्व सर्वत्र सारखें आढळून येतें. ह्या जीवनाचे अनेक सांप्रदाय होत जाऊन परस्परविरोधही उत्पन्न झाला, ह्याचें कारण ह्या विशिष्ट तत्त्वाची प्रबलताच. इतके धर्म एका ठिकाणीं असलेला देश पृथ्वीच्या पाठीवर हिंदुस्थानाशिवाय दुसरा नाहीं. इतरत्र क्षुल्लक बाबतींतसुद्धां परस्परविरोध दिसून येईल. पण हिंदुस्थानांत जीवनांतील विशिष्ट धार्मिक तत्त्वामुळे सहिष्णुता हा हिंदुवासीयांचा सामान्य स्वभावधर्मच झालेला आहे. ग्रीक, यवन, मोगल, इंग्रज हे सर्व आपापले धर्म घेऊनच हिंदुस्थानांत आले, आणि ते सर्व आज बिनहरकत हिंदवासी होऊन राहिले आहेत. कांहीं केवळ देश पाहण्याच्या जिज्ञासेनें आले, कांहीं ह्या सुवर्णभूमींतील संपत्ति लुटण्याकरितां आले आणि कांहीं व्यापाराच्या उद्देशानें आले. राजकीय दृष्टीनें हिंदुस्थानला ह्या लोकांचें दास्यत्व पत्करावें लागलें असलें तरी सांस्कृतिक दृष्टीनें हिंदुस्थानचा जयच झालेला आहे. “जिंकणारी जात जित जातीकडून सांस्कृतिक दृष्टीनें नेहमीं जिंकली जाते” हें विधान हिंदुस्थानच्या बाबतींत तरी अक्षरशः खरें ठरतें.

वरील विवेचनावरून हिंदुस्थानचा धार्मिक इतिहास लिहिणें किती अवघड आहे हें सहज कळून येईल. एखादी भावनाप्रधान कादंबरी लिहिणें त्या मानानें फारच सोपें आहे. ज्यांना इतिहासांत अत्यंत महत्त्व आहे असे समकालीन पुरावे मिळणें प्रायः अशक्य असतें, अशा पुराव्यांच्या अभावीं उत्तरकालीन आणि परंपरागत किंवा दंतकथात्मक पुराव्यावरच सर्व भिस्त टेवावी लागते. तथापि हे पुरावे केव्हांही दुय्यम प्रतीचेच ठरतात. भारतीय संस्कृतीचा आरंभकाल शतकांनीं किंवा सहस्रांनीहि गणणें अशक्य झालें आहे. अशा स्थितींत बापापासून मुलाला आणि गुरुपासून शिष्याला मिळत आलेलें परंपरागतज्ञान निर्भेळ, शुद्ध अतएव विश्वसनीय असेल अशी कल्पनाही करवत नाहीं. इतक्या प्राचीन कालाच्या परंपरागतज्ञानांतही परिपूर्णता आणि सुसंगतता हे गुण थोडेच असणार आहेत ! सुसंगतपणा हा तर ऐतिहासिक पुराव्यांचा एक गुणच समजला जातो. सुसंगतपणामुळें मिळालेले पुरावे बनावट किंवा कायमठशाचे

नाहींत एवढें तरी सिद्ध होतें. एखाद्या विशिष्ट गोष्टीसंबंधीं दोन उत्तरकालीन पुराव्यांत परस्परविरोध दिसून आल्यास दोन्हीं मतें एकाच दृष्टीनें केव्हांही ग्राह्य ठरणार नाहींत. दोहोंपैकीं एकच कोणते तरी ग्राह्य आणि दुसरें त्याज्य ठरवावें लागेल. ग्राह्याग्राह्यतेचा हा प्रश्न अति गुंतागुंतीचा आणि म्हणूनच बिकट आहे. विद्वान आणि अनुभवी संशोधकांकडूनहि ह्या बाबतींत कित्येकदां चुका होतात. एखाद्या बाबतींत पुरावे अगदीं गौण असतील तर ऐतिहासिक तर्कांवरच भिस्त ठेवावी लागते आणि आपलीं अनुमानानें फारच जपून करावीं लागतात.

हिंदुस्थानासारख्या ह्या एका मोठ्या खंडांत समाविष्ट झालेले लोक मानववंशाच्या एकाच शाखेचे आणि संस्कृतीचे आहेत असेंही नाहीं. भौगोलिक परिस्थितीच्या भिन्नतेमुळें त्यांच्या स्वभावधर्मांतही भिन्नता उत्पन्न झालेली आहे. अशा लोकांचा धार्मिक इतिहास लिहितांना कुशाग्र बुद्धीच्या मनुष्यानेंहि फार सावधानता राखली पाहिजे. भिन्न संस्कृतींचे लोक एकाच ठिकाणीं फार दिवस राहिल्यामुळें त्यांच्यांतील सांस्कृतिक विभिन्नता सकृद्दर्शनीं दिसून येत नाहीं. ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें कांहीं धार्मिक इतिहासकारांनीं हिंदुस्थानांतील सर्व लोकांत एकच सांस्कृतिक प्रवाह प्रस्थापित करण्याचा चुकीचा प्रयत्न केला आहे.

हिंदुस्थानांत प्राचीन वाङ्मयाचें संरक्षण मौखिक परंपरेनेंच झालें. त्यामुळें प्रतिकूल परिस्थितींत त्याचा बराच मोठा भाग स्मृतींतून नष्ट झाला असला पाहिजे यांत शंका नाहीं. तथापि एका संस्कृतीच्या वाङ्मयाचा एक भाग—ऋग्वेदादिग्रंथ—आजतागायत शाबूत राहिला आहे हे सुदैवच म्हणावयाचें. जगांत कोणत्याहि संस्कृतीच्या ग्रंथांत ते सर्वांहून प्राचीन आहेत. ह्या ग्रंथांची प्राचीनतमता ग्राह्य केल्यानंतर त्यांच्या कालनिर्णयाच्या वादग्रस्त प्रश्नांत शिरण्याचें आज कांहींच प्रयोजन नाहीं. हे ग्रंथ आर्यांचे असून हे आर्य हिंदुस्थानचे मूळ रहिवासी नसून बाहेरूनच हिंदुस्थानांत आलेले असावेत असा भाषाशास्त्रज्ञांचा तर्क आहे. ऋग्वेदांतील भौगोलिक वर्णनाचा कांहीं भाग हिंदुस्थानला लावतां येत नाहीं. अर्थात् ऋग्वेदाचा कांहीं भाग आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वींच रचला गेला असला पाहिजे. ह्या वर्णनावरून पाहतां कांहीं भाग पंजाबांत लिहिला गेला असला पाहिजे यांत शंका नाहीं. ऋग्वेदकालांतील आर्यांचा प्रवेश मध्य-

हिंदुस्थानांत आणि विंध्यपर्वताच्या खालीं झाला नव्हता. पंजाबांत स्थिरस्थावर होऊन बराच काल लोटल्यानंतरच आर्यांनीं मध्यभागांत आणि दक्षिणेंत आक्रमण केलें. ऋग्वेदकालीं सरस्वती आणि दृषद्वती या दोन नद्यांच्या मध्यवर्ती भागांत आर्यांचें केंद्रस्थान होतें. ब्राह्मणकालांत हें केंद्रस्थान पूर्वेकडे सरकत जाऊन कुरुक्षेत्राच्या भागांत आलें. अथर्वाच्या कांहीं भागांत—हे भाग ऋग्वेदाइतकेच जुने आहेत—रोगराई मगधदेशांत जाऊं दे असें म्हटलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत दाक्षिणेंतील आंध्र वगैरे लोकांचा उल्लेख बहिष्कृतासारखा आहे. ऋग्वेदकालापासून ब्राह्मणकालापर्यंत आर्यांची वस्ति मध्यदेशापर्यंतच येऊन ठेपली होती. पूर्व व दक्षिणभागांत कांहीं आर्येतर लोक रहात होते. पुढें म्हणजे उपनिषदकालांत आर्यांचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर झाला असावा असें दिसतें.

आतां ऋग्वेदकालापासून आर्यांचीं धार्मिक भावना व कल्पना काय होती तें आपण पाहूं. ऋग्वेदकालीं धार्मिक कल्पना फारशी गुंतागुंतीची नव्हती. धर्मसंबंधी कल्पनाची ती प्रथमावस्था असल्यामुळें, धर्माविषयीं त्यांची चिकित्सकबुद्धि अद्यापि जागृत झाली नव्हती. तथापि त्या वेळच्या धार्मिक श्रद्धेंत पुरोहितांच्या धूर्ततेची छाप मात्र पडलेली दिसून येते. त्यावेळचे धार्मिक आचारविचार अगदीं साधे होते. सृष्टींतील नैसर्गिक शक्तीवर मनुष्यत्वाचा आरोप करून आणि त्यांच्या ठिकाणीं देवी शक्तींची कल्पना करून त्यांचीच तें प्रार्थना करीत असत. यांत द्यावा, पृथ्वी, वरुण, इंद्र, उषस् इत्यादि देवतांची स्तुतीच आहे. वरुणाला थोडेसें नैतिक अधिष्ठान मिळालेलें आहे. इंद्र शत्रूंचा संहारक असून तो भक्तांना पाऊस वगैरे पाठवितो. भक्तानें कांहीं मागितलें तरी तें द्यावयाची त्यांची तयारी असते. उषेची स्तुति फारच रम्य आहे, आणि ती लिहिणाऱ्या कवीच्या कल्पनाविलासाचें कितीहि कौतुक केलें तरीहि तें थोडेंच वाटतें. हे देव पूजेनें प्रसन्न होऊन कांहींही द्यावयास तयार असत, आणि यज्ञयागांची कल्पना त्यांची कृपा संपादण्यासाठींच प्रसृत झाली होती यांत शंका नाहीं. भक्तानें देवांची उपासना कशी करावी हें माहित झाल्यानंतर देव त्यांच्या आधीन होतात. धर्मविषयक कल्पनांच्या प्रगतींतील ही एक पुढची पायरी होय. या कल्पनेमुळें पुरोहितांना महत्त्व प्राप्त झालें. यज्ञांत देवांना दूध, तूप, धान्य, मांस, सोमरस इत्यादि पदार्थ बली देत असत. देवांना संतुष्ट करावयाची गुरुकिल्ली एकदां

हस्तगत झाल्यानंतर दिवसेंदिवस सोमसगाचा प्रसार होऊं लागला; आणि होतृ, अध्वर्यु, उद्गातृ, इत्यादि पुरोहितांचें प्रस्थहि समाजांत वाढलें.

वर ऋग्वेदांतील धार्मिक कल्पनांची जी रूपरेषा मांडली तिच्यांत क्रियाकांडाशिवाय दुसरें विशेष असें कांहींच नाहीं. सर्व ऋग्वेद एकाच वेळेला रचला गेला नाहीं हें एकदां वर सांगितलेंच आहे. त्याचें कांहीं भाग फारच जुने आहेत तर कांहीं भाग फार अलिकडचे आहेत. दहाव्या मंडळाची गणना प्राचीन भागांत होत नाहीं. ह्या मंडलांत तत्वज्ञानाच्या कांहीं कल्पना प्रादुर्भूत झाल्याच्या आढळतात. देवांच्या अनेकत्वाविषयीं शंका प्रदर्शित करण्यांत येऊं लागली आणि विश्वाचें आदितत्व एकच या दिशेनें विचारप्रवाह वाहूं लागला. प्रथम जलाच्या स्वरूपांत व नंतर उष्णतेच्या स्वरूपांत याप्रमाणें असत् पासून सत्‌ची उत्क्रान्ती झाली असा जगदुत्पत्तीचा क्रम आहे असें दाखविण्याकरितां बरेंच प्रयत्न झालेले आहेत. मृत्यूनंतरच्या प्राण्यांच्या अवस्थेविषयीं ऋग्वेदांत कांहींच विशेष असें सांपडत नाहीं. मृतात्म्याच्या मरणोत्तर स्थितीविषयींही एकमत दिसून येत नाहीं. यम हा प्रथम मरण पावलेला व मृत लोकांचा राजा म्हणून समजला गेला होता असें दिसतें. मेल्यानंतर लोक यमाबरोबर आनंदानें बोलत असतात अशीहि एक कल्पना दृष्टीस पडते. दुसऱ्या एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं देव व पितर हे निरनिराळ्या ठिकाणीं राहतात. तिसरी ही एक कल्पना अशी आहे कीं, आत्मा हा जलाशीं व वनस्पतींशीं एकरूप होतो. यावरून ऋग्वेदकालीं पुनर्जन्माविषयीं कल्पना रूढ होती असें तत्कालीन् पुराव्यावरून तरी सिद्ध होत नाहीं. दुष्ट लोकांची मरणोत्तर स्थिती काय होते याचीहि उपपत्ति योग्य रीतीनें लावलेली दिसत नाहीं. परंतु हा संदिग्धपणा ऋग्वेदाच्या नीतिधर्माविषयीं दिसून येणाऱ्या तौलानिक औदासिन्याचें चिन्ह आहे. राजा वरुण हा सर्व द्रष्टा आहे किंवा सर्व शक्तिमान् आहे एवढ्याचवरून नैतिक चांगुलपणा किंवा शहाणपणा हें त्याचें वैशिष्ट्यदर्शक आहे असें होत नाहीं. पुढें ब्राह्मणकालीं यज्ञयागादि क्रियाकांड जास्त जास्तच वाढत गेलें व त्याबरोबर पुरोहितांची संख्याहि वाढत गेली. याच्या पुढील काळांत धान्यादिकांच्या बलींचें महत्त्व पूर्वींइतकें राहिलें नाहीं. पशुबलींचें प्रस्थ जास्त वाढलें व त्याबरोबरच सोमयागाचीही महती वाढली. वर्षभर चालणारें यागसत्र सुरू होऊन पुरोहितांचें महत्त्व वाढूं लागलें व राजे लोकहि आपल्या सार्वभौमत्वाचें स्थापक

चिन्ह म्हणून राजसूययज्ञ करवूं लागले. पुढें पुढें विश्वस्थायीं राहण्यासाठीं यज्ञ करणें अवश्य आहे अशी कल्पना रूढ झाल्याचें दिसून येतें. पुढें या यज्ञाला कांहींतरी लाक्षणिक अर्थ येत गेला व पुरुष, काल, अग्नि व प्रजापति या सर्वांची एकरूपता दाखविण्यास सुरुवात झाली. यापासून पुढें आधारभूत तत्वाचा ( underlying Reality ) तपास सुरू झाल्यासारखें दिसतें व पुढें ब्रह्माची कल्पना उत्पन्न झाली. या ब्रह्मतत्वाची व नश्वर जगाच्या स्वरूपाची उपपत्ति लावण्यासाठीं श्रीशंकराचार्यांना मायावादाची कांस धरावी लागली. या तत्वाची योग्य उपपत्ति उपनिषद्कालीं झालेली नव्हती म्हणूनच निरनिराळे भाष्यकार उपनिषदावरून निरनिराळें सिद्धांत काढण्याचा प्रयत्न करूं लागले. सांप्रदायिक दृष्टया प्रत्येकाला थोडेबहुत यशहि आलें आहे. याच्यावरून एक गोष्ट स्पष्ट होत आहे कीं, उपनिषद्कालीं वैदिक तत्वज्ञान एकस्वरूप झालेलें नव्हतें आणि सर्व उपनिषदें एकाच काळीं लिहिलीं गेलीं नसल्यामुळें त्यांमध्यें परस्परविरोध दृष्टोत्पत्तीस येणेंही अशक्य नाहीं. उपनिषद् म्हणजे वैदिक तत्वज्ञानीं लोकांच्या स्वतंत्र विचाराचा एक महत्वाचा संग्रह आहे. त्यांमध्यें असेंहि कांहीं नाविन्यपूर्ण विचार आहेत कीं, कोणत्याहि समंजस व विचारी माणसाला असा संशय येतो कीं, उपनिषदांतील विचार परंपरा वैदिक धर्मांतीलच आहे कीं नाहीं. क्रियाकाण्ड उपनिषद्कालीं निष्फल व हलकें ठरलें. पुरोहितांचें प्रस्थ कमी झालें. मोठमोठाल्या यज्ञसत्राच्या ठिकाणीं याज्ञवल्क्यादि ऋषिलोकांचीं ज्ञानसत्रें दिसूं लागलीं. कित्येक उपनिषदांवरून असें समजतें कीं, ब्राह्मणलोक ब्रह्मज्ञानासाठीं क्षत्रियांकडे जात असत. म्हणजे यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, उपनिषद्कालीं ज्या क्षत्रिय वर्गाबरोबर आर्यपुरोहितांचा संबंध आला होता त्या क्षत्रियवर्गांत तत्वज्ञानाची वाढ चांगलीच झालेली असावी व तो क्षत्रियवर्ग बहुतेक आर्येतर संस्कृतिपैकींच असावा.

श्वेताश्वेतर उपनिषदावरून योग व अध्यात्मशास्त्राचा बराच विकास झालेला दिसतो. उपनिषत्कालीन् वाङ्मयांत इन्द्र, अग्नि, आदिकरून देवांची पडछाया देखील पडलेली दिसत नाहीं. ब्राह्मणकालीं पुनर्जन्माविषयीं कांहींच कल्पना नव्हती; परंतु पुनर्मरणाची भीति मात्र कित्येकांना वाटत असे. पुनर्जन्माच्या कल्पनेपासून पुनर्मरणाची कल्पना फारच भिन्न आहे. उपनिषद्कालीं मात्र पुनर्जन्माची कल्पना स्पष्टपणें पुढें आलेली दिसून येते. छांन्दोग्य व बृहदारण्यक

# प्रस्तावना

उपनिषदामध्यें पुनर्जन्मतत्त्वाची रूपरेषा आखलेली दिसून येते. उदाहरणार्थ-ब्रह्मस्वरूपांत निमग्न झालेला मनुष्य मरणानंतर देवांच्या मार्गानें जातो, ब्रह्म-स्वरूपांतच लीन पावतो व पुन: या मृत्युलोकांत परत येत नाहीं. जो मनुष्य सत्कृत्य करतो आणि ज्याला ज्ञानाची प्राप्ति झालेली आहे तो मात्र चंद्रलोकांत जाऊन फळें भोगतो व नंतर वनस्पतिरूपानें किंवा मनुष्यरूपानें जन्म घेतो. पण दुष्ट लोक मात्र चाण्डाळ कुत्रीं वगैरे योनींत जन्म घेतात. कौषीतकी उपनिषद्मध्यें वर्णन केलेला मार्ग याहून थोडासा भिन्न आहे. पण यावरून एवढें सिद्ध होतें कीं, ब्राह्मणकालीं दृष्टोत्पत्तीस येत नसलेली पुनर्जन्माची कल्पना उपनिषद्कालीं वैदिकसंस्कृतिप्रवाहांत रूढ झाली होती.

उपनिषद्कालीं पुनर्जन्मासारखी वैदिकवाङ्मयांत आकस्मात् उद्भूत होऊन नवीनच रूढ झालेली दुसरी एक कल्पना म्हणजे कर्मासंबंधीं होय. बृहदारण्यक उपनिषदामध्यें एके ठिकाणीं असें म्हटले आहे कीं, पूर्वकृत कर्मानुसारच मरणो-त्तर गति ठरविली जाते. ऋग्वेदकालापासून उपनिषदकालापर्यंत वैदिक लोकांच्या धार्मिक कल्पनेची रूपरेषा येथपर्यंत आपण पाहिली. प्रत्येक चौकसबुद्धीच्या मनु-ष्याला असें दिसून येईल कीं वेदब्राह्मण व उपनिषद् या दोन धार्मिक कल्पना-प्रवाहामध्यें बराच मोठा खंड दृष्टीस पडतो. पुनर्जन्म व कर्म या तत्त्वांची कल्पना उपनिषद्कालीं नवीनच दिसतें. हीं जीं दोन विशिष्ट तत्त्वें उपनिषद्कालीं रूढ झालीं त्यांना बाहेरून खचितच कांहीं तरी प्रेरणा मिळाली असली पाहिजे आणि ही प्रेरणा कोणाकडून मिळाली याचाहि उपपत्ति लागावयास पाहिजे.

ज्यावेळीं आर्य लोक हिंदुस्तानांत आले त्यावेळीं हिंदुस्तानदेश हा एक ओसाड व निर्जन प्रदेश असावा अशी कल्पनाहि करवत नाहीं. त्या प्राचीन काळांत सर्वत्र हिंदुस्तानांत आजच्याइतकी जनवस्ति नसली तरी गंगेसारख्या नदीकांठीं सुपीक प्रदेशांत लोक वास राहत असतील यांत संशय नाहीं. त्यावेळीं गंगानदीकाठीं जे लोक राहत होते त्यांची संस्कृति कशा प्रकारची होती हें सांगा-वयास आजतरी कांहीं पुरावा नाहीं. त्याच सुमारास दक्षिणेंत राहणाऱ्या मूळच्या रहिवाशांची संस्कृति श्रेष्ठ दर्जाची होती, याच्यावरूनच दक्षिणदेशापेक्षां सुपीक अशा गंगानदीकांठची संस्कृति श्रेष्ठच असेल अशी कल्पना करावयास कांहींच हरकत दिसत नाहीं. पण निश्चित पुराव्याअभावीं अशाप्रकारच्या संस्कृतीच्या अस्तित्वाविषयीं विद्वान् लोक सांशक आहेत. परंतु वैदिकवाङ्मयच बारकाईनें

पाहिल्यास या भिन्न संस्कृतींच्या अस्तित्वाबद्दल पुरावे खास मिळण्यासारखे आहेत.

आर्य लोकांना हिंदुस्थानांतील प्रदेश चटकन् अनायासें जिंकितां आला नाहीं. कित्येकदां मूलनिवासी लोकांबरोबर त्यांना झगडे करावे लागले. याची छाप ऋग्वेदसूक्तांत आढळून येण्यासारखी आहे. ब्राम्हणकालांतच आर्यलोक मध्यदेशाकडे आले हे वर सांगितलें आहे आणि याचवेळीं गंगानदीकाठीं राहत असलेल्या लोकांची व देश आक्रमण करीत आलेल्या आर्य लोकांची गांठ पडून त्यांचा परस्परसंबंध वाढला असेल. मगधदेशावर आर्य लोकांची नजर कृपाळूपणाची नव्हती. कीकट लोक मध्यनिवासी होते असें सांगण्यांत येतें. परंतु ऋग्वेदकालीं आर्य लोक मगधदेशापर्यंत आले होते असें म्हणावयास कांहींच पुरावा नाहीं. उपनिषद्कालाच्या आरंभीं आर्यलोकांचा मध्यदेशांत असलेल्या मूलनिवासी लोकांबरोबर संसर्ग झाला व म्हणूनच कीं काय त्या मूल लोकांपैकीं विशिष्ट वर्गाचें वर्णन अथर्ववेदाच्या कांहीं भागांत सांपडते. अथर्ववेदामध्यें वर्णिलेले व्रात्यलोक हे मगधदेशाचें मूलनिवासी होतें असें म्हणावयास बरीच जागा दिसते. मगधवासी लोक आर्य नव्हते यांत मुळींच संशय नाहीं. त्या व्रात्यलोकांविषयीं माहिती जी मिळते ती थोडीबहुत लाक्षणिक असली तरी अथर्ववेदांत व पंचविंशब्राह्मणांत ती स्पष्टपणें सांपडते. ते लोक आर्येतर होते. म्हणून त्यांना आर्यधर्मांत घेण्याकरितां कांहीं विधीदेखील सांगितलेले आहेत. या लोकांच्या पोषाखाचें ही वर्णन सांपडतें. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या लोकांच्या भाषेबद्दल उल्लेख हा होय. त्यांची भाषा संस्कृताहून भिन्न होती असा स्पष्ट उल्लेख आहे. त्या लोकांना वेदाची भाषा, उच्चार करावयास फार कठीण जात असे. त्याप्रमाणें असुरलोकहि संस्कृतभाषा बोलत नसत. असुरलोकांच्या तोंडांत घातलेलीं कांहीं वाक्यें सांपडतात त्यावरून ती भाषा प्राकृतभाषेची मूलभाषा होती असें अनुमान काढण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. यास आणखी एका गोष्टीवरून पुष्टी मिळते ती ही कीं ऋग्वेदांत देखील असें कांहीं शब्द व शब्दप्रयोग आढळतात कीं तें संस्कृतभाषेचें वैशिष्ट्यदर्शक नसून त्यावेळीं प्रचलित असलेल्या इतर भाषेंतून घेतल्यासारखे दिसतात. व्रात्यलोकांची ही भाषा पूर्वप्राकृत असावी असे वाटतें. दुर्दैवानें या व्रात्य वगैरे लोकांचें तत्कालीन वाङ्मय आज उपलब्ध नाहीं म्हणून त्या भाषेविषयीं स्पष्ट पुरावा देणें अशक्य झालेलें आहे. या सर्व विवेचना-

वरून असा तर्क करण्यास हरकत नाहीं कीं मगधदेशामध्यें व त्याच्या भोंवतालच्या प्रान्तांत आर्यसंस्कृतीची लाट दुसऱ्या एका संस्कृतीच्या बहुतकरून मूलनिवासी लोकांच्या संस्कृतीच्या लाटेशीं येऊन मिळाली.

तुलनात्मक दृष्टीनें सर्व धर्मांचा अभ्यास करणाऱ्या विद्वानांकडूनही वरच्या अनुमानाला पुरावा मिळालेला आहे. मेजर जनरल फर्लांग साहेब असें लिहितात. " All upper, western, north central India was then, say 1500 to 800 B. C. and indeed from unknown times ruled by duranious conveniently called Dravids and given to free, serpent and phalic (लिंग) worship... ..but there also then existed throughout upper India an ancient and highly organised religion, philosophical, ethical and severely asectic out of which clearly developed the early ascetical features of Brahmani and Buddhism. " म्हणजे ख्रिस्तशकापूर्वी अजमासें १५०० ते ८०० च्या दरम्यान किंबहुना अज्ञात अशा प्राचीन कालापासून दुरेनियन किंवा द्रविड लोकांनीं सर्व वरच्या, पश्चिमेच्या व उत्तर मध्य हिंदुस्तानावर राज्य केलें होतें. हे लोक वृक्ष, नाग व लिंग पूजेचे कट्टे पुरस्कर्ते होते ...... परंतु त्याचवेळीं वरच्या सर्व हिंदुस्थानभर एक प्राचीन व मोठ्या प्रमाणांत व्यवस्थित रीतिनें स्थापित केलेला धर्म अस्तित्वांत होता. त्या धर्माचे स्वतंत्र तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र असून तो तीव्र तपश्चर्येचा निःसीम पुरस्कर्ता होता. आणि त्या धर्मांतून ' ब्राह्मण ' व ' बुद्ध ' धर्मांची प्रथमची वैराग्यात्मक स्वरूप लक्षणें स्पष्टपणें उदयास येऊन वाढूं लागलीं.

त्या आर्येतर संस्कृतीचें त्याकालचें वाङ्मय आज उपलब्ध नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. तरी आज हिंदुस्तानांत होऊन गेलेल्या व हयात असलेल्या धर्मांपैकीं कोणकोणत्या धर्मांकडे आर्येतर संस्कृतीचें प्रतिनिधित्व येतें एवढेंच नुसतें न पाहतां कोणकोणते धर्म आर्येतर संस्कृतीपासून उत्पन्न झाले एवढें जरी पाहिल्यास आर्येतर संस्कृतीचें मासले पाहावयास सांपडण्याचा संभव आहे. आधुनिक म्हणजे इतिहासकालीं हिंदुस्थानांत आलेल्या मुसलमान, पार्सी वगैरे लोकांना व कांहीं सुधारणेच्या तत्वावर निर्माण झालेल्या शीख आदिकरून

# प्रस्तावना

धर्मांना सोडून दिल्यास प्राचीन भारतीय धर्मांत दोन भाग पाडतां येतील. एक वेदास पूज्य मानणारा व दुसरा वेदप्रमाणास महत्त्व न देणारा. स्थूलतः हे दोन भाग आर्य व आर्येतर संस्कृतीचे द्योतक आहेत असें मानण्यास कांहीं बाधा दिसत नाहीं. सहा वैदिक दर्शनांकडे लक्ष देऊन पाहिल्यास एक विशेष गोष्ट ध्यानांत आल्याखेरीज राहत नाहीं. ती ही कीं त्यांपैकीं सांख्यमत हें वेदास प्रमाण मानीत नाहीं. हें मुख्यतः ज्ञानमार्गी असल्याकारणानें त्याला क्रिया-काण्डाला पोषक अशा वेदादिक ग्रंथाला प्रमाण मानतां येत नाहीं; व जैनाप्रमाणें ते जगाचें ईश्वरकर्तृत्वही मानीत नाहीं. सांख्य मताप्रमाणें जैन व बौद्ध हे दोन्ही धर्मही वेदाला प्रमाण मानणारे नाहींत यावरून वेदप्रामाण्य न मानणाऱ्या पुराव्यावरून सध्यां चालावयाचें म्हटल्यास सांख्य, जैन व बौद्ध हे आर्येतर संस्कृतींचीच संतानें आहेत असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. आणखी एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे हे तीन्ही धर्म ईश्वरकर्तृत्व न मानणारें असल्याकारणानें नास्तिकच गणले जातात. पण सहसा सांख्यास नास्तिक हा शब्द लावला गेला नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं पुढें सांख्यमत हीं वैदिकदर्शनांतच सामील करून घेण्यांत आले व त्यापुढें वेदप्रामाण्यहि याच्या गळ्यांत बांधण्यांत आलें.

आतां ह्या तीन्ही धर्मांची परस्पर तुलना करून पाहिल्यास व प्रत्येकाच्या तत्त्वज्ञानाकडे बारकाईनें दृष्टि टाकल्यास असें दिसून येईल कीं, त्या तिन्ही धर्मांत बरेंच साम्य आहे व वैषम्य फार कमी आहे. जैनांची पुद्गलाची कल्पना सांख्याच्या प्रकृतीच्या कल्पनेशीं फार जुळते. सांख्यांच्या बहुपुरुषांची कल्पना जैनांच्या अनेक जीवांच्या कल्पनेसारखी आहे. यावरून असें दिसतें कीं, कांहीं मूलतत्त्वावर जसजसें तपशील वाढत गेले तसतसें मतभेद जास्त जास्त वाढत गेलेले दिसतात. तशीच सांख्य व बौद्ध यांच्यामध्यें साम्यता आहे. याविषयीं पं. ज्वालाप्रसाद असें म्हणतात कीं, सांख्य व बौद्ध यांच्या तौलनिक अभ्यासापासून त्या दोन धर्मांमध्यें लक्ष्यांत ठेवण्यासारखी साम्यता उघडकीस येते. आणि ह्या साम्यतेवरूनच कांहीं विद्वान् लोकांना असें वाटतें कीं त्यांपैकीं एक दुसऱ्यापासून निघाला असला पाहिजे. तशीच जैन व बौद्धधर्मांतही साम्यता आहे हे कांहीं नव्यानें सांगावयास नको. या परस्परसाम्यतेवरून हे तिन्ही धर्म एकाच सांस्कृतिक प्रवाहाचे द्योतक आहेत असें म्हणण्यास दुजोरा मिळतो. पण

इथें एक प्रश्न असा उद्भवतो कीं, सांख्यधर्म हा जर आर्येतरसंस्कृतींपैकीं असतां तर षट्दर्शनांत त्याचा एकाचाच कां समावेश झाला व जैन व बौद्ध हे बाहेर कां व कसें राहिले. आर्येतरप्रवाहांतील दुसऱ्या धर्मांप्रमाणें स्वतंत्र राहण्याचा प्रयत्न न करतां, सांख्यांनीं मध्ययुगीन महायानबौद्धांप्रमाणें वैदिक दर्शनाशीं विशेष जुळतें घेतल्यामुळें मौलिक सांख्यांचें सांख्ययोगांत परिवर्तन झालें आणि अशा रीतीनें ते ईश्वरवादी बनल्यामुळें त्यांचा वैदिकदर्शनांत समावेश करून घेण्यांत आला. याप्रमाणें वैदिकदर्शनांत समावेश झाल्यामुळें सांख्यमताला वेद-प्रामाण्यहि येऊन चिकटलें.

वेद व उपनिषत्कालीन् तत्त्वज्ञानाच्या रूपरेषेंत खंड कसा आहे हें आपण पाहिलेंच आहे. आता या आर्येतरसंस्कृतीचीं रूपरेषा पाहिल्यावर त्या खंडाची उपपत्ति होण्यासारखी आहे. आर्यलोक जेव्हां या आर्येतरसंस्कृतीच्या संसर्ग-कक्षेंत आले तेव्हां एकमेकांची छाप एकमेकांवर पडल्याशिवाय राहिली नसेल. वेदकालीं माहीत नसलेलीं पुनर्जन्म, कर्म, अहिंसा वगैरे तत्त्वें उपनिषत्कालीं एकाएकींच स्पष्टपणें दिसूं लागलीं यांचीं कारणें शोधूं गेल्यास आर्यांचे आर्येतर लोकांबरोबर संबंध हेंच एक कारण दिसतें. वैदिक क्रियाकाण्डाच्या पशुहत्त्येंतून अहिंसातत्त्वाचें उत्क्रमण होऊं शकत नाहीं आणि उपनिषत्कालीं पुनर्जन्माची कल्पना अशक्य नसली तरी ती वेदकालीन चंद्रलोकोत्पत्तींतून उत्क्रांत पावली असे मानणेंही शक्य नाहीं. परंतु ऋग्वेदापासून महात्मा गांधींपर्यंत भारतीय तत्त्व-ज्ञानाचा एकच सांस्कृतिक प्रवाह आहे असें प्रतिपादन करण्याचा आमचा एक तऱ्हेचा आग्रहच होऊन बसल्यामुळें आर्येतरसंस्कृतीचा अज्ञात परिणाम आम्हीं मान्य केला नाहीं. व या तत्त्वज्ञानांतील खंडही कसातरी ओढून ताणून भर-ण्यांत येतो. सांख्यमताविषयीं काय तो उल्लेख फक्त श्वेताश्वतरउपनिषद्‌मध्येंच मिळतो. असें बघत गेल्यास उपनिषत्कालीं तत्त्वज्ञानाचें काय काय नाविन्य वाटतें त्यांतले बरेच भाग या आर्येतरसंस्कृतीच्या देणग्याच आहेत असें म्हणावें लागतें.

पुनर्जन्म, कर्म, अहिंसा इत्यादि तत्त्वें जैन व बौद्ध लोकांच्या तत्त्वज्ञानांत आहेत. एवढेंच नाहीं तर पुनर्जन्म व कर्म हीं दोन्हीं तत्त्वें जैनधर्माचीं इतकीं जीव कीं प्राण आहेत कीं तीं काढून टाकल्यास जैनधर्माचें वैशिष्ट्यच काढून टाकल्यासारखें आहे. बौद्धांत ही कर्माची कल्पना आहे. बौद्धमतापेक्षां जैन-

मतांचे प्राचीनत्व इतिहासानें आज सिद्ध झालेलेंच आहे. म्हणून या आर्येतर-संस्कृतीचें कांहीं पुरावे जैनधर्मांत सांपडतात कीं काय हें पहावयास पाहिजे.

कर्मतत्व हें जैनांचें एक वैशिष्टय आहे हें वर सांगितलें आहे. आमच्या अल्पमतीप्रमाणें आम्हांला असें वाटतें कीं, वैदिक व बौद्धधर्मांत जी कर्माची कल्पना आहे ती जैनकर्मकल्पनेहून निराळी आहे. जैनधर्माप्रमाणें कर्म हे पुद्गल परमाणु असून त्याचा जीवाबरोबर संबंध आल्याकारणानें जीव संसारांत फिरतो आणि हें कर्म परमाणुजीवानें दूर केल्याबरोबर त्याला निर्वाणपद प्राप्त होतें. जैनधर्मांत कर्माचे इतके बारीक सारीक तपशील दिलेले आहेत कीं तें एक स्वतंत्र शास्त्रच आहे व तें उपलब्ध पुराव्यावरून निदान महावीरतीर्थंकराच्या वेळेपासून जैनतत्वज्ञानांत अस्तित्वांत असावें असें वाटतें. ते जैनांनीं दुसऱ्या-कडून उसनें घेतलें आहे असें वाटत नाहीं. कदाचित् हें कर्मतत्वज्ञान आर्येतर संस्कृतीचें वैशिष्टयच असावें व त्याची पडछाया वैदिक दर्शनांत उपनिषद्काला-पासून पडावयास सुरवात झाली असावी. तसेंच अहिंसातत्त्वाची छाप वैदिक धर्मावर किती पडली आहे हे आज सर्वांना विदितच आहे.

परंतु ज्यावेळीं पाश्चात्य विद्वान् लोकांनीं भारतीयधर्माचा अभ्यास सुरू केला त्यावेळीं जैनांच्या दुराग्रहामुळें जैनधर्मग्रंथ जैनेतरांना वाचावयास मिळाले नाहींत. म्हणून प्रारंभीं कित्येक विद्वानांनीं जैनधर्म हा बौद्धधर्माची शाखा आहे असें समजून त्याप्रमाणें प्रतिपादन केलें. नंतर थोडथोडे त्यांचे ग्रंथ पाहिल्यावर जैनधर्म हा बौद्धधर्माच्या पूर्वीचा आहे व त्याचा संस्थापक महावीराऐवजीं पूर्वी कोणीतरी झालेला असावा. कदाचित् तो पार्श्वनाथ असावा असें ते मानूं लागले व म्हणूंहीं लागले. बहुतेक इतिहासज्ञांचें मत असें आहे कीं, जैनधर्म ही एक हिंदु-धर्माची बंडखोर कन्या आहे. पण ती कल्पनाहि कल्पनाच असून त्या मताला प्रबल पुरावाच नाहीं.

उपरिनिर्दिष्ट आर्येत्तर लोकांच्या संस्कृतीचें दृष्टीनें जैनधर्माकडे पाहिल्यास जैनधर्म हा एक स्वतंत्र धर्म असून फारच प्राचीनकालापासून गंगानदीच्या सुपीक प्रदेशांत त्याचा पुष्कळ तीर्थंकरांकडून ( जैनधर्मांत या कालांत २४ तीर्थंकर मानले आहेत ) उपदेश केला गेला होता असें मानणें भाग पडतें.

जैनधर्मांतील कर्मतत्व, पुनर्जन्मतत्व, विश्वरचना व उत्पत्ति, संन्यासधर्म, अहिंसादि आचार, देवाची कल्पना इत्यादि तत्वें इतकीं स्वतंत्र आहेत कीं, तो

वैदिकधर्मातून निघाला आहे असें म्हणतांच येत नाहीं. परंतु या दृष्टीनें अद्यापि जैनधर्माचा अभ्यास झालेला नाहीं. तरी तो लवकरच सुरू होईल अशी आशा बाळगण्यास जागा आहे.

जैनधर्म हा आर्येतरसंस्कृताची प्रातिनिधिक असून गंगेच्या सुपीक तीरांवर त्याचा पुष्कळ प्रचार झाला होता असें म्हणण्यास जैनपुराणांवरूनसुद्धां दुय्यम प्रतीचे पुरावे सांपडतात. उदाहरणार्थ—महावीरतीर्थंकराचें जन्मस्थान मगध-देशामध्यें व पार्श्वनाथतीर्थंकराचें जन्मस्थान काशी हें होय व पूर्वीचे कित्येक तीर्थंकर अयोध्येंत जन्मले होते यावरून जैनपुराणकारांनासुद्धां आपल्या संस्कृतीचें केंद्रस्थान मध्यदेशांतच होतें याची जाणीव होती. आतां दुसरी महत्वाची बाब म्हणजे ज्या 'व्रात्य' लोकांचें वर्णन वर दिलेलें आहे ते लोक जैनांचेच पूर्वज होते असें प्रो. चक्रवर्ती यांचें मत आहे जैनांचे आचारांमध्यें व्रत पाळणें यांस फार महत्त्व आहे. व या व्रत शब्दावरूनच त्या लोकांना व्रात्य हें नांव मिळालें असलें पाहिजे असा त्यांचा तर्क आहे. आणि तो थोडासा सयुक्तिक-ही दिसतो. आर्येतरसंस्कृतीविषयीं अजूनहि फार कांहीं संशोधन झालेलें नाहीं म्हणून आम्हीं आमचें मत अद्यापपावेतो झालेल्या संशोधनाच्या आधारानेंच एक प्रयोगावस्थेंतील सूचना या दृष्टीनेंच मांडलेलें आहे.

जैनधर्म आर्येतरसंस्कृतीपैकी आहे हें आमचें मत थोड्या अंशीं व निराळ्या दृष्टीनें प्रो. शेषगिरीराव यांनीं आमच्या पूर्वी सूचित केलें आहे. तें अशा रीतीनें प्रश्न करतात कीं, 'Whether jainism was an original premitive Indian faith of the Nothern Indian forest, homes and tribes etc ?' म्हणजे जैनधर्म हा उत्तर हिंदुस्तानांतील जंगलांमध्यें राहणाऱ्या लोकांच्या व टोळ्यांच्यामध्यें प्रचलित असलेला असा एक मूळचाच व फार प्राचीन भारतीय संप्रदाय आहे कीं काय ? परंतु प्रो. शेषगिरीराव यांचे कल्पनेमध्यें असें ध्वनित केलेलें दिसतें कीं, ही आर्येतरसंस्कृति फार कांहीं उच्च दर्जाची नव्हती.

डॉ. हर्मन यॉकूबीसाहेब यांनीं जैनधर्माचा अभ्यास विशेष केला आहे व भरत-वर्षासंबंधीं संशोधनावरहि ते मोठे प्रमाण मानले जातात. त्यांनीं आपल्या एका लेखांत जैनधर्माची व सर्व भारतीयधर्मांची सविस्तर तुलना करून असा निर्णय दिलेला आहे. " In conclusion let me asert my conviction

that jainism is an original system quite distinct and independent from all others; and that therefore it is of great importance for the study of philosophical thought and religious life in Ancient India." म्हणजे शेवटीं मला निश्चितपणें असें सांगावयाचें आहे कीं, जैनधर्म हें एक स्वतंत्र दर्शन असून इतर दर्शनाहून अत्यंत भिन्न आहे. म्हणूनच प्राचीन भरतखंडांतील तत्वज्ञान-विचार व धार्मिक जीवन यांच्या अध्ययनासाठीं त्या धर्माचें फार महत्त्व आहे.

प्रो. ज्वालाप्रसादहि असेंच म्हणतात, The history of jainism for records back almost into the prehistoric past. जैन-धर्माचा इतिहास देखील इतिहासकालापूर्वीच्या अज्ञातकाळांत दूरवर जाऊन पोंचतो.

कोणताहि धर्म प्राचीन आहे एवढ्यानेंच त्याला कांहीं वैशिष्ट्य येतें असें थोडेंच आहे. तरी पण इतिहासभक्तांनीं प्रत्येक प्रश्नाचा निर्णय शोधकबुद्धीनें लावणें अत्यवश्य आहे. वेद वगैरे ग्रंथांत जैनधर्माविषयीं खात्रीलायक उल्लेख मिळत नाहींत याचें कारण हेंच आहे कीं, ऋग्वेदाचे कित्येक भाग आर्यलोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी व कित्येक भाग पंजाबांत लिहिले गेले त्यावेळीं आर्य-लोकांचें आर्येतर संस्कृतीबरोबर अजून संपर्कच झाला नसल्यानें जैनधर्मासंबंधी स्पष्ट उल्लेख वेदांत मिळत नाहींत यांत कांहींच नवल नाहीं. १० वें मंडल अलिकडचेंच आहे वें वर सांगितलें आहे. यांत नाहीं म्हटलें तरी 'मुनयोवात-वसना' असा नग्नमुनीविषयीं एक उल्लेख मिळतो. याच्यावरून दहावें मंडल लिहिलें गेलें त्यावेळीं नग्न राहणाऱ्या भारतीय मूळनिवासी संन्याशी सांप्रदायाची थोडीबहुत माहिती झाली होती असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. जैन लोकांत नग्न संप्रदाय फार प्राचीन कालापासून आहे हें उघडच आहे. व हा संप्रदाय त्यावेळच्या बहुतेक आर्येतरधर्मांत असावा असें वाटतें. कारण आजीविक वगैरे पंथांतही नग्न राहण्याची मुभा होती. 'मुनयोवातवसना:' हा उल्लेख जैनांना उद्देशून आहे असें वेबर साहेबांचेंही मत आहे. कित्येक जैनपंडितांचें मत असें आहे कीं, आपण आर्यच आहोंत याला कांहींतरी कारण असेल तर स्मृति-कालांत आर्य शब्दाला आचारनिदर्शक अर्थ प्राप्त झाला हेंच होय. प्रो. याकोबी यांनीं बरेंच दिवसांपूर्वी बौद्धवाङ्मयाच्या उल्लेखावरून असें सिद्ध करून दाखविलें

आहे कीं, "There can be little doubt that the most important doctrives of the jina Religion have remained practically unaltered since the begining of our era." म्हणजे ख्रिस्त शकाच्या आरंभापासून जैनधर्माच्या बहुतेक महत्त्वाच्या तत्वामध्यें व्यवहारांत अजिबात फरक झाला नाहीं यांत तिळमात्र संशय नाहीं. तसेंच मथुरा येथील शिलालेखावरून बुल्हरसाहेबांनीं जैनांचे रीतिरिवाज बहुशीं कसे विश्वसनीय आहेत हें दाखविलें आहे. जैनसंप्रदाय बरेच दिवस जैनांच्या विशिष्ट स्वमतसंरक्षक प्रवृत्तीमुळें जशाचा तसाच राहिल्याकारणानें व त्या परंपरागत आख्यायिका बहुतेकांशीं विश्वसनीय असल्यामुळें संशोधकांनीं आर्येतरसंस्कृतीची थोडीतरी अज्ञातदालनें प्रकाशित करण्यासाठीं जैनधर्माचा व त्याबरोबरच सांख्य व बौद्धधर्माचा अभ्यास करणें अत्यवश्य आहे. डॉ. याकोबी यांनीं म्हटल्याप्रमाणें त्यायोगें भारतीय तत्वज्ञानरूपी प्रवाहाच्या एका अंधःकारमय कोपऱ्यावर जास्त प्रकाश पडण्यासारखा आहे. ज्या पुस्तकाला आम्ही प्रस्तावना लिहित आहों त्या पुस्तकांतील महावीर तीर्थकरापूर्वी जैनसंस्कृतीची पार्श्वभूमी काय होती याची कल्पना करून देण्यासाठीं इतका ऊहापोह करण्यांत आला आहे.

बुद्धनिर्वाणापूर्वी हिंदुस्तानच्या इतिहासांत सर्वमान्य व निश्चित असा एकही कालविभाग किंवा तारीख नाहीं आणि पुढच्या काळांत मिळणाऱ्या तारखा जुजबी असून अजमासानें केलेल्या खुणाप्रमाणें केव्हां मागेंपुढें सरकल्या जातील याचा कांहीं नेम नाहीं. परंतु बुद्धानंतर लवकरच बौद्ध व जैनग्रंथ तसेंच कोटिलिय अर्थशास्त्र व कांहीं प्राचीन धर्मसूत्रें मिळतात व त्यायोगें तत्कालीन भारतीय, धार्मिक व सामाजिक परिस्थितीवर कांहींना कांही तरी प्रकाश पडतो. पार्श्वनाथतीर्थकर- ज्यांना जैनसंप्रदाय आपला तेविसावा तीर्थकर मानतो व ज्याला आधुनिक इतिहासकार जैनधर्माचा संस्थापक असे मानतात—याच्या निर्वाणकालानंतर महावीरस्वामी सुमारें १७८ वर्षांनीं जन्मास आले. महावीरस्वामींचे वेळीं पार्श्वनाथतीर्थकराचे कांहीं परंपराशिष्य हयात होते. तथापि या मध्यंतरीच्या काळीं जैनधर्मास बरीच ग्लानी आली होती असें श्वेतांबर—आगमावरून समजते. आणि याचवेळीं वैदिकधर्मास जास्त जोर मिळाला असावा व तसेंच महावीरकालीं निरनिराळ्या मतांचें पुरस्कर्तेही फार होऊन गेले असें बौद्ध व जैनप्राचीन वाङ्मयावरून समजते.

महावीर व बुद्ध यांचा काल वरील कारणामुळें भारतीय तत्वज्ञानप्रवाहांत महत्त्वाचा समजला जातो व त्यावेळीं प्रचलित असलेल्या सर्व नाहींतरी महत्त्वाचे मतांविषयीं माहिती गोळा करणें हें एक महत्त्वाचें काम होऊन बसलें आहे. जैनधर्मासंबंधी प्राच्यसंशोधकांचें मत दिवसेंदिवस बदलत गेल्यामुळें त्यावेळीं प्रचलित असलेल्या धर्मांशीं जैनधर्माचा काय संबंध होता याविषयींहि निरनिराळीं मतें प्रचलित झालेलीं आहेत. जैनतत्वज्ञानाची प्रत्यक्ष अशी ओळख फार थोड्या संशोधकांना असल्याकारणानें गैरसमज पसरविणारीं बरींच ठोकळ मतें प्रतिपादिलीं गेलीं आहेत. गेल्या शतमानांत प्रतिपादिलीं गेलेलीं मतें आज ग्राह्य ठरत नाहींत कारण त्यानंतर संशोधनाचें काम बरेंच पुढें गेलेलें आहे. डॉ. हर्मान याकोबी यांनीं १८८४ च्या सुमारास जैनसूत्रांचें भाषांतर केलें त्यावेळीं लिहिलेल्या त्यांच्या प्रस्तावनेंत त्यांनीं म्हटलें होतें कीं, महावीर व बुद्ध या दोघांवर तत्कालीन मतांचा फार परिणाम झाला आहे. परंतु हें मत त्यांनीं पुढें कसें सोडून दिलें तें त्यांच्या एका अलीकडच्या लिखाणांतील उताऱ्यावरून दाखविलें आहे. त्यांत ते स्पष्ट म्हणतात " जैनधर्म हा एक स्वतंत्र प्राचीन धर्म आहे. आणि तसें असणें हे भारतीय संस्कृतींत कसें शक्य आहे हे वर दाखविलें आहे. आम्ही आर्येतरसंस्कृतीची रूपरेषा वर दिली आहे. व त्याच दृष्टीनें बुद्धसमकालीन सर्व तीर्थिकाकडे नजर टाकल्यास जैनधर्माच्या स्वतंत्रतेची कल्पना येण्यासारखी आहे. समसामइक तीर्थिकांच्याविषयीं जी माहिती सांपडते ती बहुधा बौद्ध व जैनसूत्रांत सांपडते व ती फारच त्रोटक आहे. आतांपर्यंत उपलब्ध असलेल्या माहितींत ही एकसूत्रता दिसून येत नाहीं. या सर्व तीर्थिकांचे जैन किंवा बौद्धसूत्राप्रमाणें स्वतंत्र ग्रंथ उपलब्ध नसल्याकारणानें या त्रोटक माहितीवरून आम्ही मागें सांगितलेल्या आर्येतरसंस्कृतीवर विशेष प्रकाश पडण्यासारखें कांहींच अनुमानितां येत नाहीं. तरीपण मिळालेली त्रोटक माहिती अल्पांशीं कां होईना जैन व बौद्धकल्पनेशीं जुळत असल्याकारणानें व त्या सर्व तीर्थिकांना वैदिकसंस्कृतिप्रवाहांत जागा न मिळाल्याकारणानें ते सर्व तीर्थिक आर्येतरसंस्कृतिप्रवाहांकडे होते असें गृहीत धरण्यास कांहींच व्यत्यय दिसून येत नाहीं. जैनसूत्रांत नांवनिशीसहित गोशालाखेरिज कोणत्याहि इतर तीर्थिकांची विशेष माहिती सांपडत नाहीं. म्हणून आपणांस बहुतेक माहिती बौद्धग्रंथावरूनच घ्यावी लागते. सूत्रकृतांग

वगैरे जैनसूत्रांत त्यांची माहिती मिळते पण त्यांत निर्दिष्ट केलेलीं मतें अमक्याचींच याचा मात्र स्पष्ट उल्लेख नाहीं.

पूरण्यकाश्यप हा बुद्धापेक्षांहि वयोवृद्ध होता. पार्श्वनाथ व महावीर यांच्या मध्यंतरकाली त्याला व त्याच्या मताला बरीच लोकप्रियता प्राप्त झाली होती. हा नग्न राहात होता असें बौद्धग्रंथावरून समजतें. आपण पूर्णज्ञानी असल्याचें तो प्रतिपादन करी. हा अक्रियावादी होता. त्याच्या मताप्रमाणें आत्मा हा निष्क्रिय आहे व जेव्हां जेव्हां आपण कांहीं कार्य करतो किंवा करवितो तेव्हां तेव्हां आत्म्यावर जबाबदारी अशी कांहींच राहत नाहीं. असें असल्यामुळें आपण सत्कर्म केलें काय किंवा पाप केलें काय तें सर्व सारखेंच. या विचाराची सादृशाबाबत तुलना वैदिकमतामधील भारद्वाज व नासिकेत यांच्या मताशीं करण्यांत येते. पण सूत्रकृतांगाचे टीकाकार शीलांक यांना या पूरणकाश्यपाच्या मताची तुलना सांख्याबरोबर केली आहे व ती जास्त योग्यहि दिसते. पुरण्यकाश्यप यांची दृष्टि विकृत व विपर्यस्त आहे आणि थोडीबहुत सांख्याबरोबर जुळते. याचें कारण दोन्हीं मतें आर्येतरसंस्कृति प्रवाहांतीलच आहेत. दर्शनसार-नामक दिगंबरजैनग्रंथावरून असें दिसतें कीं, पूरणकाश्यप हा अज्ञेयवादी होता.

कुकुद कात्यायन हा पिप्पलाद ब्राह्मण ऋषीचा एक समकालीन होता असे प्रश्नोपनिषदावरून समजतें. हा थंड पाण्याचा उपयोग न करतां ऊन पाण्याचाच उपयोग करीत असे. असत्‌पासून कांहीं उत्पन्न होत नाहीं व सत् कधींच नाश पावत नाहीं असें त्याचें मत होतें. चार महाभूतें, सुख, दुःख व आत्मा अशी सात तत्वें जो मानीत असे त्याच्या मताप्रमाणे ती सातही तत्वें भिन्न व स्वतंत्रच आहेत. थंड पाण्यांत जीव आहे हे म्हणणें जैनमुनी लोकांच्या आचरणाशीं तंतोतंत जुळतें, कारण जैनमुनी नेहमीं गरम पाण्याचाच उपयोग करतात. यावरून कात्यायन यांनीं पार्श्वनाथसांप्रदायी मुनींचें अनुकरण केलें असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

अजितकेशकंबली हा वैदिक क्रियाकाण्डाचा कट्टर विरोधी होता. शरीर व जीव हे दोन्ही एकच असें तो समजत असे. म्हणजे शरीराचा नाश झाल्याबरोबर त्याच्याबरोबर जीवाचाहि नाश होतो असें तो प्रतिपादन करीत असे. यावरून असें अनुमान काढण्यास आधार आहे कीं, त्यानें अहिंसातत्वास खास तिलांजली दिली होती. त्यानें संपूर्णपणें जडवादाचाच प्रचार केला होता. निर-

निराळीं द्रव्यें मिसळल्यानें ज्याप्रमाणें दारू तयार होते त्याचप्रमाणें पंचमहाभूतां-तून जीवाची उत्पत्ति होते असे तो मानीत असे. तो परलोक अजिबात मानीत नसे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे तो चार्वाकमताचा सूचकच होता.

मस्करीगोशाल हा आजीविकपंथाचा पुरस्कर्ता होता. आज हा संप्रदाय हिंदुस्तानांतून नष्ट झाला असला तरी त्याचा उल्लेख अशोकराजाच्या शिला-लेखांत सांपडतो. हा अहिंसावादाचा पुरस्कर्ता होता व स्वतः नग्नहि राहत असे. मुद्दाम तयार केलेला उद्दिष्टादि आहार तो स्वीकारीत नसे. तो आचारावर फार जोर देत असे. जैनतत्वज्ञान व आचार याबरोबर आजीविक मताची फारच साम्यता दिसून येते. व या साम्यतेवरून याकोबी वगैरे विद्वान पंडितांनीं अशी कल्पना केली आहे कीं, महावीरतीर्थंकरांनीं गोशाळ याच्या मतांतून नग्नता, अहिंसा, आहारविहाराचे नियम वगैरे तत्वें घेतलीं असावींत. संकृतदर्शनीं हें किंचित् बरोबर दिसतें परंतु थोडया बुद्धीनें पाहिल्यावर गोशाल व महावीर यांचा काय संबंध होता हें समजेल. गोशाल हा महावीराहूनही वयोवृद्ध होता. व दोघे सहा वर्षें मिळूनहि राहात होते. पण पुढें त्यांचे न पटल्याकारणानें गोशाल हा महावीरतीर्थंकरांना सोडून गेला. गोशाल याचीं मतें जैनधर्माशीं जुळतात याचें कारण असें आहे कीं, गोशाल हा प्रथमतः पार्श्वनाथतीर्थंकराच्या परंपरेंतील होता. याला पुरावा भावसंग्रह नामक प्राकृत दिगंबरजैनग्रंथांत सांपडतो. त्यांत मस्करी हा पार्श्वनाथतीर्थांत उत्पन्न झाला होता असें सांगितलें आहे. म्हणूनच त्याचीं मतें जैनधर्मीशीं इतकीं जुळतात. दुसरा एक महत्त्वाचा प्रश्न म्हणजे लायमनसाहेबाचें मताप्रमाणें महावीरतीर्थंकरांनीं गोशालाचें अनुकरण करूनच लेश्यातत्वाचा उपदेश केला. हे मत तरी खास फोल आहे. यांत तिळ-मात्र शंका नाहीं. आजीविकमताप्रमाणें मनुष्यवर्गाचे सहा भाग केलेले आहेत. या सहा भागांचा व जैनाच्या सहा लेश्यांचा वरील साहेबाच्या समजुतीप्रमाणें कसा संबंध पोहोंचतो हे कांहीं कळत नाहीं. या दोन्हींत कांहीं तरी साम्य असले तर ते सहा हा आंकडाच होय. लेश्यातत्व हें एक स्वतंत्र जैनांचें तत्व असून त्याचा जैनकर्मतत्वाबरोबर अत्यंत निकट असा संबंध आहे व जैनकर्मतत्व हें जैनांचेंच वैशिष्ट्य आहे हें वर सांगितलेंच आहे. गोशालानें बरींच तत्वें पार्श्व-नाथतीर्थंकरांच्या संप्रदायांतून घेतलीं होतीं व पार्श्वनाथ व महावीर हे एकच संप्रदायाचें क्रमागत तीर्थंकर असल्यामुळें गोशाल याचीं कांहीं मतें जैनधर्मा-

बरोबर तंतोतंत जुळतात यांत कांहींच आश्चर्य नाहीं. कांहीं मतें महावीर-तीर्थकरांनीं गोशालाकडून घेतलीं असें म्हणणें ऐतिहासिकदृष्ट्या योग्य ठरत नाहीं हें भावसंग्रहाच्या आधारावरून स्पष्ट होत आहे.

संजयबेलट्ठपुत्त हा मतस्थापक बुद्धापेक्षांहि वयोवृद्ध होता. त्याच्या अज्ञेयवादाचा बराच प्रचार झालेला होता. त्याच्या जीवनचरित्राविषयीं विशेष कांहीं माहिती सांपडत नाहीं. पुण्य व पाप या दोन्हींचें स्वरूप नक्की असें समजत नाहीं म्हणून त्याविषयीं खात्रीचें विधान कोणींही करूं नये असें त्यांचें म्हणणें असे. या त्याच्या मतावरून असें दिसतें कीं, संजयाला बुद्धीला अगम्य विषयाबद्दल नक्की विधान करण्यास धैर्यच नव्हतें. या मताविषयीं मिळणारी माहिती फारच त्रोटक असल्यामुळें यापुढें उगीच जास्ती तर्क लढविण्यांत कांहीं विशेष निष्पन्न होईल असें दिसत नाहीं.

वर जी निरनिराळ्या मतप्रचारकांची माहिती दिलेली आहे ती फारच त्रोटक आहे. कारण यांपैकीं प्रत्येक मताचे स्वतंत्र ग्रंथ आजमित्तीस मुळींच मिळत नाहीत, किंवा त्यांच्या स्वतंत्र अशा सांप्रदायिक आख्यायिकाही दुर्लभ आहेत. ही त्रोटक माहितीहि अक्षरशः सत्य असेल अशी कल्पनाहि करवत नाहीं. वरील सर्व मतांचें सिंहावलोकन केल्यास व सर्वांचीं मतें एकंदरीत पाहिल्यास वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें या मतांचें जैन, बौद्ध वगैरे धर्मांबरोबर जें साम्य आहे व जें वैषम्य आहे तें वैयक्तिक कल व बुद्धिवैचित्र्यामुळेंच असलेलें दिसतें. नग्नता, अहिंसा, क्रियाकाण्डाविरुद्ध तक्रार वगैरे लक्षणें पाहूं गेल्यास हीं सर्व मतें आर्येतर-संस्कृतिप्रवाहांतीलच होतीं असें म्हणावयास हरकत नाहीं. गोशाल पार्श्वनाथ-तीर्थकरांचा अनुयायी असल्यामुळें तो तरी मुख्यतः आर्येतरसंस्कृतीमधीलच असावा.

हीं सर्व मतें आज नामशेष झालेलीं आहेत व प्राच्यसंशोधकांशिवाय दुसऱ्यांना त्यांचीं नांवें देखील माहीत नाहींत. हिंदुस्तानांत एके काळीं उर्जितावस्थेच्या उच्च शिखरावर आरूढ झालेला बौद्धधर्ममुद्रा आज आपल्या मातृभूमीस पारखा झाला आहे. – कालाय तस्मै नमः। परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, जैनधर्म अनेक प्रकारचीं संकटें सहन करून आजतागायत हिंदुस्तानांतला एक प्रमुख धर्म म्हणून गणला जातो. जैनधर्माचा प्रचार हिंदुस्तानाबाहेर फार झाला होता असें म्हणावयास पुरावे फार त्रोटक आहेत. बाहेरील प्रचाराविषयीं कांहीं

कां असेना जैनधर्म हिंदुस्तानांतील आपले स्थान कायम राखून आहे. याला *निरनिराळीं ऐतिहासिक कारणें असलीं तरी जैनधर्म हा आर्येतरभारतीय संस्कृतीचा प्रातिनिधिक असल्याकारणानें त्याला हिंदुस्तानदेशाला पारखें व्हावें* लागलें नाहीं असें आम्हांला वाटतें ! ! असो.

महावीरतीर्थंकराच्या चरित्रांत मतभेद होण्यासारखीं स्थळें फार आहेत. पुनः दिगंबर व श्वेतांबर आम्नायाप्रमाणें ते मतभेद फार दिवसापासून चालत आल्याकारणानें एकपक्षी निर्णय देणें कठीण झालें आहे. एकापक्षाविषयीं दुराग्रह सोडून देऊन निःपक्षपातानें सर्व गोष्टींचा विचार व्हावयास पाहिजे. कित्येक मतभेद असे आहेत कीं त्याचा एकपक्षी निर्णय देणें सध्यां तरी शक्य होईल असें आम्हांला वाटत नाहीं. पण सर्व जैनबंधुंना मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं मतभेद आहेत ते प्रत्येकाला माहीत आहेत आणि त्यांच्या संबंधीं निःपक्षपाती निर्णय देण्यास सबळ ऐतिहासिक पुरावे कमी आहेत. याकरतां मतभेद नुसते वाढवीत न बसतां मतभेदांविषयीं अनुकूल अशी सहानुभूति उत्पन्न करावयास पाहिजे. दोन व्यक्तींच्या मुखचर्येमध्यें ज्याप्रमाणें साम्यता मिळणें कठीण त्याप्रमाणेंच एकाच धर्मांतल्या दोन सांप्रदायांत मतभेदाभाव असणें हेंही तितकेंच दुर्लभ; किंबहुना मतभेद हे असणारच. पण हे मतभेद मतद्वेषाला कारण होऊं नयेत हीच माझी इच्छा.

वीरनिर्वाणकालाविषयीं ही बरेच मतभेद आहेत. पण ते सांप्रदायिक नाहींत. प्रस्तुत पुस्तकाच्या लेखकानें बाबूकामताप्रसादजी याच्याच लेखांचें अनुकरण केलें आहे. व प्रचलित वीरनिर्वाणसंवत यांत १८ वर्षें मिळविण्याची सल्ला दिलेली आहे. पण लेखकानें दुसऱ्यावर केलेला दुराग्रहाचा आरोप पुन्हां त्याच्यावरच उलट येण्याचा संभव दिसतो. विषय फार कठीण आहे व थोडक्यांत त्याचा ऊहापोहही होण्यासारखा नाहीं. तरी आम्हांला एवढेंच येथें सांगावें वाटतें कीं बाबूकामताप्रसादजींच्या पुस्तकानंतर वीरनिर्वाणकाळ गणनेसंबंधीं दोन महत्त्वाचे निबंध प्रसिद्ध झाले आहेत. पंडित जुगलकिशोर यांचा "भगवानमहावीर और उनका समय" या नांवाचा लेख अनेकांत, किरणांत प्रसिद्ध झाला आहे. हा पहिला लेख होय. मुनि श्रीकल्याणविजयजी यांचा एक दुसरा उहापोहयुक्त लेख (१८० पानांचा) नागरी प्रचारणीपत्रिकेंत प्रसिद्ध झाला आहे. व हा लेख पुस्तकरूपानेंही मिळतो. या दोन्ही लेखांत दिगंबर व

## प्रस्तावना.

श्वेतांबर वाङ्मयांत मिळणाऱ्या महत्व पूर्ण पुराव्यांचा उपयोग करण्यांत आला आहे. मुनीवर्यांनीं आपल्या लेखांत अप्रसिद्ध अशा चुर्णीवरून बराच नवीन पुरावा आणला आहे. आणि आमच्या मतें तो पुरावा फार महत्वाचा आहे. या दोन्ही विद्वान लेखकांचा निर्णय असाच आहे कीं, सांप्रदायिक कालगणना बरो-बर असून ( ई. स. पू. ५२७–२८ ) प्रचलित संवत्मध्यें १८ वर्षे मिळविण्याची कांहीं जरूरी नाहीं. या निर्वाणकाळाविषयीं मतभेद बऱ्याच दिवसापासून आहे. प्राचीनग्रंथ तिलोयपण्णत्ति व धवलजयधनलादि टीकेवरून समजतें परंतु उपलब्ध पुराव्याकडे पाहिल्यास प्रचलित संवत् चुकीचा आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

प्रस्तुत पुस्तकाविषयीं चार शब्द लिहावयाचे म्हणजे लेखकानें पुस्तक लिहि-ण्यांत बरेच प्रयत्न केले आहेत. लेखकाची दृष्टि मुख्यत: सांप्रदायिकच आहे. कित्येक ठिकाणीं ऐतिहासिक पुरावे देण्यांत आले आहेत. पुस्तक बारकाईनें वाचणाऱ्यास हें समजल्याशिवाय राहणार नाहीं. कांहीं ठिकाणीं ग्रंथांत ठोकळ विधानेंहि आहेत. तथापि मराठी भाषेंत सांप्रदायिक व ऐतिहासिक माहिती एके ठिकाणीं संकलित करून लिहिले गेलेले महावीरचरित्र हें पहिलेंच होय व त्या दृष्टीनें ग्रंथकर्त्यांना यश मिळालें आहे. आम्हांला अशी आशा वाटतें कीं महा-राष्ट्र वाचकवर्ग हें पुस्तक उत्सुकतेनें वाचील व या ग्रंथापेक्षांहि अधिक संशोधना-त्मक असें एक महावीरचरित्र लवकरच बाहेर पडेल. अशा तऱ्हेच्या पुढच्या प्रयत्नाला हा ग्रंथ खरोखर प्रेरक होईल. असें आम्हांस वाटतें.

माझी मातृभाषा मराठी नसल्यानें ही मराठी प्रस्तावना लिहितांना मला माझ्या मित्रांची मदत घ्यावी लागली. हें नमूद करणें जरूर आहे.

शांतिः शांतिः

कोल्हापूर अश्विन शु॥ १२
शके १८५३ वीरसंवत

आ. ने. उपाध्ये.

# निवेदन.

उपसंहारांत बहुतेक सगळें सांगितले असल्यामुळें अधिक सांगण्यासारखें कांहींच उरलेलें नाहीं. प्रस्तुत ग्रंथ लिहितांना मला बऱ्याच ग्रंथांची मदत घ्यावी लागलेली आहे. त्यांना मी पाहिलें नसतें तर कदाचित् हा ग्रंथ पुढें आलाच नसतां. अशा ग्रंथांपैकीं प्रमुखपणें श्री. रं. बाबूकामताप्रसादजी यांचे 'भगवान् महावीर व म. गौतमबुद्ध' 'भगवान् महावीर' ब्र. जैनधर्म-भूषण शीतल प्रसादजी यांचा 'जैनधर्मप्रकाश'; व श्री. पं. अशगकवींचे 'महावीर चरित्र' होत. याशिवाय इतर बरेंच ग्रंथ पाहण्यांत आले आहेत व त्यांचा उपयोगहि करून घेतला आहे. त्याची यादी देण्याचें कारण नाहीं. जैनधर्मांतील बहुतेक सर्वच ग्रंथांचा कीं ज्यांत महावीरचरित्रासारख्या ग्रंथ-लेखनास उपयुक्त होईल असा मसाला मिळूं शकतो त्याचा मी उपयोग करून घेतलेला आहे. त्या सर्व ग्रंथकर्त्यांचा मी अत्यंत ऋणी आहें. ग्रंथ लिहून झाल्यानंतर त्यास प्रस्तावना लिहून देण्याचें कार्य माझी ओळख देखील नसतांना, केवळ माझ्या विनंतीवरून आपला अमूल्य वेळ खर्चीं घालून रा. ब. श्री. लट्ठे व प्रो. ए. एन. उपाध्ये या उभय-तांनीं अल्पवेळेंत पूर्ण करून दिलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. तसेच पुस्तक–छपाई सुबक व वेळेवर करून दिल्याबद्दल हनुमान प्रेसचे मालक श्री. लक्ष्मणराव भाऊराव कोकाटे यांचाहि मी आभारी आहें. आज तागायत मालेंतून निघालेल्या पुष्पांचा सुवास वाचकवर्ग प्रेमानें घेत आले तसा याही पुष्पांचा चिरकाल घेत राहतील अशी आशा बाळगून हे आभारप्रदर्श-नात्मक निवेदन आटोपतें घेतों.

ता. मिति. मार्गशीर्ष शु. ८ वीरसंवत् २४७७

आपला सर्वांचा नम्र.
'अज्ञात'

# शुद्धीपत्रक.

## महावीर चरित्र.

| पा. | ओळवरून | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५ | २० | अन्यायतेने | अनायतने. |
| २५ | ६ | दृढस्थ | दृढरथ. |
| ११२ | २४ | विद्रमिज्झमिकेमि। | विद्रमिञ्झके । |
| | | ञ्झमिका.. | मिञ्झमिका. |

याशिवाय कांहीं किरकोळ चुका असतील त्या वाचकांनीं कृपाकरून योग्य सुधारून घेऊनच वाचाव्या. उ०—स्वल्पविराम, अनुस्वार वगैरे ही विनंती.

# अनुक्रमणिका.

## महावीर चरित्र.

# महावीरचरित्र

## प्रकरण १ लें.

## तीर्थंकरमाहात्म्य.

नट्ठ चदु घाइ कम्मो दंसण सुहणाण वीरिय मइयो ।
सुह देह त्थो अप्पा सुद्धो अरिहो विचिंतिओ ॥ द्रव्यसंग्रह
जो नष्ट चतुर्घाती दर्शनसुखबोध वीर्ययुक्त असा ।
शुद्धात्मा अरिहंत न तो शुभ देहस्थ चिंतनीय कसा ॥ १ ॥
नट्ठ ठ कम्म देहो लोया लोयस्य जाणओ दट्ठा ।
पुरुसायारो अप्पा सिद्धो झाएइ लोयसिहरत्थो ॥ २ ॥
जाणी लोक अलोका पाही, देहास अष्ट कर्मास ।
नाशी, लोकाग्रस्थित जप पुरुषाकार सिद्ध आत्म्यास ॥ २ ॥

अनेक अवतारी पुरुषांची पुराणें प्रतिभाशाली महात्म्यांनीं लिहिलीं आहेत; फार प्राचीन कालापासून थोर पुरुषांचे पोवाडे कविजन गात आले आहेत; ज्यांनीं विद्याबलानें, शस्त्रबलानें किंवा धनबलानें लहानमोठ्या प्रमाणावर जगांत क्रांति घडवून आणली अशा अनेक लहानमोठ्या माणसांचीं चरित्रेंहि इतिहासांत

नमूद आहेत; हें सर्व वाङ्मय आबालवृद्ध पुरुषांना कळूं शकतें. पुराणांतून चमत्कार असतात; पोवाड्यांतून अतिशयोक्तींचीं वर्णनें असतात; व थोर पुरुषांच्या चरित्रांतूनहि अजब गोष्टी वर्णिलेल्या असतात; तथापि त्या सामान्य लोकांनाहि आकलन होतात व पटतातहि. वरील सर्व थोर पुरुष अलौकिक खरेच; तरीपण त्यांची अलौकिकता सामान्य बुद्धीलाहि आकलन होऊं शकते. पण आम्ही ज्या महावीर स्वामींचें चरित्र लिहिणार आहोंत त्यांचें माहात्म्य बुद्धिगम्य नाहीं, तर्काला पटणारें नाहीं व शुद्धात्म्याशिवाय इतर कोणाला अनुभवगम्यहि नाहीं. सामान्य नैसर्गिक लीलाहि तर्कापुढें टिकत नाहींत व बुद्धीला चकीत करून सोडतात; तर मग शुद्धात्म्याचें अलौकिक व परिपूर्ण सामर्थ्य बुद्धीच्या, तर्काच्या व सामान्य माणसाच्या अनुभवाच्या टप्प्यांत न आल्यास त्यांत नवल कसलें ? सर्व नैसर्गिक घडामोडी मनोगम्य व बुद्धिगोचर असूनहि सामान्य माणसालाच काय पण भौतिकशास्त्रवेत्त्यालाहि क्षणभर कां होईना पण चकित करून सोडतात; मग जो विषय इंद्रियगम्यच नाहीं त्याचा पार बुद्धीला कसा लागणार ! थोरांचे गुण गाण्यालाहि त्यांच्यासारखेच प्रासादिक कवी जन्मावे लागतात असें एका कवीचें वचन आहे. त्याला अनुसरून पूर्णात्म्याचें गुणगान करण्यासहि तसेच लायक शुद्धात्मेच असावे लागतात असें म्हणावें लागतें.

पण सामान्य माणसाला ज्या गोष्टी कळत नाहींत त्यांचें अस्तित्वच नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. हवा दिसत नाहीं; सर्व पृथ्वी कोणीं पायाखालीं तुडविली नाहीं; तेजोगोलांची संख्याहि प्रत्येकानें मोजलेली नाहीं. तरीपण पंचभूतांचें अस्तित्व व गुणधर्म अनुभवांस येतात म्हणून शास्त्रज्ञांच्या सिद्धान्तावर आपण विश्वास ठेवतोंच. शिवाय आत्म्याच्या किंवा ईश्वराच्या अस्तित्वाला व सामर्थ्याला स्वानुभवाशिवाय इतर प्रमाणांची जरूरीच नाहीं; पण हा अनुभव केव्हां तरी सर्वच प्राणिमात्रांना यावयाचा असला तरी एका विवक्षित वेळीं तो अनुभव सर्वांनाच आलेला असतो असें नाहीं. अशा वेळीं 'बाबावाक्यं प्रमाणाम्' हा अतिशय निंदित मार्गच पत्करावा लागतो व धार्मिक बाबतींत बहुतेकांनीं हाच पत्करलेला आहे. पण अध्यात्मिक बाबतींत बाबावाक्यापेक्षां आप्त वाक्याला अधिक महत्व आहे व हे आप्त म्हणजे आत्मसिद्धि ज्यांना झालेली आहे तेच होत. या आप्तांना कांहीं तरी खोटेंच सांगून दुनियेला झुकविण्याचें कांहींच कारण नसतें; सत्यकथन हाच त्यांचा उद्देश असतो व म्हणूनच आपल्या मनाला

पटत नसलें व बुद्धीला आकलन होत नसलें तरी आप्तांच्या वचनावर श्रद्धा ठेवून त्याचा अनुभव घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अनुभव तसाच मिळेल अशी खात्री आप्त देतातच. तीर्थंकरमहात्म्याची बाब अशीच आहे. तीर्थंकर म्हणजे शिवाजी, प्रताप, तैमूरलंग, चेंगिझखान, शिकंदर किंवा नेपोलियन नव्हत कीं त्यांचे इतिहास अजब असले तरी सर्वांना मानावे लागतील. तीर्थंकर म्हणजे रामकृष्णादि अवतारहि नव्हत कीं ज्यांच्या ईश्वरीलीला त्यांच्याशिवाय इतरांना शक्यच नाहींत. रामकृणादि अवतारांप्रमाणें तीर्थंकरांमध्येंहि कांहीं विशेष आहेतच कीं जे इतरांना प्राप्त होणें शक्य नाहीं. तथापि अवतारांचे चमत्कार जसे अविश्वसनीय व जगविलक्षण असतात तसे कांहीं तीर्थंकरांचे विशेष नसतात. ते पूर्णपणें शास्त्र-सिद्ध व स्वाभाविक असतात. उपमाच द्यावयाची झाल्यास परिस व किमयेची देता येईल. अवतारांचे चमत्कार म्हणजे परिस जवळ असल्यामुळें लोखंडाचें सोनें बनविणाऱ्याप्रमाणें होत, व तीर्थंकरांचे विशेष हे किमया जाणणाऱ्या सुवर्ण-कारासारखे आहेत. परिस व किमया विद्या हीं दोन्ही दुर्मिळच; पण किमियेची विद्या प्रयत्न करणाऱ्या थोड्यांना तरी मिळवितां येते. उलट परिसाला अस्तित्वच नाहीं. एकंदरींत तीर्थंकरांचे विशेष कितीहि विलक्षण वाटले तरी त्यांना शास्त्रसिद्ध अस्तित्व आहे. हें जाणून वाचकानीं सम्यक् श्रद्धावान बनलें पाहिजे. उगीच भोळी श्रद्धा ठेवण्याचें कारण नाहीं. ती अनिष्टच होय.

तीर्थंकर म्हणजे तीर्थकारक किंवा तीर्थप्रवर्तक. जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या आत्म्यांना तरून जाण्याचा मार्ग जे दाखवून देतात ते तीर्थंकर होत. पण तरून जाण्याचा मार्ग आम्ही दाखवितों असें अनंतव्यसनी फटिंगबावा-पासून प्रत्येक धर्माच्या शास्त्रीपंडितांपर्यंत व साधुमहात्म्यापर्यंत प्रत्येकजण सांगत आला आहे. त्यांचे उपदेशहि मूलत: बरेच जुळत असले तरी त्यांमध्यें जी इतर मतलबी भेसळ करण्यांत आलेली असते त्यामुळें त्या मूळ सिद्धांतांनाहि हरताळ फासला जातो. समकित बोध व मिथ्या बोध यांमधील फरक हाच. कोणताहि बोध श्रेष्ठच आहे. पण जो बोध निर्हेतुक असेल तोच विशुद्ध व परि-णामकारक असूं शकतो. ज्याला वाणी आहे तो प्रत्येक बोधवाणी उच्चारूं शकेल. पण त्याचीच बोधवाणी शुद्ध व परिणामकारक असूं शकेल कीं जो स्वत: शुद्ध व ज्ञानदर्शन चारित्रबलधारी असेल. कांहीं प्रमाणांत या गोष्टींचा अनुभव सर्वांना नित्य येतोच. आतां असा पूर्ण शुद्ध व बलशाली आत्मा कोण असूं-

शकेल ? जो वीतराग, विदेही व सच्चिदानंदरूप बनला असेल तोच असूं शकणार ! इतिहासांत ज्यांचीं चरित्रें दाखल होतात ते देह, धन, लोक, विद्या वगैरे लौकिकबलांचे जोरावर पुढें आलेले असतात. जे अवतारी पुरुष पुराणांतून वर्णिलेले आहेत तेहि इतके मोठे क्रांतीकारक होते कीं, असा फेरबदल कसा घडूं शकला याचें लोकांना आश्चर्य वाटून त्यांनीं दैवीशक्तीचा आरोप त्या अवतारी व्यक्तीवर केलेला असतो. पण ते अवतारी पुरुषहि नाशिवंत बलाचे जोरावरच क्रांतिकारक ठरलेले असतात. तीर्थंकरांचें तसें नाहीं. ते जगांतील कोणच्याहि वस्तूचा उपयोग करीत नाहींत, फार काय स्वदेहबलहि वापरीत नाहींत. केवळ त्यांची आत्मशक्तीच काम करीत असते. या आत्मबलाचे जोरावरच जगांत वावरून ज्यानें उपदेश केला त्याचाच उपदेश सर्वस्वी आत्मसाधक होऊं शकेल हें उघडच होय.

हा आत्मबलशाली पुरुष कसा असतो त्याचें वर्णन म्हणजेच तीर्थंकरमाहात्म्य. मुक्त झालेल्या सिद्धांनाहि हें आत्मबल असतें. त्यांचा आदर्श मुमुक्षूना उपयोगी पडतो, पण ते कांहीं तीर्थंकर नव्हत. तीर्थंकर केवळ आदर्शच बनून रहात नाहींत तर तो आदर्श गांठण्याचा मार्ग भव्य जीवांना दाखवितात व त्या मार्गावरून भव्यांना नेतातहि. असे तीर्थंकर अर्थातच ठराविक प्रमाणांत व ठराविक वेळींच होणार. निसर्गांत ज्याप्रमाणें प्रत्येक घडामोडीला नियम आहे त्याचप्रमाणें यालाहि नियम आहे. क्रांतीची जरूर असेल त्याच वेळीं क्रांतीकारक प्रभावशाली पुरुष निर्माण होतात व धर्माची ग्लानी होईल तेव्हांच अवतारी पुरुष उत्पन्न होतात. तसेंच असंख्य जीवांची मुक्त होण्याची वेळ जेव्हां आली असेल तेव्हांच तीर्थंकर पैदा होणार व अशा वेळांहि फारच थोडया असणार. जैनशास्त्राप्रमाणें एक कल्प, वीस कोडाकोडी सागरोपम वर्षांचा असतो. त्याचे दोन भेद आहेत. एक उत्सर्पिणी व दुसरा अवसर्पिणी. या प्रत्येकाचे सहा प्रकार आहेत. दुखमा दुखमा २१ हजार वर्षें (२) दुखमा २१ हजार वर्षें (३) दुखमा सुखमा कोडाकोडी सागर उणे बेचाळीस हजार वर्षें. (४) सुखमा दुखमा दोन कोडाकोडी सागर (५) सुखमा तीन कोडाकोडी सागर व (६) सुखमा सुखमा चार कोडाकोडी सागर हा उत्सर्पिणी काळ व नंतर पुन्हां हा सहावा प्रकार सुरू होऊन पहिल्यापर्यंत जाणारा काळ अवसर्पिणी होय. उत्सर्पिणीच्या तिसऱ्या व अवसर्पिणीच्या चवथ्या काळांत तीर्थंकर उत्पन्न

होतात, व मोक्षमार्ग दाखवून देऊन भव्य जीवांना त्या मार्गावर आणतात. उत्सर्पिणी कालाचे पहिले तीन व अवसर्पिणी कालाचे शेवटले तीन काळ कर्मभूमीचे व इतर भोगभूमीचे मानले जातात. हें कालचक्र सतत फिरत असल्यामुळें काल अनंत म्हटलेला आहे. प्रत्येक कल्पांत चोवीसच तीर्थंकर होतात असें आप्तवचन आहे. या कालाचे भूत, वर्तमान व भविष्य असे भेद पडणारच व त्याप्रमाणें तीर्थंकर चोवीसींहि भिन्नभिन्नच आहे. भूतकालीन तीर्थंकर खालील प्रमाणें होऊन गेले. निर्वाण, सागर, महासाधू, विमलप्रभु, श्रीधर, सुदत्त, अमलप्रभु, उद्धर, अंगिर, सन्मति, सिंधुनाथ, कुसुमांजलि, शिवगण, उत्साह, ज्ञानेश्वर, परमेश्वर, निर्मलेश्वर, यशोधर, कृष्णमति, ज्ञानमति, शुद्धमति, श्रीभद्र, अतिकांति व शांति. चालू कल्पांत खालीलप्रमाणें तीर्थंकर होऊन गेले आहेत. वृषभ, अजित, संभव, अभिनंदन, सुमति, पद्मप्रभु, सुपार्श्व, चंद्रप्रभु, पुष्पदंत, शीतल, श्रेयांस, वासुपूज्य, विमल, अनंत, धर्म, शांति, कुंथु, अरह, मल्लि, मुनिसुव्रत, नमि, नेमि, पार्श्व व वर्धमान. भविष्यकालिन खालीलप्रमाणें चोवीस तीर्थंकर होणार आहेत. महापद्म, सुरदेव, सुपार्श्व, स्वयंप्रभ, सर्वात्मभूत, श्रीदेव, कुलपुत्र, उदंक, प्रोष्ठिल, जयकीर्ति, मुनिसुव्रत, अरह, निष्पाप, निष्कषाय, विपुल, निर्मल, चित्रगुप्त, समाधिगुप्त, स्वयंभु, अनिवृत्त, जयनाथ, विमलनाथ, देवपाल व अनंतवीर्य.

उन्हाळ्यानंतर पावसाळा ज्याप्रमाणें निश्चितपणें येणार त्याचप्रमाणें तीर्थंकरांचें आगमन निश्चित आहे. आजपर्यंत ते ठरल्यावेळीं निश्चितपणें होत आले आहे व पुढेंहि होईल. ज्यांना स्वावलंबनाचे बळावर कर्मक्षय करून मोक्ष प्राप्त करून घेतां येत असेल त्यांना तसें करतां येईल, पण ज्या भव्यजीवांना परसहाय्याची अपेक्षा असते त्यांनी तीर्थंकरांचा काल तरी दवडूं नये. तीर्थंकर या भूलोवर असतांना मोक्षदायक वाणीचा वर्षाव होत असतो. त्याच वेळीं कर्मांचें माजलेलें तण काढून टाकून व तपश्चर्येची मशागत करून जर भव्य जीव मोक्षबीज पेरतील तर मुक्तीचें फळ त्यांना मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. तीर्थंकरांचें आगमन स्वाभाविक आहे. सूर्योदय झाला म्हणजे जसें सर्वांना ऊन म्हणजे काय तें आपोआप कळतें त्याचप्रमाणें तीर्थंकरांचें निश्चित वेळीं आगमन झालें कीं, चतुर्गतींतील भव्यजीव त्यांच्याकडे जातातच. राम, कृष्ण, बुद्ध, खिस्त, महमद वगैरेंना लोक त्यांच्या हयातीनंतर मानूं लागले. त्यांच्या हयातींत

त्यांना कोणी ओळखलें नाहीं. व कांहींजणांचा तर छळच झाला. पण तीर्थंकरांचें तसें नाहीं. त्यांची खूण भव्यात्म्यांना पटतेच. त्यांचा छळ झाला तर तो त्यांच्या पूर्वकर्मांचाच उदय होय; व गौरव होतो तोहि त्यांच्या आत्मतेजाचाच परिणाम होय. त्यांना कोणी शत्रूच नसल्यामुळें त्यांचा छळ कोणी करीत नाहीं, व त्यांचें माहात्म्य वर्णावयास भक्तांची व पट्टशिष्यांचीहि जरूर नाहीं. पाणी तृषा शमन करतें म्हणून सांगावें लागत नाहीं, व तहानेलेल्याला पाणी पी म्हणून सांगावेंहि लागत नाहीं, तीर्थंकर स्वयंप्रकाशी असतात व त्यांच्याकडे आकर्षिले जाणें हा सर्व भव्यजीवांचा स्वभावच आहे.

आतां असे तीर्थंकर कोण होऊं शकतात तें जैनशास्त्रांत खालीलप्रमाणें वर्णिलेलें आहे. तीर्थंकरजीवाची तयारी अनेक पूर्वजन्मांतूनच होत असते. उदाहरणार्थ राम व कृष्ण चक्रवर्तींना होऊन कितीतरी पिढ्या लोटून गेल्या, पण ते भविष्यकाळीं तीर्थंकर होणार आहेत. तशी त्यांची तयारी चालू आहे व कांहीं झालेली आहे. षोडशकारणभावना ज्या जीवाला झाल्या तो तीर्थंकर होणारच. त्या भावना पूर्णपणें एखाद्या जीवाला झाल्या कीं नंतरच्या तिसऱ्या जन्मांतच तो तीर्थंकर होतो असा नियम आहे. या भावना काय आहेत तेंच आतां पाहूं. पहिली भावना दर्शनविशुद्धि. सम्यक्ज्ञान, सम्यक्दर्शन व सम्यक्चारित्र ही रत्नत्रयी प्राप्त झाल्याशिवाय मोक्षदशा साधत नाहीं. देवमूढत्व, लोकमूढत्व व पाखंडीमूढत्व असें मूढत्रय; जाति, कुल, ऐश्वर्य, रूप, ज्ञान, बळ, तप व कीर्ति या अष्टकाचा अभिमान म्हणजे अष्टमद; कुदेव, कुगुरु व कुशास्त्र व तीन्हींचे उपासक मिळून सहा अन्यायतनें; आणि शंका, कांक्षा, जुगुप्सा, मूढदृष्टि, अनूपगूहन, अस्थितिकरण, अवात्सल्य व अमार्गप्रभावना हे आठ दोष यामुळें दर्शनमलीन होतें हें जाणून त्यांचा त्याग करणें ही दर्शनविशुद्धि होय. ही पहिली भावना तीर्थंकरत्व प्राप्त होण्यास आवश्यक आहे. दुसरी भावना विनयसंपन्नता. दर्शनविनय, ज्ञानविनय, चारित्रविनय, तपविनय व उपचारविनय हे पांच विनय ज्या जीवांत आले तोच तीर्थंकर गोत्र बांधू शकतो. चारित्रविशुद्धि म्हणजे शीलव्रतेष्वनतिचारः ही तिसरी भावना होय. अतिचारविरहित चारित्र पाळलें म्हणजे ही तिसरी भावना पूर्ण होते. ज्ञानविशुद्धि म्हणजे अभीक्ष्णज्ञानोपयोग ही चवथी भावना होय. शुद्ध ज्ञानप्राप्तीसाठीं झटल्यानें ही भावना पूर्ण होते. पांचवी संवेगभावना म्हणजे विवेकयुक्त वैराग्य. शक्तितस्त्याग-

भावना ही सहावी. यथाशक्ति त्याग करीत राहिल्यानें ही भावना पूर्ण होते. अंतरंग व बहिरंग मोह सोडून तपश्चर्या केल्यानें सातवी भावना पूर्ण होते. नेहमीं साधुसमाधींत लीन असणें ही आठवी भावना होय. दहा प्रकारचें वैयावृत्य म्हणजे सत्सेवा केल्यानें नववी भावना पूर्ण होते. अर्हद्भक्तींत नेहमीं रममाण असणें ही दहावी भावना होय. जैनाचार्यांची सेवा करणें ही अकरावी भावना. बहुश्रुत उपाध्यायांची भक्ति करणें व जिन-वाणीचें अध्ययन करणें ही अनुक्रमें बारावी व तेरावी भावना होय. सामायिक, स्तवन, वंदना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान व कायोत्सर्ग अशा सहा आवश्यक क्रिया आहेत. त्या नियमितपणें नित्य केल्यानें चौदावी आवश्यक परिहानि भावना प्राप्त होते. जिनमार्ग प्रभावना ही पंधरावी भावना. प्रवचनवत्सलत्व ही सोळावी भावना. पहिल्या चौदा भावना आत्मबल प्राप्त होण्यासाठींच आहेत व नंतरच्या दोन तर आत्मबलप्राप्तीच्या मार्गावरून इतर भव्यजीवांना नेणाऱ्या तीर्थंकराला तर फारच आवश्यक आहेत. वरील षोडशभावना भाविल्यामुळें भव्यजीवाला तीर्थंकरत्वाची पात्रता येते. जशी तीर्थंकरत्वाच्या संख्येला मर्यादा आहे तशीच ज्यांच्याकडून या षोडशभावना पूर्ण होतील अशा भव्यजीवानांहि परिमिती आहे हें सांगणें नकोच.

तीर्थंकरत्व प्राप्त होण्यास पूर्वजन्मांतून कोणती तयारी व्हावी लागते त्याचें वर्णन वर केलें. आतां तीर्थंकराला जे चौतीस अतिशय असतात ते कोणते तें पाहूं. जन्मकाळचे दहा अतिशय खालीलप्रमाणें आहेत. बालतीर्थंकराला मलमूल नाहीं. ( २ ) घाम येत नाहीं. ( ३ ) वाणी मधुर व हितकारी असते. ( ४ ) रूप लावण्य उत्तम असतें. ( ५ ) रक्त दुधासारखें असतें. ( ६ ) शरीर सुगंधित असतें. ( ७ ) देहयष्टि सुंदर असते. ( ८ ) शरीर वज्रासारखें असतें. ( ९ ) देहा-वर १००८ शुभ लक्षणें असतात. ( १० ) बाल तीर्थंकर अनंत बलशाली असतो. इतका कीं नुसत्या हलण्यानेंहि मेरुपर्वत हालवूं शकतो. पुढें केवलज्ञान प्राप्त झाल्यानंतर तीर्थंकराच्या देहांत दहा बदल होतात. ते खालीलप्रमाणें. ( १ ) तीर्थंकर चतुर्मुख दिसतात. ( २ ) त्याचें गमन अधर असतें. ( ३ ) त्यांना कोणताहि उपसर्ग बाधूं शकत नाहीं. ( ४ ) त्यांना आहार घ्यावा लागत नाहीं. ( ५ ) त्यांची सावली पडत नाहीं. ( ६ ) देहयष्टी स्फटिकवत् असते. ( ७ ) नख व केस वाढत नाहींत ( ८ ) पापण्या लवत नाहींत ( ९ ) ते

सर्व विद्यांत पारंगत असतात व ( १० ) त्यांच्या प्रभावानें आसपास शंभर योजनांतील दुर्भिक्ष नष्ट होतें. तीर्थकरांना देवगतींचे इंद्रादिक जीव आठ प्रातिहार्य करतात ते खालीलप्रमाणें. सिंहासन, छत्रत्रय, चौसष्ठ चामरें, पुष्पवृष्टि, अशोकवृक्ष, भामंडल, दुंदुभि व दिव्यध्वनि. याशिवाय खालील चौदा अतिशय देवकृत आहेत. (१) समवसरण ( २ ) प्रफुल्लित पुष्पफल ( ३ ) निर्वैरत्व ( ४ ) स्वच्छभूमि ( ५ ) सुगंधवायु ( ६ ) निरभ्र आकाश ( ७ ) सर्व जीवांना आनंद ( ८ ) जेथें जेथें तीर्थकराचें पाऊल पडेल तेथें तेथें कमलोद्भव ( ९ ) सर्व धान्य प्रफुल्लित होईल ( १० ) जयजयकार शब्द ( ११ ) गंगोदकवृष्टि ( १२ ) धर्मचक्र ( १३ ) सर्व बोध भाषा ( १४ ) छत्र, चामर, ध्वजा, झारी, दर्पण, झंगट व पंखा हीं आठ मंगल द्रव्यें. याप्रमाणें अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंत सुख व अनंतबल हे अनंत चतुष्टय तीर्थकराला असते. मिळून शेचाळीस विशेष गुण झाले. याशिवाय तीर्थकर अष्टादश दोषविरहित असतात. ते दोष खालीलप्रमाणें. (१) क्षुधा ( २ ) तृषा ( ३ ) भय ( ४ ) द्वेष ( ५ ) प्रीति ( ६ ) मोह ( ७ ) चिंता ( ८ ) जरा ( ९ ) मृत्यु ( १० ) खेद ( ११ ) स्वेद ( १२ ) मद ( १३ ) रति ( १४ ) विस्मय (१५) जन्म ( १६ ) निद्रा (१७) रोग व (१८) शोक.

वरीलप्रमाणें तीर्थकराचे विशेष गुण आहेत. हे गुण असतील त्यालाच तीर्थकर म्हणतां येईल. वरील गुणांत अस्वभाविक असें कांहींच नाहीं. तसें वाटलें तरी तें वाटण्याचें कारण अज्ञान होय. तें वर्णन खोटें आहे असें मात्र नव्हे. वरील वर्णन नीट वाचणाऱ्यास तीर्थकर म्हणजे काय याची कल्पना येईल. तीर्थकर म्हणजे जैनांचा देव अशी सामान्य कल्पना रूढ आहे. पण देवाबद्दलच्या कल्पनाहि असंख्य आहेत. महंमदी, ख्रिस्ती, दयानंदी वगैरे मताचे लोक देव निर्गुण, निराकार, सर्वव्यापी व कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु शक्ति असलेला मानतात. पण यापलीकडे ते त्याचें वर्णन करूं शकत नाहींत. कारण तो सगुण नाहींच. हिंदूंतील कांहीं मताचे लोक देव सगुण मानतात. पण त्या गुणांची निश्चिति नाहीं. ' यद् यद्विभूतिमत्सर्वं ' जेथें जेथें कांहीं विशेष दिसेल तेथें तेथें देवांश असणारच, अशी त्यांची समजूत. त्यामुळें कसा अनवस्थाप्रसंग ओढवतो तें सर्वांच्या परिचयाचेंच आहे. वरील कल्पनेमुळें वाटेल तो देव ठरूं शकतो व वाटेल तो गुरु होऊं शकतो. सामान्य व्यवहारांत सुद्धां अशास्त्रीयपणा चालत नाहीं. मग विद्यांची विद्या जी अध्यात्मविद्या तीमध्यें असा गोंधळ कसा खपावा ?

# तीर्थंकरमाहात्म्य

निर्गुण व निराकारवाल्यांची ईश्वराची व्याख्या परिपूर्ण नाहीं व हिंदूंची व्याख्या अतिव्याप्त आहे. तीमध्यें ईश्वरीयत्वाच्या विरुद्ध असलेले गुणहि आलेले आहेत. पण जैनांची ईश्वराची व्याख्या परिपूर्ण व शुद्ध आहे. प्रारंभीं दिलेल्या वचनाप्रमाणें ज्या जीवानें ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय अशा चार प्रकारच्या घातिकर्मांचा नाश केला आहे व जो अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतसुख व अनंतवीर्य असा अनंतचतुष्टयधारी आहे, ज्याचें शरीर सुंदर आहे व आत्मा शुद्ध आहे तो अरिहंत देव समजावा; तोच खरा बलशाली व पवित्र परमात्मा होय. तो सृष्ट्युत्पत्तिस्थितिलय करण्याच्या भानगडींत पडत नाहीं व कोणा जीवांच्या पापपुण्याचा फलदाताहि बनत नाहीं. स्वतः शुद्धात्मस्वरूपी बनून इतर आत्म्यांना मात्र शुद्धस्वरूपी बनण्याचा मार्ग दाखवितो. असा उत्कृष्ट ध्येयस्वरूपी जैनांचा देव आहे व तोच तीर्थंकर होय. किंबहुना जितके जीवात्मे मुक्त होऊन सिद्ध पदवीला गेले ते सर्व जैनांचे देवच होत. ते आपल्याप्रमाणेंच या भवसागरांत पडले होते; पण ते तरून गेल्यामुळें देव झाले व आपल्यासारख्या इतर सर्व प्राणिमात्रांना आदर्शरूप बनले. त्यांना आतां भक्त नाहीं व शत्रूहि नाहीं. त्यांना सर्व कांहीं सारखेंच. त्यांचा आदर्श पुढें ठेऊन आपणहि त्यांच्याप्रमाणेंच केव्हांना केव्हांतरी मुक्त होऊं एवढाच त्यांचा आपणांस उपयोग. इतर सिद्ध जीव आपल्या हयातींत उद्धरून जाण्यास थोड्याबहुत जीवांना कारणीभूत होतात व तीर्थंकर असंख्य जीवांना मुक्त होण्यास कारणीभूत होतात हाच त्या दोहोंमधील फरक. तीर्थंकरांची संख्या परिमित आहे व सिद्ध मात्र अनंत आहेत. प्रारंभीं दिलेल्या दुसऱ्या श्लोकांत सिद्धात्म्यांचें वर्णन आहे. सर्व कर्मांचा नाश करून सर्वज्ञ बनून जे स्वाभाविक स्थितींत शाश्वतपणें राहतात तेच सिद्ध होत, व तेच परमेश्वर होत.

तीर्थंकरांचे विशेष गुण वर वर्णिले आहेत. सामान्य जीव ज्या मार्गानें सिद्ध बनतो त्याच मार्गानें तीर्थंकरहि सिद्ध बनलेले असतात, व सिद्ध केवळी बनल्याशिवाय तीर्थंकरहि होऊं शकत नसल्यामुळें आतां सिद्ध पदवीच्या गुणांचा विचार करूं. सिद्धपद प्राप्त करून घेण्यासाठीं एकादशप्रतिमा सांगितलेल्या आहेत. त्या खालीलप्रमाणें. पहिलीदर्शन प्रतिमा. ही प्रतिमा धारण केल्यानंतर सद्देव, सद्गुरु व सच्छास्त्र याशिवाय इतरांना न मानणें; मद्य, मांस, मध व पंचोदुम्बर सेवन न करणें; जुगार, मांसभक्षण, मद्यपान, वेश्यागमन, शिकार, चौर्यकर्म व

परस्त्रीसेवन हीं सात प्रकारचीं व्यसनें सोडणें आणि प्रत्यहीं जिन-बिंब दर्शन घेणें. या गोष्टी श्रावकानें पाळावयाच्या असतात. दुसरी व्रतप्रतिमा. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या पांच महाव्रतांचें शक्तिनुसार आचरण करणें हे पंचाणु व्रतपालन; दिग्व्रत, अनर्थदंडविरति व भोगोपभोगपरिमाण हीं तीन गुणव्रतें; सामायिक, प्रत्याख्यान, प्रोषधोपवास व वैयावृत्व हीं चार शिक्षाव्रतें; या तिहींचें पालन म्हणजे व्रतप्रतिमा. तिसरी सामायिकप्रतिमा. त्रिकाल ध्यान करणें हीच सामायिक प्रतिमा. चवथी प्रोषधोपवास प्रतिमा. पर्वतिथींना सोळा प्रहर उपवास करणें म्हणजे प्रोषधोपवासप्रतिमा. पांचवी सचित्तत्यागप्रतिमा. जीवसहित वनस्पतींचें ग्रहण न करणें म्हणजे सचित्तत्यागप्रतिमा. सहावी रात्रिभोजनत्याग प्रतिमा. सातवी ब्रह्मचर्यप्रतिमा. या प्रतिमेच्या श्रावकानें स्वस्त्रीचाहि त्याग केला पाहिजे. आठवी आरंभत्यागप्रतिमा. कोणताहि धंदा किंवा नवा व्यवहार न करणें म्हणजे आरंभ त्यागप्रतिमा. नववी परिग्रहत्याग प्रतिमा. मिथ्यात्व, लिंगभेद, राग, द्वेष, हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा, क्रोध, मान, माया, व लोभ हे चौदा अंतरंग परिग्रह व क्षेत्र, वास्तु, हिरण्य, सुवर्ण, धान्य, धन, दासी, दास, कुप्य व भांड हे दहा प्रकारचे बहिरंग परिग्रह मिळून चोवीस परिग्रहांचा त्याग म्हणजे परिग्रह त्यागप्रतिमा. दहावी अनुमति त्यागप्रतिमा. वरील कोणत्याहि कर्मांची इतरानांहि अनुमति न देणें म्हणजे अनुमतित्यागप्रतिमा. अकरावी उद्दिष्टविरतिप्रतिमा. सर्व प्रकारच्या सहेतुक क्रिया करण्याचें सोडणें म्हणजे उद्दिष्टत्यागप्रतिमा. या अकरा प्रतिमा धारण केल्यानंतर श्रावक मुनिदीक्षा घेण्यास लायक होतो. मुनीचे अठ्ठावीस मूळगुण खालीलप्रमाणें आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या महाव्रतांचें पूर्णपणें पालन करणें हे पांच गुण; ईर्या म्हणजे चलनवलनादि क्रिया अहिंसात्मक पणें करणें, भाषासमिति म्हणजे हित, मित व संशयरहित असेच प्रियवचन बोलणें, फक्त एकाच वेळीं पण तेंही निर्दोष आहार घेणें ही एषणासमिति; आपलीं उपकरणें अहिंसात्मक रीतीनें ठेवणें व वापरणें ही आदाननिक्षेपण-समिति व जंतुरहित स्थानीं जीवोत्पत्ति न होईल अशा रीतीनें मल-मूत्रत्याग करणें ही उत्सर्गसमिति अशा पांच समिति पाळणें; सामायिक, स्तवन, वंदना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान व कायोत्सर्ग अशा षडावश्यक क्रिया करणें आणि पांच इंद्रियांचे विषय सोडणें, मिळून एकवीस गुण झाले.

शिवाय वस्त्रत्याग म्हणजे दिगंबरत्व, केशलोच म्हणजे केश उपटून काढणें, एकभुक्तता, उभें राहून भोजन करणें, पात्रें न वापरणें, स्नान न करणें व दंतधावन न करणें हे सात गुण एकंदर अठ्ठावीस मूळ गुण झाले. दिगंबरमुनींनें भूमीवर शयन केलें पाहिजे व खालील बावीस परीषह सहन केले पाहिजेत. क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, मशकदंश, नग्नता, अरति, स्त्रीत्याग, चर्या, निषद्या, शय्या, आक्रोश, वध, याचना, अलाभ, रोग, तृणस्पर्श, मल, सत्कारपुरस्कार, प्रज्ञा, अज्ञान व अदर्शन. मुनींनें आर्त, रौद्र व धर्मध्यान सोडून केवळ शुक्लध्यानांतच नेहमीं मग्न असलें पाहिजे. याप्रमाणें वागलें असतां सर्व कर्मांचा क्षय होऊन मोक्षप्राप्ति होऊन सिद्ध पदवी प्राप्त होते.

'चणे खावे लोखंडाचे तेव्हां ब्रह्मपदीं नाचे' अशी म्हणच आहे. वरील व्रताचरण किती कठीण आहे तें सर्वांच्या ध्यानांत येईल. तें निरर्थक नसून अगदीं आवश्यक आहे. अनंत कालापासून जडत आलेला कर्मबंध एकदम सुटणें शक्य नाहीं. त्यासाठीं सावधानपणें वरीलप्रमाणें तपाचरण केलेंच पाहिजे. वरीलप्रमाणें आचरण होणेंच शक्य नाहीं असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. करारी मनुष्याला कांहींच अशक्य नाहीं व आजपर्यंत अनेक मुनिजन वरील प्रकारची तपश्चर्या करुन मोक्षाला जात आले आहेत. वरील व्रतें पाळणें हें येरागबाळाचें काम नव्हे हें खरें व म्हणूनच असे मुनि फारच थोडे असतात. पण तसें तपश्चरण केल्याशिवाय जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका होणार नाहीं हें मात्र निश्चित. साधूचें ढोंग करुन अध्यात्म साधत नसतें. तें साधुत्व खरेंखुरेंच पाहिजे. सेंट पॉलनें म्हटलें आहे कीं, 'जर मृतात्मे जीवंत होत नसतील तर ख्रिस्तहि झालाच नाहीं.' कर्ममलामुळें आत्मा जडवत् बनला आहे. तो जागृत होणें शक्य आहे. हीच गोष्ट जर अशक्य असेल तर तीर्थंकरहि झालेच नाहींत असें म्हणतां येईल, एरव्हीं नाहीं. अज्ञानी जीव ज्ञानी बनतांना व पापी पुण्यशाली बनतांना आपण नेहमीं पाहतों त्याचप्रमाणें पुद्गलाचें दास्य सोडून आत्मा स्वतंत्र व पूर्ण बलशाली होणेंही अशक्य नाहीं. आत्म्याचें सामर्थ्य किती आहे, त्याची जाणीव तीर्थंकरांचें माहात्म्य वाचल्यानंतर होते. त्या सामर्थ्याची थोडीबहुत जाणीव म. गांधी व इतर टॉलस्टायादि साधुसंतांच्या चरित्रावरुन होतेच. पण हे साधुमहात्मे साधनावस्थेंतच असतात. जो सिद्ध बनला त्याचें सामर्थ्य काय वर्णावें? तें इंद्रियांना अगोचर आहे व म्हणूनच

अवर्णनीय आहे. तथापि त्याचें वर्णन करूं लागल्यास येथवर दिलेल्या तीर्थंकरांच्या वर्णनाप्रमाणेंच होईल व श्रद्धाहीन सामान्य जनांना ते विश्वसनीयहि वाटणार नाहीं. ती त्यांची पामरता आहे, पण तीर्थंकरत्वाला व सिद्ध पदवीला अस्तित्व आहे व तीच आत्म्याची स्वाभाविक स्थिति आहे यांत मुळींच शंका नाहीं. असो.

ज्या दर्जाच्या महापुरुषाचें चरित्र आम्ही लिहावयास घेतलें आहे त्याचें माहात्म्य प्रथम थोडेंबहुत कळावें म्हणून वरील विवेचन केलें आहे. त्यावरून शिवाजी, प्रताप वगैरे ऐतिहासिक व रामकृष्णादि पौराणिक थोर पुरुषांहून आणि ख्रिस्त, महंमद, बुद्ध वगैरे धर्मसंस्थापकांहून महावीरस्वामींसारखे तीर्थंकर अगदीं निराळ्या प्रकारचे महात्मे होत ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत येईल. त्यांचें चरित्र म्हणजे प्रत्यक्ष आत्मस्वरूपाचेंच खरेखुरें वर्णन. त्याच दृष्टीनें अर्थात् या चरित्राकडे पाहिलें पाहिजे. हें पौराणिक वाङ नव्हे, एखादी कृत्रिम नवलकथा नव्हे, सामान्य इतिहास नव्हे, किंवा अद्भुत वर्णनांचें मनोरंजक साधनहि नव्हे. बालजीवांना तें आकलन झालें नाहीं तरी प्रत्येक जीवात्मा केव्हांना केव्हांतरी सिद्ध पदवी प्राप्त होणार आहे. म्हणून लौकिक दृष्टि सोडून जर केवळ अध्यात्मिक दृष्टीनें हें चरित्र वाचक वाचतील तर त्यांच्या आत्म्यावरहि शुभ परिणाम होतील व शुद्धात्म्याचें महत्त्व जाणण्यास तरी निदान ते खास पात्र होतील. त्या सामर्थ्याची एकदां ओळख झाली म्हणजे आपल्या अंगीं ते बाणून घेण्याचीहि बुद्धि होईल व मार्गहि सुचेल आणि नंतर तो मार्ग आक्रमिण्याची ताकदहि येईल. सर्व भव्य वाचकांना या चरित्रवाचनानें तशी स्फूर्ति होवो हीच तीव्र इच्छा.

## प्रकरण २ रें.

# जैनधर्माचें प्राचीनत्व.

**सर्वमङ्गलमाङ्गल्यं सर्वं कल्याणकारकम् ।**
**प्रधानं सर्वधर्मांनां जैनं जयतु शासनम् ॥**

या विश्वांतील घडामोडींच्या मुळाशीं जाऊन जर आम्ही विचार करूं लागलों तर ही गोष्ट स्पष्ट दिसून येणारी आहे कीं, त्या घडोमोडीच्या मुळाशीं कोणतींतरी दोन परस्पर भिन्न भिन्न अशीं अनाद्यनंत तत्त्वें असलीं पाहिजेत. जगांतील सर्व व्यवहार जसजसे अधिकाधिक सूक्ष्म रीतीनें पाहावे तसतसें अधिकाधिक हें स्पष्ट होत जातें कीं, विश्वाचीं मूलतत्त्वें कमींत कमी दोन असलींच पाहिजेत. या दोन तत्त्वांच्या निरनिराळ्या संबंधानें (मिश्रणानें)च जगांतील असंख्य विचित्र गोष्टी बनलेल्या आहेत. या दोन तत्त्वांपैकीं कोण श्रेष्ठ आहे व तीं कशीं निर्माण झालीं याबद्दल भिन्न भिन्न मतें आहेत व जोंपर्यंत ही गोष्ट इंद्रियगोचर नाहीं तोंपर्यंत असे हे भिन्नभिन्न तर्क चालणारच. कोणी म्हणतात कीं, हीं दोन्ही तत्त्वें स्वतंत्र सत्ताधीश आहेत व स्वयंभूहि आहेत; कोणी म्हणतात कीं, आत्मतत्त्वांतूनच प्रकृतितत्व निर्माण झालें; कोणी असेंहि म्हणतात कीं, प्रकृतितत्त्वाला निराळें अस्तित्वच नाहीं; तो आत्मतत्वावरील निव्वळ आभास आहे. उलट कोणी असेंहि म्हणतात कीं, प्रकृतितत्वच मुख्य आहे व चेतन किंवा आत्मतत्व यांतूनच निर्माण होतें. पण याप्रमाणें कितीहि मतें असलीं तरी शेवटीं दोन मूलतत्त्वांबद्दलच वाद असतो. नैयायिक व वैशेषिक मताप्रमाणें सोळा किंवा तेवीस मूलतत्वें आहेत. अलीकडील संशोधक मूलतत्वें ऐंसष्ट किंवा त्यांहूनही अधिक आहेत असें सिद्ध करतात. पण त्यांचें संशोधन अजून प्रयोगावस्थेंतच आहे. वरील दोन मूलतत्वांना चेतन व जड; आत्मा व प्रकृति; ईश्वर व सृष्टि; शक्ति व साहित्य वगैरे निरनिराळीं नावें भिन्नभिन्न तत्वज्ञानांतून दिलेलीं आहेत. हीं दोन्हीं तत्वें एकच आहेत किंवा दोन तत्वें नाहींत असें मानणाऱ्यांचीही दिशाभूल चैतन्याच्या भिन्न भिन्न स्वरूपामुळें झालेली आहे. नदीच्या प्रवाहांतील चैतन्य

व माशाचें चैतन्य; मोटारीचें चैतन्य व मुंगीतील चैतन्य; थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पंच भूतांतील चैतन्य व प्राणीमात्रांतील चैतन्य किंवा आत्मतत्वांतील चेतन्यशक्ति व जडत्वांतील स्फुरणशक्ति यांतील भेद बहिरात्म्यांना किंवा बाळजीवांना उमगत नाहीं व म्हणून ते पंचभूतांच्या रसायनांतूनच आत्मतत्व उत्पन्न होईल असें मानतात किंवा हें विश्व म्हणजे एकमेव आत्मतत्वाचीच लीला आहे असें समजतात. पण या दोन्ही तत्वांतील भेद जर अनुभव चक्षूनें जाणला तर त्या दोन्ही तत्वांत जमीनअस्मानाचा फेर आहे हें कळून आल्याशिवाय राहणार नाहीं. चेतन व जड हीं दोन्ही तत्वें शाश्वत पण परिवर्तनशील व म्हणूनच एकच स्वरूपाच्या दृष्टीनें अशाश्वत आहेत. दोहोंचीं रूपांतरें होतात पण दोन्ही कधींहि सर्वथा नाश पावत नाहींत. म्हणूनच सर्वज्ञ तीर्थंकर व सिद्धांनीं चेतन व जड हीं दोन्ही तत्वें भिन्न असून अनाद्यनंत आहेत असें म्हटलें आहे.

जड व चेतन हीं दोन्ही तत्वें अनादि व अनंत असल्यामुळें त्या दोघांचे संबंधहि अनादि व अनंतच असणार. बरेंवाईट व सुखदुःख हीं द्वंद्वेंहि ह्या संबंधामुळेंच उत्पन्न झालीं व तींहि अनाद्यनंतच आहेत. जडाहून चैतन्य अधिक शक्तिमान व शाश्वत सुखमय आहे, असा सर्व ज्ञान्यांचा अनुभव आहे. प्राकृतिक सुखापेक्षां आत्मिक सुख श्रेष्ठ होय व जडत्वाहून आत्मतत्वाकडे अधिक लक्ष पुरविणें हें प्रकृतिपुरुषयुक्त अशा मानव देहधाऱ्याचें कर्तव्य आहे असा सिद्धान्त सर्व ज्ञानी महात्म्यांनीं एकमतानें प्रस्थापित केलेला आहे. म्हणूनच शुद्ध आत्म–तत्व हें बरें व जडबद्ध आत्मतत्व वाईट होय. हा बऱ्यावाईटाचा झगडा नेहमींचाच आहे, व तो सर्व धर्मग्रंथांतून वर्णिलेला आहे. आत्मवृत्ति व कषाय, देव व दानव, अहुरमज्द व अहिरमन बुद्ध व मार, सत्प्रवृत्ति व असत्प्रवृत्ति, पांडव व कौरव आणि वानर व राक्षस, पवित्रात्मा व सैतान वगैरे झगडे बऱ्या व वाईट प्रवृत्तिमधीलच होत. हा झगडा प्रत्येक व्यक्तीच्या हृदयांतहि सतत चालूच आहे. कधीं बऱ्याचा प्रभाव तर कधीं वाईटाचा प्रभाव दिसून येतो. कालाचेंहि उत्सर्पिणी व अवसर्पिणी असे भेद या दृष्टीनेंच पडलेले आहेत. बऱ्यावाईटामध्यें कमीजास्त प्रमाण दिसून येईल, पण सर्वस्वी नाश कधींहि होणार नाहीं. म्हणून धर्म व अधर्म हीं दोन्ही अशीं अनाद्यनंतच आहेत.

वरील दृष्टीनें विचार केला असतां अलीकडील धर्मशास्त्र्यांची व इतिहास-

ह्यांची कोती दृष्टि स्पष्ट होते. वेदशास्त्रसंपन्न म्हणतात कीं, हें विश्व परब्रह्मांतून उत्पन्न झालें व उत्पत्तिस्थितिलय ब्रह्माविष्णुमहेश करतात. ख्रिश्चन मिशनरी म्हणतात कीं आकाशांतील बापानें हें जग सहा दिवसांत निर्माण केलें व सातवे दिवशीं विश्रांती घेतली. मुल्ला मोलवीहि अशाच तऱ्हेनें हें जग अल्लानें पैदा केलें असें म्हणतात. हल्लींचे इतिहासज्ञहि आपल्या ज्ञानाच्या घमेंडींत असेंच म्हणतात कीं, धर्मज्ञानाची उत्क्रांति अलीकडे होऊं लागली व पूर्वी ही मानव जाति अगदीं रानटी अवस्थेंत होती. या कोत्या दृष्टीची जेवढी कींव करावी तेवढी थोडीच. सुधारलेले व रानटी, बरें व वाईट, सुख व दुःख वगैरे सर्व द्वंद्वें तिन्ही कालीं असतात म्हणजे ती अनादि अनंत आहेत. काल अनंत आहे व जीवहि अनंत आहेत; तेव्हां घडामोडीहि असंख्य झाल्या असणारच.

वरीलप्रमाणें वस्तुस्थिति असली तरी मनुष्याची बुद्धि जोंपर्यंत पोहोंचते तेथपर्यंतच्या अतीत व अनागतकालाबद्दलच तेवढी वर्तमानकालीं चर्चा करणें वावगें नाहीं. मात्र वर वर्णिलेली कोती दृष्टि असूं नये. वस्तुतः इतिहास अनाद्यनंत व भविष्य अगम्य आहे; तथापि प्रचलित कल्पनेप्रमाणें ऐतिहासिक दृष्टीनें विचार करूं. जैनधर्मग्रंथानुसार सत्त्वीसावर एकशेचाळीस शून्यें दिलीं असतां जी संख्या होते तितक्या वर्षांचा जुना इतिहास आहे. वैदिक धर्मग्रंथावरून जुना इतिहास इ. स. पूर्व १९७२९४७१०१ इतक्या वर्षांचा प्राचीन आहे. पारसी धर्मग्रंथानुसार सहावर एकशेवीस शून्यें दिलीं असतां जी संख्या होते तितक्या वर्षांचा जुना इतिहास आहे. यहुदी व ख्रिस्त धर्मग्रंथानुसार इ. स. पू. ४००४०व्या वर्षी सृष्टीची उत्पत्ति झाली असें मानण्यांत येतें. भूगर्भशास्त्रवेत्त्यांच्या दृष्टीनें सृष्टीचा आरंभ होऊन कमीत कमी वीस हजार वर्षे झालीं असलीं पाहिजेत असें सिद्ध झालें आहे. मि. जे. एम्. केनेडी लिहितात कीं, आर्य जातीची उत्पत्ति इ. स. पूर्वी साठ हजार वर्षांपलीकडची आहे. वरीलप्रमाणें इतिहासकालाबद्दल असंख्य विचार आहेत. मनुष्यजाति सर्वत्र पूर्वीपासून आहे कीं ती कोणत्या तरी एका देशांत अमुक कालीं उत्पन्न झाली याबद्दलहि बरेच अभिप्राय आहेत. लो. टिळकांनीं वेद ग्रंथाधारें उत्तर ध्रुवाजवळ सहा हजार वर्षांपूर्वी मनुष्यजाति होती असें सिद्ध केलें आहे. मनुस्मृतींत ती सप्तमनूपासून कुरुक्षेत्रांत उत्पन्न झाली असें लिहिलें आहे. पं. रमेशचंद्र म्हणतात कीं मोंगोलियांत प्रथम ती निर्माण झाली व श्री. बी. सी. मुजुमदार म्हणतात कीं ती हिमालयाचे पायथ्याजवळ झाली.

सर वाल्टर रॅले वगैरे पाश्चिमात्य विद्वानांचेंहि असेंच मत आहे. मिश्र देशांतील शिलालेखावरून तेथील लोक प्रथम हिंदुस्थानचे रहिवासी असले पाहिजेत असें दिसून येतें. डॉ. अलेक्झांडर डेलमारनीं सिद्ध केलें आहे कीं, कोलंबसनें अमेरिका शोधून काढण्याचे पूर्वी भारतवासियांचें अमेरिकेशीं चांगलें दळणवळण होतें. मि. कौंट जॉर्ज्स यांनींहि असें सिद्ध केलें आहे कीं, भारतवर्षांतील संस्कृतीची छाप इतर सर्व राष्ट्रांतील लोकांवर पडलेली आहे. एकंदरींत आजकालच्या इतिहासावरूनहि ही गोष्ट सिद्ध होते कीं, भारतवर्षांत मानवजाति फार प्राचीनकाळापासून नांदत आहे. आज जो कांहीं इतिहास प्रत्यक्ष साधनांनीं उपलब्ध होत आहे त्यांत भारतीय संस्कृतीचेंच प्राचीनत्व दिसून येतें.

काल जसा अनादि व अनंत आहे आणि चेतन, जड वगैरे मूलतत्वेंहि अनाद्यनंत आहेत तसाच धर्महि अनादि व अनंतच आहे. कालचक्र बारा आऱ्यांचें असून तें सतत फिरत असतें. कांहीं आऱ्यांतून धर्माची प्रभावना होत असते व कांहींतून धर्माला ग्लानि येत असली तरी धर्म हा नेहमींच असतो. तथापि अलीकडील पद्धतीनुसार प्रत्यक्ष साधनावरूनहि जैनधर्माचें प्राचिनत्व सिद्ध होतें. येशू ख्रिस्तानें ख्रिश्चनधर्म, महंमदानें मुसलमानीधर्म व बुद्धानें बौद्धधर्म जसा स्थापन केला तसा कांहीं जैनधर्म महावीरस्वामींनीं स्थापन केलेला नाहीं. वीरशैव धर्म जसा पंचाचार्यांनीं स्थापन केला व नंतर अनेक प्रमथांनीं त्याचा पुनरुद्धार केला तसा ऋषभादि चोवीस तीर्थंकरांनीं जैनधर्माचा पुनरुद्धार केला एवढेंच. वैदिकधर्मांत निरनिराळ्या वेळीं अनेक पंथ झालेले आहेत, पण सर्वांचा आधार वेदग्रंथच मानला जातो. तसा जैनधर्माचा एक ग्रंथ सांगतां येणार नाहीं. पण जैनधर्माची अविच्छिन्न परंपरा दाखवितां येईल. तीर्थंकरांचें अजब वर्णन असलें तरी त्यांचें अस्तित्व नाकारण्याचें जसें कारण नाहीं तसेंच या वेदग्रंथांतूनहि तीर्थंकरांचीं नांवें मिळत असल्यामुळें हें तीर्थंकर झालेच नाहींत असें म्हणतां येणार नाहीं. चोवीस तीर्थंकर प्रत्येक कालांत होत आले आहेत. पण सर्वांत प्राचीन उपलब्ध ग्रंथ जे वेद त्यांमध्येंहि तीर्थंकर स्तुति मिळाल्यावर जैनधर्माचें प्राचीनत्व अलीकडील मार्गांनींहि सिद्ध झालेंच असें म्हणावयास हरकत नाहीं.

फार प्राचीनकाळीं म्हणजे भोगभूमींत युगलोत्पत्तीच होती. श्रम न करतांच उपजीविका होई, त्यामुळें पापकर्मे फारशीं घडतच नसत. विमलवाहन व चंद्रयशा, चक्षुष्मान व चंद्रकांता, यशस्वान् व सुरूपा, अभिचंद्र व प्रतिरूपा, प्रश्रेणि

व चक्षुष्कांता, मरूदेव व श्रीकांता, आणि नाभि व मरूदेवी हीं सात जोडपीं किंवा कुलकर जैनशास्त्रांत प्राचीन म्हणून नमूद आहेत. कालचक्रांतील उत्सर्पिणी व अवसर्पिणी हे काळ प्रत्येकीं दहा कोडाकोडी सागरोपम वर्षांचे असतात. उत्सर्पिणी कालांतील तिसऱ्या आऱ्याची ८४००००३ वर्षे साडे आठ महिनें बाकी असतां नाभि व मरूदेवीचे पोटीं प्रथम तीर्थंकर ऋषभ देवांचा जन्म झाला. त्यांना सुनंदा व यशस्मती अशा दोन स्त्रिया होत्या. पहिलीचे पोटीं बाहुबली जन्मास आले व दुसरीचे पोटीं भरतचक्रवर्ती. या भरतचक्रवर्तींचे नांवावरून हिमालयाचे दक्षिणेकडील प्रदेशास भरतखंड असें नामाभिधान प्राप्त झालें. भारतवर्षांतील हेच पहिले चक्रवर्ती होत. बाहुबली व भरतचक्रवर्ती यांच्यामध्यें बरींच युद्धें झालीं. शेवटीं बाहुबलीनां वैराग्य प्राप्त होऊन ते दाक्षिणेंत म्हैसूर संस्थानांतील श्रमणपुरस्सराजवळील टेकडीवर तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेले. तेथून ते केवलज्ञान झाल्यावर अनेक देशांत विहार करीत करीत कैलास पर्वतावर आदिभगवंताच्या समवसरणांत गेले व पुढें मोक्षास गेले. मोक्षास कोठें गेले याबद्दल कोठेंच उल्लेख नाहीं. पण बहुतेक ते कैलासावर गेले असावेत असें आम्हास वाटतें. त्यांचें स्मारक म्हणून श्रवण बेळगूळ येथें साठ फूट उंचीची नग्न प्रतिमा डोंगरावर खोदलेली आहे. ती असंख्य वर्षे ऊन, वारा व पाऊस खात असूनहि नूतनवत् आहे. असो. ऋषभदेवांनींच मानवासाठीं धर्ममार्ग घालून दिला अशी कल्पना आहे. त्यानीं चातुर्वर्ण्य स्थापले व असि, मसि, कृषि व वाणिज्य वगैरे उपजीविकेचीं साधनें निर्माण करून दिलीं. भरताची भागवतांत बावीस अवतारांमध्यें गणना केली आहे व त्यांच्या तपश्चर्येचें वर्णन विकृत स्वरूपांत दिलेलें आहे. भागवतांत जीं राजांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांच्या कालनिर्णयाचा विचार करतां कशास कांहीं मेळ नाहीं असें इतिहाससंशोधकांना दिसून आलें आहे. तेव्हां भागवतावरून कांहीं त्यांचा कालनिर्णय बरोबर करतां येणार नाहीं. भागवतावरून एवढेंच मात्र म्हणतां येईल कीं, भागवतकारांना जैनपद्धतीचा कठोर तपश्चर्येचा मार्ग पसंत नव्हता. त्यांना इंद्रियांचीं सुखें भोगत भोगतच तीं ईश्वरार्पण करून किंवा निर्हेतुपूर्वक भोगून वैकुंठ गांठावयाचे होतें. असें असलें तरी जड भरताच्या मार्गाला पूज्य गणणें त्यांनाहि भाग पडले. कारण त्यालाहि त्यानीं विष्णूचाच अवतार ठरविलें आहे. असो. भरतचक्रवर्तींनीहि शेवटीं दिक्षा घेऊन कैलासपर्वतावर तपश्चर्या-

करून मोक्षप्राप्ती करून घेतली. ऋषभतीर्थिकरांनींहि तपश्चरण करून केवल ज्ञानप्राप्ती करून घेतली व ते कैलासपर्वतावरच निर्वाणाप्रत पावले.

इ. स. पू. १९७२९४७१०१ ते इ. स. पू. ३१३७ पर्यंतचा काल वेदकाल मानला जातो. वेदांच्या ऋचा निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या ऋषींनीं रचिलेल्या आहेत. ऋग्वेद हा एकच मूलवेद असून त्यांतील ऋचा घेऊन इतर तीन वेद रचिलेले आहेत. ऋग्वेदांतीलहि दहा मंडलेंच काय तीं प्राचीन आहेत. या दहा मंडलांतूनच ऋषभतीर्थंकरांचें नांव फार आदरानें उल्लेखिलेलें आहे. या शब्दाचा अर्थ वेदशास्त्रसंपन्न लोक वाटेल तसा फिरवितात; पण खालील ऋचा इतकी स्पष्ट आहे कीं, ती निर्ग्रंथ जैन मुनींबद्दलच असली पाहिजे. 'ॐ पवित्रं नग्नमुपविप्रसामहे येषां नग्नाजाति येषां वीराः ॥ ही ती ऋचा होय. त्या वेळीं कपड्याच्या अभावीं इतरहि लोक नग्न रहात असतील, त्यांचा उल्लेख वरील ऋचेंत नाहीं. जे पवित्र दिगम्बर मुनि आहेत व जे आत्मबलशाली आहेत, त्यांचीच आपण स्तुति करतों असें ऋषींनीं म्हटलें आहे. ऋग्वेद अ. १ अ. ६ वर्ग १६ ही ऋचा खालीलप्रमाणें आहे स्वस्तिनो इंद्रोवृद्धश्रवास्वस्तिनः पूषा विश्व वेदाः। स्वस्तिन स्तार्क्ष्योऽरिष्टनेमिः स्वस्तिनो बृहस्पतिर्दधातु ॥" यांत नेमिनाथ तीर्थंकरांचें नांव आलें आहे. यज्ञमार्गी वैदिक त्या शब्दाचा अर्थ अग्नीला उद्देशून करितात पण प्राचीनकालींहि त्याचा अर्थ तोच असेल असें म्हणतां येत नाहीं. यजुर्वेद अ. ९ मन्त्र २५ वा खालीलप्रमाणें आहे. वाजस्यन प्रसव आबभूवे माच विश्वा भुवनानि सर्वतः। स नेमिराजा परियाति विद्वान्प्रजां पुष्टिं वर्धयमानोऽस्मे स्वाहा ॥ जे नेमिनाथ स्वामी केवल ज्ञानाचे राजे आहेत व ज्यांच्या उपदेशामुळें प्रजेला आत्मपुष्टि प्राप्त होते त्यांना स्वाहा म्हणजे त्यांचा जयजयकार असो, असा वरील मंत्रांचा भावार्थ आहे. सोमरसाचा अर्थ दारू, व अज म्हणजे स्वयंभू आत्मा या शब्दाचा अर्थ बोकड करणाऱ्या वैदिकांनीं वरील मंत्राचाहि अर्थ वाटेल तो केला म्हणून त्यांचें तोंड बंद कोण करणार? ऋग्वेद अ. २ अ. ७ वर्ग १७ वी ऋचा खालील आहे. " अर्हन् बिभर्षि सायकानि धन्वार्हंभिष्कं यजनं विश्वरूपम् । अर्हन्निदं दयसे विश्वमभ्वं नवा ओ जीयो रुद्रत्व हास्ति "॥ हे अरिहंत, धर्मरूपी बाण, उपदेशरूपी धनुष्य व विश्वरूप प्रकाशक केवळज्ञान आपल्याजवळ आहे. तुम्ही या विश्वांतील सर्व जीवांचें रक्षण करतां. कामादि कषयांना जिंकणारा तुमच्यासारखा बलवान् दुसरा कोण आहे? असा

वरील ऋचेचा भावार्थ आहे. यजुर्वेद अ. १९ मंत्र १४ वा असा आहे " अतिथ्यरूपं मासरं महावीरस्य नग्नहुः । रूपमुपसदाम हे ताजीस्रो रात्रिः सुरासुजा ॥ यांतील महावीर शब्दाचा अर्थ अग्नि वगैरे देवतापर करण्यांत येतो; व त्या नग्न किंवा सवस्त्र वाटेल तशा मानतां येतात. याप्रमाणें शुद्ध वेदांचें वाटेल तसे अर्थ फिरवून ज्यांनीं पिंडपोषण केलें त्यांना धिःकार असो. कारण त्यांच्यामुळें दुनियेंत मिथ्यात्वाचा प्रसार झाला. तात्पर्य हें कीं, ऋषींनीं ज्ञानमय व त्यागप्रधान जैनमुनींचीं स्तुतिस्तोत्रें वेदांतून गायिलीं असल्यामुळें वेदकालीं व तत्पूर्वींहि जैनधर्माचें अस्तित्व होतें असें सिद्ध होतें.

ऋषभतीर्थंकर किंवा आदिनाथस्वामी होऊन पुष्कळ वर्षे लोटल्यानंतर अजितनाथ तीर्थंकर झाले. अयोध्या नगरींत इक्ष्वाकुवंशाचा धरणीधर नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या मुलाचें नांव त्रिद संजय देव. त्यांची राणी इंदुरेखा. हिच्या पोटीं जितशत्रु राजा जन्मला. याचा विवाह पोदनपुरचे राजा व्यानंद यांची मुलगी विजया ईच्याशीं झाला. या जोडप्यापासून अजितनाथ जन्मले. जितशत्रु राजाला विजयसागर नांवाचा दुसरा एक भाऊ होता. त्याचे पोटीं सगर चक्रवर्ती जन्मला. यांचें वर्णन वैदिकपुराणग्रंथांतूनहि आहे. अजितनाथ तीर्थंकर वैशाख शु. ॥ त्रितीयेस जन्म पावले. त्यांनीं अनेक राजकन्यांशीं विवाह केला होता व बरीच वर्षे राज्य केलें. एकदां वनक्रीडा करीत असतांना नुकतेंच उमललेलें फूल कोमेजलेलें त्यांना दिसलें, त्याबरोबर त्यांना वैराग्य उत्पन्न झालें व त्यांनीं दीक्षा घेतली. बारा वर्षे तपश्चर्या केल्यानंतर त्यांना केवलज्ञान झालें. नंतर धर्मप्रचार करून त्यांनीं नव्वद गणधर किंवा पट्टशिष्य, एक लाख मुनि व तीन लाख आर्जिका बनविल्या. सगर चक्रवर्तीनेंहि शेवटीं दीक्षा घेतली, पण त्यांस केवलज्ञानप्राप्ति झाली नाहीं. त्याचा पुत्र भगीरथ यानें मात्र घनघोर तपश्चर्या करून मोक्षप्राप्ती करून घेतली. देवांनीं त्याला अभिषेक केला व तेंच गंगाजल अशी आख्यायिका आहे. अजितप्रभु सम्मेद शिखरावरून मोक्षाला गेले. यांची स्तुति यजुर्वेदांत आहे. अजितनाथ होऊन असंख्य वर्षे लोटल्यानंतर श्रावस्ती नगरींत इक्ष्वाकुवंश व काश्यप गोत्राचे राजा दृढरथराय किंवा जितारी व राणी सेना किंवा सुषेणा यांच्या पोटीं श्रीसंभवनाथ मार्गशीर्ष शु॥ १४ स जन्मले. यांचे कालापासूनच शंभुमहादेवाची भक्ति सुरू झाली. यज्ञद्वारा इंद्रादिदेवांची उपासना सुरू होण्यापूर्वीपासून शिवपूजा प्रचलित अस-

त्यामुळें लिंगांगी धर्म हा यज्ञमार्गी वैदिकधर्मापेक्षां फार प्राचीन होय असें म्हटलें जातें. असो. श्री संभवनाथांनीं बरींच वर्षे राज्य करून पुढें तपश्चर्या केली व केवलज्ञान प्राप्त झाल्यानंतर धर्मप्रसार करून सम्मेदशिखरावरून ते मोक्षाला गेले. त्यांचे नंतर कोट्यावधि वर्षांनीं अयोध्यानगरींत इक्ष्वाकुवंशाचे राजा संवर व राणी सिद्धार्थ यांचें पोटीं अभिनंदन तीर्थंकरांनीं माघ शुद्ध २ ला जन्म घेतला. बरींच वर्षें संसार केल्यावर दीक्षा घेऊन ते केवलज्ञानी झाले व पुढें धर्मप्रभावना करून सम्मेदशिखरावरून मोक्षाला गेले. पुढें असंख्य वर्षांनंतर अयोध्येंतच मेघरथ राजा व सुमंगल देवीचे पोटीं सुमतिनाथ तीर्थंकर वैशाख शुद्ध ८ मीस जन्मले. यांनींहि बरींच वर्षे राज्य केल्यावर दीक्षा घेऊन व केवलज्ञानी बनून धर्मप्रसार केला व संमदेशिखरावरून ते मोक्षाला गेले. त्यांचे नंतर असंख्य वर्षांनीं कौशांबीपुरांत राजा मुकुटवर व राणी सुसीमा यांचे पोटीं पद्मप्रभतीर्थंकर कार्तिक व. ११ स जन्मले. त्यांनींहि मागील तीर्थंकराप्रमाणेंच धर्मप्रभावना करून संमेदशिखर पर्वतावरून मुक्ति मिळविली. त्यांचेनंतर काशी क्षेत्रीं राजा सुप्रतिष्ठ व राणी सुसीमा यांचे पोटीं सुपार्श्वनाथ तीर्थंकर भाद्रपद व. ८ मीस जन्मले व त्यांनींहि धर्मप्रभावना केली. नंतर चंद्रपुरींचे राजा व राणी लक्ष्मणा यांचे पोटीं चंद्रप्रभ तीर्थंकर पौष वद्य ११ स जन्मले व धर्मप्रभावना करून मोक्षाला गेले. त्यानंतर नववे तीर्थंकर कौकंदीपुरीचे राजा सुग्रीव व राणी जयरामा यांचे पोटीं पुष्पदंत किंवा सुविधिनाथ यांनीं जन्म घेतला व धर्मप्रभावना करून ते मोक्षाला गेले. यांच्या काळांत वैदिक मिथ्यात्वाला सुरवात झाली. या काळापर्यंत शुद्धधर्म प्रचलित होता. पण तेथून पुढें धर्माचें नांवावर वाटेल तीं थोतांडें सुरू झालीं. उत्तर ध्रुवाकडून कांहीं रानटी टोळ्या याच सुमारास भरतखंडांत आल्या व येथें त्यांनीं बराच धुमाकूळ माजविला. कांहीं वर्षांनंतर त्यांच्यावर येथील संस्कृतीची छाप पडली पण त्यांची तितकी लायकी नसल्यामुळें धर्माचा त्यांनीं विपर्यास केला. आत्मिक शक्तींना भौतिक शक्तीच समजून त्यांनाच त्यांनीं देवतांचें रूप दिलें, व त्यांच्या नांवावर मांसभक्षण, सुरापान, परदारागमन वगैरे स्वेच्छाचारास यथेच्छ सुरवात केली. रानटी लोक असा स्वेच्छाचार नेहमींच करतात; पण यांनीं तो धर्माचे नांवावर सुरू केला; व त्यामुळें मिथ्यात्व सुरू झालें. वेदांमध्यें जीं वर्णनें दिसून येतात त्यांचा सूक्ष्म अर्थ केला तर तो अध्यात्मपरच आहे. पण वरवरचा सर्व अर्थ अनीतिमूलकच आहे. त्यांतील नैसर्गिक वर्णन उत्तर ध्रुवा-

कडील आहे असें लो. टिळकांनीं साधार सिद्ध केलें आहे. तेव्हां नवव्या तीर्थंकराचे वेळीं आलेले हे उत्तर ध्रुवाकडील रानटी लोकच वैदिक मिथ्यात्वाचे जनक असावेत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

पण भारतीय तत्वज्ञानाशीं त्यांचा अधिकाधिक संबंध येत गेल्यावर वैदिक आर्यांत अनेक पंथ निघाले व बरीच सुधारणा झाली. वैष्णवादि वैदिक पंथांचें तत्वज्ञान भिन्न असलें तरी जैन विचारसरणींची छाप त्यांच्यावर पडलेली दिसते. उपनिषदांतील विचार भारतीय संस्कृतीच्या संस्काराचेच परिणाम होत. कोठें ती उत्तरध्रुवाकडून आल्याबरोबरची हिंसक व जडदृष्टि व कोठें नंतरची सूक्ष्म व अहिंसक दृष्टि ! हा सर्व परिणाम जैनसंस्कृतीचाच होय. वेदांतून जैनतत्वज्ञान फुटून निघालें आहे असें कांहीं वेदाभिमानी म्हणतात, पण तें सिद्ध करून दाखविणें त्यांना अशक्य आहे. जैनांची अहिंसादि महाव्रतें, कर्मसिद्धांत, स्याद्वाद पद्धति, ईश्वराची कल्पना या इतक्या स्वतंत्र आहेत कीं, त्या वेदाच्या भारूडांतून निघणें शक्यच नाहीं. पण वेदांतील ऋचांच्या अर्थावर मात्र वरील सिद्धांतांचा आरोप करतां येणें शक्य आहे. हल्लीं जैन म्हटलया जाणाऱ्या लोकांची संख्या अल्प आहे म्हणून तो धर्म अर्वाचीन व हिंदूंची संख्या मोठी आहे म्हणून तो धर्म प्राचीन म्हणूं गेल्यास कांहीं कालानंतर ख्रिश्चन व मुसलमानीं धर्महि फार प्राचीन ठरतील. महावीरानें यज्ञ व चातुर्वर्ण्याविरुद्ध बंड करून निराळा पंथ काढला असें म्हणतात, पण हिंसात्मक यज्ञ व चातुर्वर्ण्यांतील उच्चनीचपणा न मानणारी संस्कृति महावीरांनीं सुरू केली नसून केवळ तिचे पुनरुद्धारक ते होते हें विसरतां कामा नये. बुद्धानें कदाचित् वेदांविरुद्ध बंड पुकारलें असें म्हणतां येईल. कारण तो त्या परंपरेंतील होता. महावीरांची परंपरा दुसरी. तेव्हां ही परंपरा बंडखोर ठरत नसून कदाचित् प्रतिस्पर्धी ठरेल. या प्रतिस्पर्धी परंपरेचाच शेवटीं हिंसात्मक परंपरेवर विजय झाला असेंच दिसून येतें. सरळ अर्थानें वेदांत जें नाहीं तें वेदप्रामाण्य मानणाऱ्या ग्रंथांतून लिहिलें गेलें, व वेदांचे अर्थ वाटेल तसे फिरवूनहि या नव्या ग्रंथांना आधार देण्यांत आले. याप्रमाणें वैदिक बदलले. उलट जैनसिद्धांत त्रिकालाबाधित आहे. प्रत्येक कल्पांत तो एकसारखाच आहे. वर्तमान चोवीस तीर्थंकरांतहि आदि तीर्थंकर वृषभनाथांनीं जें उपदेशिलें तेंच अंतिम तीर्थंकर महावीरांनींही सांगितलें म्हणून वेदांतून जैनसिद्धांत उत्पन्न झाला किंवा त्याविरुद्ध बंड करून तो निघाला हें म्हणणें चुकीचें असून वैदिकावर जैन-

सिद्धांताची छाप पडली हेंच म्हणणें रास्त होय. प्रारंभीं वैदिक जैनसिद्धांत जाणूंच शकले नाहींत व म्हणून त्यांनीं त्याचा विपर्यास करून पाखंड प्रवर्तविलें. पुढें जैनसिद्धांताला शिव्या देतदेतच वैदिकांनीं बरेचसे सिद्धांत आत्मसाद केले व बाकीचेहि त्यांना मान्य करावे लागतील. कारण तेच त्रिकालाबाधित सत्य सिद्धांत आहेत. आज आचरणाच्या दृष्टीनें जैन व उच्च वर्णीय वैदिक यांच्यामध्यें विशेष फरक राहिलाच नाहीं. इतका त्यांनीं जैनसिद्धांत पचवून टाकिला आहे. असो.

जैनधर्म वेदांतून निघालेला नाहीं, मग तो बौद्धधर्मांतून निघाला हें म्हणणें अगदींच असंबद्ध आहे. उलट जैनसिद्धान्ताच्या पायावर यज्ञमार्गी वैदिकाविरुद्ध पुकारलेलें बंड म्हणजेच बौद्धधर्म असें म्हणतां येईल. वेदकालीन किंवा उत्तर-ध्रुवावरून आल्याबरोबर आर्यांना जैनसिद्धांन्त न पटल्यामुळें प्रारंभीं जरी त्याचा त्यांनीं विपर्यास केला तरी पुढें जैनतीर्थंकर व मुनिगणाबद्दल वैदिकांचा आदर वाढत गेला व जैनसिद्धांत त्यांनीं आत्मसात केला असें स्पष्ट दिसतें. उपनिष-दांतील विचार व सांख्यादि दर्शनें व वैष्णवादि पंथ हे जैनसिद्धांतांतील एकेका विचारांचेच प्रतिध्वनि होत. वेदांत ज्याप्रमाणें तीर्थंकर व निर्ग्रंथ साधुबद्दल आदराचे उद्गार आहेत, तसे पुराणांतूनहि आहेत. " ॐ नमो ऽर्हतो ऋषभो । व ॐ त्रैलोक्य प्रतिष्ठितांना चतुर्विंशति तीर्थंकराणाम् । ऋषभादि वर्धमान्तानां सिद्धानां शरणं प्रपद्ये ॥ हीं वचनें वैदिक ग्रंथांतीलच आहेत. " अष्टषष्टि तीर्थेषु यात्रायां यत्फलं भवेत् । श्री आदिनाथ देवस्य स्मरणेनापि तत्फलम् ॥ हा श्लोक मनुस्मृतीच्या जुन्या प्रतींतून मिळतो म्हणतात. योगवासिष्ठांत खुद्द रामचंद्राचेच तोंडी हा श्लोक आहे. 'नाहं रामो न मे वांछा भावेषु च न मे मनः । शान्तिमा-स्थातुमिच्छामि स्वात्मन्येव जिनो यथा ॥ अ. १५ श्लो. ८. दिगंबर श्रमणांना आहारदान दशरथ राजानें केलें असा उल्लेख वाल्मिकी रामायण बालकांड सर्ग १४ श्लोक १२ मध्यें आहे. महाभारत वनपर्व अ. १८३ मध्यें अरिष्टनेमिचा उल्लेख आहे. मार्कंडेय पुराणांत ऋषभदेवांचें वर्णन आहे. याप्रमाणें व्यासमहर्षि-कृत पुराणांतूनहि जैन तीर्थंकरांचा व साधूंचा उल्लेख आहे. केवळ अध्या-त्मिक बाबतींतच जैन थोर होते असें नव्हे, तर व्यापाराचा सर्व मक्ता जणुं काय जैन वैश्याकडेच होता व तीच परंपरा अजूनही थोड्या प्रमाणांत चालू आहे. प्राचीनकाळीं जैन व्यापारी अमेरिका, युरोप व आफ्रिका खंडांतून व्यापारासाठीं जात व तेथें त्यांनीं स्थापन केलेल्या जिनमूर्ति हल्लीं संशोधकांना सापडूं लागल्या

आहेत. जैनांनीं राज्येंहि बऱ्याच मोठ्या प्रदेशावर बहुत कालपर्यंत केलेलीं आहेत. हिंदुस्थानचा असा एकहि प्रान्त नाहीं कीं जेथें जैन क्षत्रियांनीं पूर्वी राज्य केलेलें नाहीं. जैनशिल्पकलेचे नमुने तर प्रत्येक प्रान्तांत हल्लींहि सांपडतात. याप्रमाणें जैनसंस्कृति एके काळीं अतिशय भरभराटीला पोंहोचली होती, याबद्दल इतिहासच साक्ष देत असल्यामुळें त्याबद्दल अधिक लिहिण्याची जरूरीच नाहीं. पण वेदकाळापूर्वी जैन-धर्म नव्हता व जैनधर्म वैदिकधर्माची एक बंडखोर शाखा आहे या म्हणण्याचेंच निराकरण या लेखांत करणें जरूर होतें. जैनधर्माचें प्राचीनत्व येथवर वेदांतील व बाहेरील आधार देऊनच सिद्ध केलें आहे व जैन-सिद्धान्त ही वेदाची शाखा कशी ठरत नाहीं व तो एक स्वतंत्र वृक्ष असून त्याचाच परिणाम वैदिकांवर कसा होत आला आहे तेंहि आम्हीं थोडक्यांत वर दिलेंच आहे.

वेदापूर्वी, वेदकालानंतर, पुराणकालीं व इतिहासकाळीं जैनसमाज व सिद्धान्त अत्यंत भरभराटींत असेल, पण बुद्धकालीं तो मागासला व शंकराचार्यांनंतर तर त्याचा जवळजवळ नाशच झाला असें म्हणणारेहि कांहीं आहेत. बुध्दकालीं खुद्द महावीर तीर्थंकर होते व त्यामुळें त्यावेळीं जैनसंस्कृतीची भरभराटच होती, पण त्यानंतर व शंकराचार्यांनंतरहि अनेक जैन विद्वान्, राजे व व्यापारी होऊन गेले आहेत, असें इतिहासच सांगतो. तेव्हां शंकराचार्यांनीं हें पाखंड मत नाहींसें करून टाकलें असें म्हणतांच येणार नाहीं. जैनधर्माचें खंडन करणारा असा एखादा ग्रंथही शंकराचार्यांनीं लिहिलेला नाहीं. नास्तिक व निरीश्वरी याशिवाय दुसरा आरोपच जैनसिद्धान्तावर त्यांना करतां येत नाहीं, व तोहि मुळांत खोटाच आहे. उलट जैनाचार्यांनीं असंख्य ग्रंथ लिहून वैदिकसिद्धांताचा धुव्वा उडविलेला आहे. इतकें असून जैनसंस्कृति हल्लीं फारच थोडी अवशिष्ट राहिली आहे, याचें कारण कालमहात्म्य हें एक आहेच, पण त्याशिवाय जैनत्व राखणें फार कठीण आहे हें होय. शिवाय बरेचसे जैनसिद्धांत इतर पंथांनीं स्वीकारिलें असल्यामुळें त्या पंथाचे अनुयायी बनण्यास जैनांना कांहींच वाटलें नाहीं. त्यामुळें जैनांची लोकसंख्या कमी झाली. जैन ब्राह्मण उरलेच नाहींत. जैन राजे हिंदू बनले व राज्यहि लयाला गेलें. वैश्य थोडेसे उरले आहेत; पण त्यांच्या हातचाहि व्यापार परकीयांचे हातीं गेला. याप्रमाणें जैनसमाजांतील बल नष्ट झाल्यामुळें इतर लोकहि जैनधर्म सोडून इतर

पंथाचे बनले. उरलेल्या जैनसमाजांत कुरूढी व मिथ्यात्व शिरून तोहि हतबल झाला. अशा स्थितींत कोणींहि यावें व त्याला डिवचावें अशी हल्लीं स्थिति आहे. पण कितीहि झालें तरी हा स्याद्वाद केसरी आहे. तो मानी आहे. एका डरकाळीनेंच किरकोळ पंथांच्या श्वापदांना तो पळवून लावील यांत शंका नाहीं. जैनसिद्धांत सत्य, शुद्ध व शाश्वत आहे. मेजर फर्लांगसारख्या अनेक पाश्चिमात्य विद्वानांनींही त्याचें शुद्ध स्वरूप कबूल केलेलें आहे. सर्वांनाच चढती व पडती आहे, त्याप्रमाणें जैनसिद्धांतहि हल्लीं मागें पडलेला आहे; पण सत्याला पराजय नाहीं व त्याचा नाशहि होत नाहीं. जैनसिद्धांत अनादि आहे. तो परिपूर्ण आहे. फार प्राचीनकालीं तो होता, हल्लीं आहे व भविष्यकालींहि राहणारच. त्याचे अनुयायी कधीं कमी होतील, कधीं बरेच असतील; पण जैनसिद्धांत अनुसरल्याशिवाय मुक्ति नसल्यामुळें प्रत्येक प्राणीमात्राला केव्हां तरी शेवटीं जैन बनल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. अनंत कालांतील जैनांच्या उत्कर्षापकर्षाचें किती वर्णन करावें ? इतिहासाच्या टप्प्यांत व मानवी बुद्धीच्या कक्षेत जेवढा काळ येतो तेवढ्याचाच विचार करून येथवर सिद्ध केलें कीं, जैनसिद्धांत फार प्राचीन व परिपूर्ण आहे. इतर अनेक पंथ उत्पन्न झाले व नामशेषहि झाले, अनेक परिवर्तनें झालीं, पण जैनसिद्धांत एकमेव व शुद्ध आहे, आणि यांतच त्याची थोरवी आहे. या नश्वर जगांत मोठमोठ्या जैनाचार्यांचें कितीतरी अमोलिक ग्रंथ नाश पावले असतील, कितीतरी जैन राजे विशाल राज्यवैभव बराच काळ भोगून दिवंगत झाले असतील, अनेक जैन कारागिरांची कला जमिनदोस्त झाली असेल व जैनांच्या पिढ्यान्-पिढ्या कालाच्या उदरांत गडप झाल्या असतील; पण या जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडविणारा एकमेव जैनसिद्धांत जसा होता तसा अजून कायम आहे व कायम राहणारच. जैनसिद्धांताचें प्राचीनत्व काय वर्णावें ? प्राणीमात्र जेव्हांपासून आहेत तेव्हांपासून तो आहे व अनेक भव्य जीवांना मोक्षपद गांठण्यास कारणीभूत होत आहे. कालानुसार जें व्हावयाचें तें होणारच, पण पाखंडी मतांचा प्रसार न होतां असा मोक्षदायी, शुद्ध व परिपूर्ण मताचाच तेवढा प्रसार दुनियेंत होत रहावा असें कोणीहि इच्छील; म्हणजे मोक्षप्राप्तीस विनाकारण विलंब लागणार नाहीं, व भव्यजीव शक्य तितक्या लवकर स्वाभाविक स्थितप्रित पावतील. म्हणून आम्हींहि म्हणतों कीं, ' वर्धतां जिनशासनम् ' ॥

---

## प्रकरण ३ रें.

# महावीर पूर्वकाल.

नववे तर्थिंकर पुष्पदंत यांच्याकाळा पासून सुरूं झालेलें मिथ्यात्व कालचक्राच्या नियमानुसार वाढत चाललें. पुष्पदंत तीर्थंकरांनंतर हल्लींच्या हजारीबाग जिल्ह्यांतील कुलहापर्वताजवळच्या भद्दलपूर ग्रामीं राजा दृढस्थ व राणी सुनंदा यांचे पोटीं दहावे तीर्थंकर भगवान शीतलनाथ माघ वद्य १२ स जन्मले. त्यांनीं मिथ्यात्वाचा नाश करून बरीच जैनधर्मप्रभावना केली. काशीक्षेत्राजवळील सिंहपुरांत विष्णुराजा व नंदाराणी यांच्या पोटीं अकरावे तीर्थंकर श्रेयांसनाथ भाद्रपद व० १२ स जन्मले व मिथ्यात्वाचा नाश करून त्यांनीं बरीच धर्मप्रभावना केली. नंतर बराच काळ लोटल्यावर चंपापुरींत वसुपूज्य व जयावतीचे पोटीं वासुपूज्यांनीं फाल्गुन वद्य १४ स जन्म घेतला व मिथ्यात्वाचा नायनाट करून बरीच धर्मप्रभावना केली. त्यांचेनंतर बराच काळ लोटल्यानंतर कपिला नगरींत सुकृतवर्मा व संयमा यांचे पोटीं तेरावे तीर्थंकर विमलनाथ यांनीं माघ शु. ३ ला जन्म घेऊन मिथ्यात्वाचा लोप केला व धर्मप्रभावना केली. हें गांव कायमगंज स्टेशनापासून पांच मैल आहे. चौदावे तीर्थंकर अनंतनाथ यांनीं वैशाख व. १३ स अयोध्यानगरींत राजा सिंहसेन व राणी सर्वयशा यांच्या पोटीं जन्म घेऊन बरीच धर्मप्रभावना केली. नंतर बराच काळ लोटल्यावर रत्नपुरीचे भानुराजा व सुव्रताराणीचे पोटीं माघ शु. ३ स पंधरावे तीर्थंकर धर्मनाथ यांनीं जन्म घेऊन धर्मप्रभावना केली. नंतर सोळावें तीर्थंकर शांतिनाथ यांनीं ज्येष्ठ व. १३ स हस्तिनापुरांत राजा विश्वसेन व राणी एरा यांच्या पोटीं जन्म घेऊन बरीच धर्मप्रभावना केली. पुढें बराच काळ लोटल्यानंतर हस्तिनागपुरांत राजा सूर्यदेव व राणी श्रीदेवी यांचे पोटीं वैशाख व. १४ स कुन्थुनाथ तीर्थंकरांनीं जन्म घेऊन बरीच धर्मप्रभावना केली. त्यांचे नंतर पुन्हां त्यांच गांवांत राजा सुदर्शन व मित्राराणीचे पोटीं अरहनाथ तीर्थंकरांनीं मार्गशीर्ष शु. १० मीस जन्म घेऊन धर्मप्रभावना केली. त्यांचें नंतर मिथिलापुरांत कुंभराजा व रक्षताराणी यांच्या पोटीं मल्लिनाथ तीर्थंकरांनीं जन्म घेऊन बराच धर्मप्रभावना केली. याच वेळीं सुभूम चक्रवर्ती होऊन

त्यांनीं परशुरामाचा पराभव केला. पुढें बराच काल लोटल्यानंतर विसावें तीर्थंकर मुनिसुव्रतनाथ यांनीं राजगृहचे राजा सुमित्र व राणी पद्मामती यांचे पोटीं जेष्ठ व.८ स जन्म घेऊन बरीच धर्मप्रभावना केली. याच वेळीं श्रीरामचंद्र होऊन गेले. पुढें बऱ्याच वर्षानंतर म्हणजे साठ लाख वर्षानंतर एकवीसावें तीर्थंकर नेमिनाथ यांनीं मिथिलापुरांत विजयराजा व विप्राराणी यांचे पोटीं श्रावण व॥ ८ स जन्म घेऊन बरीच धर्मप्रभावना केली. बाविसावे तीर्थंकर नेमिनाथ होत. हरी-वंशाच्या यदुराजानें मथुरेंत राज्य स्थापलें. याच कुळांत बृहध्वज व वसुराजा होऊन गेला. पुढें त्यांचें वंशांत शूर नांवाचा राजा जन्मला. त्यास शौरी व सुवीर असे दोन पुत्र होते. शौरीनें शौर्यपुर वसाविलें. त्यास अंधकवृष्णि म्हणून एक मुलगा होता. त्याच्या राणीचें नांव सुभद्रा. या जोडप्याचें पोटीं समुद्रविजय, सागर व वसुदेव वगैरे दहा मुलगे व कुंती आणि माद्री या दोन मुली जन्मल्या. समुद्रविजय यांची भार्या शिवा हिचे पोटीं नेमिनाथ तीर्थंकर श्रावण शु॥ ५ स जन्मले, व वसुदेव आणि देवकीचे पोटीं कृष्ण चक्रवर्ती जन्मले. शौरीचा भाऊ सुवीर यास भोजवृष्णि म्हणून एक मुलगा होता. त्यास उग्रसेन व देवक म्हणून दोन पुत्र झाले. उग्रसेनाचा मुलगा कंस व देवकाची मुलगी देवकी होय. कंसाची बहीण राजीमती ही नेमिनाथाला देऊं केलेली होती. पण लग्नसमारंभांत होत असलेला पशुवध पाहून त्यांना वैराग्य उत्पन्न झालें व त्यांनीं लग्नमंडपाच्या वाटेवरूनच परतून निर्ग्रंथि दीक्षा घेतली. त्यांनीं गिरनार पर्वतावर उग्र तपश्चर्या करून केवळज्ञान प्राप्त करून घेतलें व बरीच धर्मप्रभावना करून ते मोक्षाला गेले त्यांनीं एक हजार वर्षांचें आयुष्य भोगलें. याबद्दलचा उल्लेख उत्तरपुराण व हरिवंश या दोन्ही ग्रंथांत आहे.

नेमिनाथ तीर्थंकरांचें नंतर ८४ हजार वर्षांनीं काशीचे राजा अश्वसेन व वामादेवी यांचे पोटीं तेवीसावें तीर्थंकर पार्श्वनाथ इ. स. पूर्वी ८७६ मध्यें पौष व॥ १० स जन्मले. पार्श्वनाथांनीं आठवें वर्षी अणुव्रतें घेतलीं. हे नऊ हात उंच होते व यांची देहकांती निळी होती. पार्श्वनाथांनीं कुमारावस्थेंतच दीक्षा घेतली. पार्श्वनाथांनीं जेथें दीक्षा घेतली त्याच वनांत पूर्वभवांतील वैर साधण्या-साठीं कमठाच्या जीवानें व्यंतरदेव होऊन त्यांना अनेक प्रकारचें उपसर्ग केले. त्यांच्यावर अग्निवर्षाव केला, पुढें प्रचंड मेघधारा वर्षविली. पण कमठाचा जीव तापसी असतां त्याच्या धुनींत सांपडलेल्या ज्या सर्पयुगलाचे जीव त्यांनीं त्या

भवांत वांचविले होते त्या सर्पानें आपली फणा शुक्लध्यानधारी पार्श्वनाथ स्वामींवर धरून वरील वर्षावांची बाधा त्यांना होऊं दिली नाहीं. तपश्चर्येमुळें केवलज्ञान प्राप्त झाल्यावर त्यांनीं बरीच धर्मप्रभावना केली व इ. स. पू. ७७६ मध्यें ते सम्मेदशिखरावरून मोक्षाला गेले.

वरीलप्रमाणें वीरपूर्वकालाचा इतिहास आहे. काल अनन्त आहे व जीव अनन्त आहेत. शिवाय एकाच जीवाचे जन्महि अनेक असतात. अशा स्थितींत कोणाचें किती वर्णन करावें व तें कोण करूं शकणार! काळाच्या पोटांत पुष्कळ गोष्टी गडप झालेल्या आहेत. त्यांचा अंत कसा लागणार! अंत लावूं गेले तरी-हि हास्यास्पद प्रयत्न ठरतात व बुद्धी कोती ठरते असा अनुभव उपलब्ध अस-लेल्या तुटपुंज्या इतिहासावरूनच येतो; पण इतिहास ही हल्लींची एक विद्या मानिली गेली असल्यामुळें व सत्यास त्याचा निर्णय ऐतिहासिक दृष्टीनें करण्याची पद्धत पडली असल्यामुळें हा खटाटोप करावा लागत आहे, पण हा प्रयत्न अगदीं अपूर्ण असतो हे विसरतां कामा नये. हिंदुस्थानांतच काय पण इतर जगांतहि पूर्वी इतिहास लिहून ठेवण्याची पद्धत नव्हती. अलीकडे एकदोन शतकांतच ही पद्धत पडलेली आहे. लवकरच ती निरर्थक वाटून समाज सोडून देईल. आतां सामान्य जीवांना मार्गदर्शक व्हावे म्हणून कांहीं लिहून ठेवावे लागले व जगांत विलक्षण क्रांती झाल्यास ती आपोआपच पिढयान् पिढया लोकांचें लक्षांत राहतेच. त्याच कथा मुलाबाळांना सांगण्यांत येतात व विद्वान् कवी त्यावरच आपली प्रतिभा खर्चतात. राम व कृष्ण वगैरेंच्या चरित्राची हीच स्थिति आहे. राम व कृष्णकालीं विलक्षण क्रांति झाली व ती लोक विसरूं शकत नाहींत. त्या गोष्टी पिढयान् पिढया लोकांच्या ध्यानांत राहिलेल्या आहेत. रामायण व महाभारतावरच नंतरच्या प्रत्येक काळचे कवि आपली विद्वत्ता खर्च करीत आहेत. त्याचप्रमाणें शिव, विष्णु, तीर्थंकर यांचें स्मरण आदर्श म्हणून लोक ठेवतात. हेहि कधीं विसरले जात नाहींत. बाकीचे सर्व मोठमोठे पंडित चक्रवर्ती व इतर संपत्तिमान् कांहीं काळांनंतर विसरलें जाणें अपरिहार्य आहे. वरील प्रकारच्या आदर्श व क्रांतिकारक पुरुषांचीं चरित्रें लोकांच्या ध्यानीं राहतात तीहि आवडीसाठीं व स्फूर्ति मिळविण्यासाठींच होय. म्हणूनच ते जन्मले केव्हां, ते कसे होते वगैरे भानगडींत जनता पडत नाहीं. मुख्य मुद्याकडे जनता पाहते व इतर गोष्टी विसरून जाते. त्यामुळें हल्लीं ज्याला आपण

इतिहास म्हणतो तसें ऐतिहासिक स्वरूप या चरित्रांना राहिलेलें नाहीं; म्हणून हीं चरित्रें खोटीं असें मानणें मात्र चुकीचें आहे. हल्लींचीं पुराणें व धर्मग्रंथ वगैरे-मधूनहि फार प्राचीनकाळचा इतिहास मिळतो यांत मुळींच शंका नाहीं व म्हणून त्यांचे फार महत्त्व आहे. कदाचित् आज ज्याचा इतिहास आपण मोठ्या खबरदारीनें लिहून ठेविला आहे तो लोक अजीबात विसरून जातील, व तें लिखाण धुळीस मिळून जाईल. पण तीर्थंकर चरित्रें व पुराणें अजरामरच राहतील. पौद्गलिक वस्तु नश्वरच आहेत. मोठमोठे प्रासाद जेथें जमीनदोस्त होतात तेथें ग्रंथांची काय कथा? एवढेंच काय पण जमीन तेथें पाणी, पाणी तेथें जमीन, पर्वत होते तेथें सपाटी व पूर्वी खोलगट जमीन होती तेथें उत्तुंग पर्वत अशा घडामोडी जेथें होत आहेत तेथें जीवांचीं चरित्रें कायम राहतील अशी कल्पना करण्यांत तरी काय अर्थ आहे! म्हणून अनंत कालाचा सुसूत्र इतिहास मिळेल अशी कोणी अपेक्षा बाळगूं नये, व तसा आपल्याजवळ आहे अशी कोणी घमेंडहि बाळगूं नये. त्याचप्रमाणें असा इतिहास उपलब्ध नाहीं म्हणून कमीपणा मानण्याचें किंवा प्रगतीला धोका येतो असें मानण्याचेंहि कारण नाहीं. या नश्वर जगांत शाश्वत इतिहास मिळाला तरच नवल!!

पण तारीख व नांवनिशीवर इतिहास मिळाला नाहीं तरी सामान्य सिद्धान्त हे ठरलेलेच आहेत व ते दिक्कालाद्यविच्छिन्न म्हणजे त्रिकालाबाधित व सर्व देशांना लागू असेच असतात. हे सिद्धान्त माहीत असणें मात्र प्रत्येक व्यक्तीला आवश्यक आहे व ते माहीत होण्यास थोडी माहितीहि पुरी होते. पिंडीं ते ब्रह्मांडीं अशी म्हणच आहे. एका विवक्षित कालांतील एखाद्या ठिकाणच्या सार्व-गिक माहितीवरूनहि आपणांस सर्व ब्रह्मांडाच्या मुळांतील सिद्धान्त अजमावितां येतील, व कोटाकोटी सागरोपमवर्षांच्या कल्पांतूनहि जे तीर्थंकर झाले, चक्रवर्ति झाले व असंख्य जीव मोक्षाला गेले आणि भवचक्रांत भ्रमण करीत राहिले, त्या सर्वांची हकीकत एक, अनुभव एक व उपदेशहि एक याचें कारण विश्वांतील मूळसिद्धान्त निश्चित आहेत हेंच होय. नामरूपातीत होऊनहि हे सिद्धान्त जाणता येतात. पण सामान्य जीवांना बोध होण्यासाठीं विविक्षित कालांतील विशिष्ट नांवाच्या व रूपाच्या व्यक्तींचीं चरित्रें सांगावीं लागतात व यासाठींच पुराणग्रंथ आहेत. जें वर्तमानकाळीं घडत आहे तेंच पूर्वी घडलें व भविष्यकाळींहि तसेंच घडणार हे निश्चित होय. जो थोडाबहूत फरक या तिन्ही काळांत दिसेल तोहि

ठराविक सिद्धातांना धरूनच होणार. हे सिद्धान्त जाणण्यासाठींच चरित्रें वाचावयाचीं व हे सिद्धान्त जाणले म्हणजे आपण ज्याला हल्लीं इतिहास म्हणतों त्याची चिकित्सा करण्याची जरूरीच रहात नाहीं. हा सिद्धान्त आपले पूर्वज जाणत होते म्हणूनच त्यांनीं तत्त्वाशीं गांठ घातली व किरकोळ तपशील सोडून दिला. पूर्वीच्या ग्रंथकर्त्यांनीं आपलें नांवसुद्धां क्वचित्‌च दिलें आहे. मग बाकीचा इतिहास देण्याचें दूरच राहिलें. बालजीवांनीं विविक्षित तपशीलवार माहिती मागितल्यावर तीहि ठराविक साचाची देऊन त्यांनीं मुख्य रहस्य सांगण्याचा प्रयत्न केला. जैनशास्त्रांतील तीं पूर्व भवांचीं वर्णनें, तीं ठराविक ठशाचीं चरित्रें, ती विचित्र अंकाची गणना व इतर अनिश्चित मांडणी जी आहे ती या अनंत कालाच्या अनिश्चित व अफाट घडामोडींमुळेंच आहे. पण त्यांतून काढलेले सिद्धान्त मात्र अगदीं अपरिवर्तनीय आहेत. तात्पर्य हें कीं, वीरपूर्वकालाविषयीं जी वर माहिती दिली आहे त्यांत कांहीं अंशीं असलेली साम्यता व अनिश्चितता पाहून ती माहितीच कित्येक वाचकांना खोटी वाटेल. पण वर दिलेल्या कारणासाठीं त्यांनीं तसें मानण्याचें धाडस करूं नये हें बरें. अनंतकालाचा इतिहास हा असाच असावयाचा. लहानशा प्रमाणांत पाहिले म्हणजे दिसणारी विविधता तोच विषय मोठया प्रमाणांत पाहिल्यावर लुप्त होते असा अनुभव आहेच. अनंतकालाच्या इतिहासांतहि असेंच घडावयाचें. सिद्धान्त मात्र सारखाच आहे व त्याच्याशींच आपलें काम आहे. म्हणून मागील इतिहास कोणी खोटा मानला तरी एकवेळ पत्करेल. पण त्यांतून काढलेले सिद्धान्त मात्र त्यांनीं नाकारूं नयेत.

घरोघरीं मातीच्याच चुली किंवा कोठेंहि गेलें तरी पळसाला पानें तीनच म्हणतात त्याप्रमाणें कोणत्याहि कालाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय वगैरे परिस्थितीचा विचार केला तरी मूळ अवस्था व तिचे अनंत पर्याय सारखेच असावयाचे. बदल दिसला तरी तोहि नियमासिद्धच. अनंतकालचक्रांतील कोटाकोटी सागरोपम वर्षांच्या वाटेल त्या आऱ्याचा इतिहास पाहिला तरी निर्णय एकच. प्रत्येक काळांत मिथ्यात्व मातलें व प्रत्येक कालांत त्याचें निरसनही झालें. प्रत्येक कालांत बरेच लोक मोक्षाला गेले व प्रत्येक काळांत अगणित जीव भवचक्रांत भ्रमण करीतहि राहिले. पापाचा भार व्हावयाचा हा जसा नियम तसाच पुण्योदय व्हावयाचा हाहि नियम. मग अमुक ठराविक कालीं अमुक जीव पापबन्ध करीत असतील व अमुक जीव पुण्यबन्ध करीत असतील व अमुक जीव सर्व

बंध विनिर्मुक्त होत असतील. याप्रमाणें पर्यायांत फरक असला तरी मूळस्वरूपांत निश्चितताच आहे. मुमुक्षू जीवानें मिथ्यात्वाचा त्याग करून सम्यक्त्व आदरावें व मोक्षसंपदा मिळविण्यासाठीं पौद्गलिक संपदा सोडावी हे योग्य आहे. पण पौद्गलिक संपदेच्या मोहांतून व मिथ्यात्वांतून प्रत्येक जीव जातच असतो हे ओळखल्यावर कोणाचा तिरस्कार करावयाचा? कींव मात्र करतां येईल व इतिहासांतील वाईट गोष्टी जाणण्याचा हाच उद्देश आहे. असो. जी गोष्ट धार्मिक बाबतींत तचि सामाजिक बाबतींतहि खरी आहे. लोभ, क्रोध, मान, माया वगैरे कषायांनीं पीडित होऊन जीव अनेक भेद माजवीत उलाढाली करीत राहणारच. प्रत्येक जीवाचा हा इतिहास कोठपर्यंत वर्णावा? पण कषायविनिर्मुक्तच शेवटीं सुखी होतो हा सिद्धान्त जाणण्यासाठींच त्या इतिहासाच्या अनुभवाची जरूरी आहे व म्हणूनच तेवढ्यापुरता इतिहासहि हवा असतो. संसारांत सुख दुःख हें ठरलेलेंच. ही गोष्ट न विसरतां कित्येक कष्टी होतात, कित्येक तें ओळखून सुखदुःख मानण्याचें सोडतात. पण या दोन्ही तऱ्हेचे लोक अनादिकालापासून या जगांत गडबड माजवीत आहेतच. जाणूनबुजूनहि कष्टी होणारे जीवहि असंख्य आहेत. त्यामुळें होणाऱ्या सामाजिक घडामोडी सर्वकाळीं सारख्याच. राजकीय बाबतींतहि सर्वकाळीं सारखेच अनुभव आलेले आहेत. राजाराजांच्या चढाओढींत असंख्य जीवांची हत्या, धनाचा अपव्यय व कालहानि झालेली आहे. ही गोष्ट वाईट असें समजून अनेक राजे गुण्यागोविंदानेंहि नांदलेले आहेत. राजसत्ता, लोकसत्ता, सरदारसत्ता व प्रधानसत्ता वगैरे अनेक तऱ्हेच्या राज्यपद्धति निरनिराळ्या काळीं होऊन गेल्या. राजा, लोक, सरदार व प्रधान सज्जन असले म्हणजे प्रजेला सुख लाभतें व दुर्जन असले कीं, प्रजेवर जुलूम गुदरतो असाच अनुभव आहे. म्हणून सज्जनसत्ता हीच सर्वश्रेष्ठ होय. वरील तऱ्हेच्या निरनिराळ्या राज्यपद्धति प्राचीनकाळींहि वेळोवेळीं होऊन गेलेल्या आहेत. अनेक मदोन्मत्त राजे होऊन गेले, त्यांनीं पुष्कळ डामडौल केला पण सारेच नश्वर. कांहीं सत्ताधाऱ्यांनीं धर्मप्रभावना केली. भव्य जीवावर त्याचा योग्य परिणाम झाला. पण अभव्य तसेच राहिले. आर्थिक परिस्थितींतही अनेक उलाढाली होत आल्या. अनेक दुर्भिक्षें येऊन गेलीं, असंख्य जीव मेले व पुन्हां जन्मले. कित्येक देश उजाड झाले व नवे वसले, पण सर्व घडामोडींचें

सार एकच. धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक वगैरे बाबतींत प्राचीन काळीं ठराविक स्वरूपाच्या व विलक्षण पण नियमसिद्ध अशा अनेक घडामोडी झाल्या, पण त्या सर्वांचें तात्पर्य हेंच कीं, कषायामुळें जीव भवभ्रमण करीत असतो. कषायजनित कर्माचें बंधन संपलें कीं, तो मुक्त होतो. जग अनादि अनंत आहे व परिवर्तनशाली आहे.

वीरकालीन अनंत घडामोडींचा इतिहास आणखी सांगितला तरी जो या प्रकरणांत थोडा सांगितला आहे तसाच असणार. नांवें व हकीगतीच तेवढ्या भिन्न, पण सर्वांचें सार एकच. हें सार जाणणें हाच इतिहासकथनाचा उद्देश आहे. या व मागील प्रकरणांत प्राचीन कालाबद्दलची जी चर्चा केली आहे तीवरून हेंच दिसून येईल कीं, मिथ्यात्व व सम्यक्त्व फार अनादिकालापासून चालत आलें आहे. मिथ्यात्वाचा त्याग करून सम्यक्त्वाचा स्वीकार केल्याशिवाय भवचक्रांतून मुक्तता होणार नाहीं. हें सम्यक्त्व स्वावलंबनाचे जोरावर कांहींजण प्राप्त करून घेतात, व कांहींजणांना अत्यंत बलशाली अशा तीर्थकरांच्या आगमनानें प्राप्त होतें. तथापि नवीं कर्में सोडून देऊन जुन्या कर्मबंधांचा क्षय तपश्चर्येनें किंवा भोगून प्रत्येक जीवाला स्वतःच करावा लागतो. या बाबतींत दुसऱ्याचा उपयोग होणार नाहीं. जग हें अनाद्यनंत व स्वयंभू आणि परिवर्तनशाली आहे. जीवाला अनंत भवांतून मार्ग काढावा लागतो, पण शेवटीं प्रत्येक भव्यजीवाला मोक्षप्राप्ति आहेच. मोक्षस्थिती मात्र अगदीं स्वाभाविक व शाश्वत आहे. अनादि कालापासून अशा घडामोडी होत आल्या आहेत. कालानुसार या घडामोडींत जो फरक दिसून आला त्यालाहि कांहीं ठराविक नियम आहेत व ते मागे दिलेच आहेत. अनेक सिद्ध महात्मे, राजे, सरदार, शेटसावकार व इतर प्रकारचे जीव होऊन गेले, हल्लीं आहेत आणि पुढें होतील, पण त्या सर्वांचें चरित्र बहुतेक सारखेंच. त्या सर्वांच्या चरित्राचें सार सारखेंच. मोक्षप्राप्तीच्या बाबतींत तांतडी चालत नाहीं. अनंत कालचीं कर्में एकदम छेदलीं जात नाहींत. प्रयत्न सर्व जीवांना निश्चित स्वरूपाचेच करावे लागतात. कोणत्याही तीर्थकरांचें चरित्र पाहिलें तरी त्यानें पूर्वकर्मानुसार अनेक जन्ममरण भोगले, कर्मबंध अगदीं पातळ झाल्यावर वैराग्य उत्पन्न झालें, तेव्हां त्यांनीं दीक्षा घेऊन घोर तपश्चर्या करून जुन्या कर्मबंधांचा क्षय केला व नवे कर्मबंध होऊं दिले नाहींत. सर्व कर्मांचा क्षय झाल्यावर

ते केवळज्ञानी झाले व नंतर धर्मप्रभावना करून ते मोक्षाला गेले. त्यांना जे विशेष गुण होते ते सोडल्यास इतर सर्व बाबतींत प्रत्येक जीवाला वरील प्रकारच्या अवस्थेंतूनच जावें लागतें. जसें ऋतुमान, दिनमान ठरलेलें आहे तसेंच कालमानादि ठरलेलें आहे. विशिष्ट कालांत धर्माची अभिवृद्धी व विशिष्ट कालांत धर्माला ग्लानि येत असते. तीर्थंकर होण्याचेहि निश्चित काळ ठरलेले आहेत. याप्रमाणें अनंत कालच्या घडामोडींतून सुसूत्र इतिहास वरीलप्रमाणें पाहून खालीलप्रमाणें निश्चित सिद्धान्त काढतां येतात.

उत्तरध्रुवाकडून आलेल्या लोकांनीं आपल्या पितृभूमीचीं गीतें भारतभूला मायभूमी बनविल्यावर गाण्याचा परिपाठ ठेवला. त्याप्रमाणें वेदांतील ऋचा म्हणजे उत्तरध्रुवाकडील नैसर्गिक वैभवांचें काव्यमय व सूत्रमय वर्णन होय. पुढें या टोळ्या गंगायमुनेच्या किनाऱ्यापर्यंत आल्या. तेथील कमी दर्जाच्या लोकांना त्यांनीं आत्मसात केलें. कच्चें मांस खाणें, गोरस पिणें व सुरापान करणें एवढ्यावरच न राहतां ते आतां एतद्देशीय लोकांकडून शेती करवून घेऊन कच्चें धान्य व कंदमुळेंहि खाऊं लागले. भारतीय उच्च संस्कृतीशींहि त्यांचा पुढें संबंध आला, तेव्हां त्यांनीं इंद्रादि देवांनाच देवता मानलें. पितृ-भूमीबद्दलच्या काव्यांतील ऋचांनाच या इंद्रादि देवांचीं स्तोत्रें बनविलीं व आपण खात असलेले पदार्थ अग्निमुखांतून या देवतांना अर्पण करण्यास त्यांनीं सुरवात केली. याप्रमाणें त्यांची एक यज्ञमार्गी वैदिक संस्कृति बनली. पुढें भारतीय संस्कृतीचा अधिक परिचय झाल्यावर त्यांना कळून आलें कीं, इंद्रादि देवांची मानवगतीप्रमाणेंच एक गती आहे. ते कांहीं पूजनीय देव नव्हत. तेव्हां संभवनाथतीर्थंकरांचे काळांत यज्ञमार्गीयावर लिंगी संस्कृतीचाहि परिणाम होऊन शिवपूजा सुरू झाली व अद्वैततत्त्वज्ञान निर्माण झालें. नंतर उपनिषदें व षड्-दर्शनें निर्माण झालीं. पुढें ईश्वरकर्तृत्वाचें खूळ निर्माण होऊन दशावतारांची कल्पना निघाली व मल्लिनाथ तीर्थंकरांचे कालापासून परशुराम, राम व कृष्ण या तिन्ही चक्रवर्तींना विष्णूचे अवतार समजून देवासमान पुजण्यास सुरवात झाली. नंतर महावीर काळांतहि गौतमबुद्धाला विष्णूचा अवतार मानून बौद्ध म्हणून भजण्यास सुरवात झाली. आता तर प्रत्येक विभूतीला देवावतार मानून त्याला पूजण्यांत येऊं लागलें आहे. हिंसात्मक यज्ञांचें मिथ्यात्व कमी झालें असलें तरी अवतारांचें बंड फार वाढलें आहे व या मिथ्यात्वानें सर्व जनतेला नाडलें आहे.

महावीर पूर्वकालीं परशुराम, राम, कृष्ण व शिवभक्तीला ऊत आला होता; हिंसात्मक यज्ञांनाहि पार नव्हता व चातुर्वण्यांतील रहस्य जाऊन असमता व उच्चनीच भेद मातले होते. या सर्व मिथ्यात्वांचें निर्दळण करणें हेंच महावीर तीर्थंकरांचें काम होतें. असो. आतां महावीर तीर्थंकर झालेल्या भव्यजीवाच्या पूर्वभवांचें दिग्दर्शन करून हें प्रकरण संपवूं.

प्रत्येक जीवाला जन्ममरणाच्या अनंत फेऱ्यांतून जावें लागतें व कर्मांचीं फळें भोगून त्यांचा क्षय झाल्यानंतरच त्याला मुक्ति मिळते. या नियमांतून इतर जीवांप्रमाणें तीर्थंकरांचा जीवहि सुटलेला नाहीं. तीर्थंकरांच्या जीवालाहि अनेक जन्म धारण करून कर्मांचा उच्छेद करावा लागतो; त्याप्रमाणें महावीर तीर्थंकरांच्या जीवालाहि अनेक जन्ममरणांच्या फेऱ्यांतून जावें लागलें. या पूर्वभवांतूनच त्यांनीं षोडशभावनांचें चिंतवन केलें व तीर्थंकरपदवीचें नामगोत्रकर्म बांधलें. महावीर तीर्थंकरांच्या जीवानें पूर्वी अनेक जन्म धारण केले असतील, पण जैनशास्त्रांतून त्या जीवाच्या पहिल्या मनुष्य भवापासूनचेंच वर्णन आहे. मधुवनांत महावीरस्वामींचा जीव पुरुरवा नांवाचा भिल्ल होता. भिल्लाच्या राहणीनुसारच पुरुरवाची राहणी रानटी होती. पण त्याच्या शुभकर्मोदयामुळें सागरसेन नांवाचे दिगंबर मुनि विहारांत असतांना त्याला मधुवनांत भेटले व त्यांनीं त्याला धर्मलाभ दिला. अहिंसेचें अणुव्रत त्यांनीं त्याला दिलें व अशा लोकांच्या स्वभावानुसार त्यानें तें एकनिष्ठेनें पाळलें. त्यामुळें तो मेल्यानंतर सौधर्म स्वर्गांत देव झाला. कर्मानुसार तेथील फलभोग संपल्यावर तो जीव भरतचक्रवर्तीच्या पोटीं मरीचि नांवानें जन्माला आला. त्यानें ऋषभ तीर्थंकराजवळच दीक्षा घेतली होती. पण कठिण परिषह सहन न झाल्यामुळें त्यांनीं दिगंबर मुद्रा सोडून मन:पूत आचरण्यास सुरवात केली. यानें घातलेल्या नव्या मार्गाचेंच पुढें सांख्यमतांत परिणमन* झालें. सांख्यमत जैनतत्त्वज्ञानाशीं बरेंच जुळते पण तितकें तें खोल गेलेले नाहीं व त्यांत चारित्र नाहीं. असो. मरीचि मेल्यानंतर पांचव्या स्वर्गांत कुटिलदेव झाला.

तेथील भोगावळी संपल्यावर तो जीव कौलियक नगरींत कौशिकब्राह्मणाचें पोटीं जन्माला आला. या जन्मांतहि मिथ्यात्वाचा जोर होता. तेथून हा जीव पहिल्या स्वर्गांत देव झाला. पुढें स्थूणागर नगरांत भारद्वाज ब्राह्मणाचें घरीं पुष्पमित्र नांवानें तो जीव जन्मला. येथें त्याला हटयोगाची रुचि लागली व मेल्या-

नंतर तो देवगतीला पोहोंचला. तेथून तो जीव श्वेतिविका नामक नगरींत अग्निभूति व गौतमी या अग्निहोत्री जोडप्याचे पोटीं अग्निसह नांवानें जन्मला. बरींच वर्षे अग्निहोत्र करून शेवटीं त्यानें संन्यास घेतला व मेल्यानंतर तो सनत्कुमार स्वर्गांत देव झाला. तेथून तो मंदिरपुरांत गौतमब्राह्मणाचे पोटीं अग्निमित्र नांवानें जन्मला. या जन्मांतहि ब्रह्मकर्म करून तो जीव देवगतीला गेला. पुढें स्वस्तिमति नगरींत संतशयन ब्राह्मणाचे पोटीं भारद्वाज नांवानें तो जन्मला. शेवटीं संन्यास घेऊन मेल्यानंतर तो देवगतीला पोहोंचला. तेथें बराच काल घालवून पुढें तो जीव नरक, एकेंद्रिय, द्वींद्रिय वगैरे गतींतून भटकत राहिला. पापबंध संपल्यावर शुभ कर्मोदयामुळें राजगृह नगरींत शांडिल्य व पाराशरी या ब्राह्मण-जोडप्याचें पोटीं स्थावर नांवानें तो जन्मला. ब्रह्मकर्मे करून शेवटीं संन्यास घेऊन तो ब्रह्मस्वर्गांत देव झाला. नंतर राजगृहीं नगरांत विश्वभूति राजाचें पोटीं हा जीव विश्वनंदी नांवानें जन्मला. कांहीं दिवस संसारसुख भोगल्यानंतर आपला भाऊ विशाखभूती यास राज्य देऊन विश्वभूति राजा साधु झाला व आपला मुलगा विश्वनंदी यांस त्यानें युवराजपद दिलें. विशाखभूतीचा मुलगा विशाखनंदी यास विश्वनंदीबद्दल मत्सर उत्पन्न झाला व विशाखभूतीनेंहि मुलाचीच कड घेऊन युद्ध केलें, पण विश्वनंदीचा पक्ष न्याय्य असल्यामुळें प्रजेनें त्यालाच अधिक मदत केली व म्हणून त्याचा विजय झाला. तथापि त्याला वैराग्य प्राप्त होऊन त्यानें दीक्षा घेतली. नंतर विशाखभूतीनेंहि विशाखनंदीकडे राज्यकारभार सोंपवून दीक्षा घेतली. प्रजेच्या मनांतून विशाखनंदी उतरला असल्यामुळें पुढें पदच्युत झाला. एकदां विश्वनंदी मुनि रस्त्यानें चालले असतां गायीनें मारल्यामुळें खालीं पडले. तें पाहून विशाखनंदी हांसला. त्यामुळें विश्वनंदीला अतिशय संताप चढला व त्या भरांत तो मृत होऊन दहाव्या स्वर्गांत देव झाला. तेथून तो जीव पोदनपुरचा राजा प्रजापति व राणी मृगावति यांच्या पोटीं त्रिपिष्ट नांवानें जन्मला. त्रिपिष्ट चक्रवर्ती झाला व अनेक पापें आचरल्यामुळें नरकाला गेला. नरकांतील कर्मभोग संपल्यावर प्रविपुळ पर्वतांत सिंहाच्या जन्माला गेला. हा सिंहहि मरून नरकाला गेला व पुन्हा तो वराह पर्वतांत सिंहाचेच जन्मास गेला. शुभकर्मोदयामुळें त्या सिंहाला अमितकीर्ति व अमितप्रभु नामक दोन चारण मुनींचें दर्शन झालें. त्यामुळें मेल्यावर तो जीव सौधर्मस्वर्गांत हरिध्वजनामक देव झाला.

# महावीर पूर्वकाल

कच्छप्रांतांतील हेमपूरचा राजा कनकाभ याचे पोटीं तो जीव कनकध्वज नांवानें जन्मला. उत्तम रीतीनें संसार करून शेवटीं कनकध्वजानें दिगम्बर दीक्षा घेतली. सल्लेखनाव्रतानें देह सोडून तो जीव आठव्या स्वर्गात देव झाला. पुढें हा जीव उज्जायिनी नगरीचा राजा वज्रसेन व राणी सुशीला यांचे पोटीं हरिषेण नांवानें जन्मला. संसार करीत असतांना श्रावकव्रतें पूर्णपणें पाळून शेवटीं सुप्रतिष्ठ मुनीजवळ त्यानें दीक्षा घेतली व समाधीमरण साधून तो जीव प्रीतिवर्धन विमानांत वैमानिक देव झाला. तेथून हा जीव क्षेमद्युति नगरांत धनंजय राजाचे पोटीं प्रियमित्र नांवानें जन्मला. त्यानें जिनभक्ति केली व पुढें चक्रवर्ती झाला. शेवटीं चक्रवर्ती पद सोडून त्यानें क्षेमकर मुनींच्या जवळ दीक्षा घेऊन समाधी मरण साधून तो रूचक वैमानिक देव झाला. तेथून तो जीव श्वेतातपात्रा नगरींत राजानंदवर्धन व राणी वीरवती यांच्या पोटीं नंदन नांवानें जन्मला. नंदवर्धनानें नंदनाला राज्य देऊन पिहिताश्रव मुनीजवळ दीक्षा घेतली. मुनीजवळून आपले पूर्वभव ऐकून नंदनालाहि एकदम वैराग्य उत्पन्न झालें व सल्लेखना साधून तो पुष्पोत्तर विमानांत देव झाला. हा देवच पुढें महावीर तीर्थंकर म्हणून जन्मला.

याप्रमाणें थेट ऋषभतीर्थंकरांचे कालापासून महावीर स्वामींचा जीव मुक्तीसाठीं धडपडत आहे. मध्यंतरी त्या जीवानें तीर्थंकर नामगोत्रकर्म बांधल्यामुळें महावीर तीर्थंकर होऊन तो मोक्षाला गेला. हें भवभ्रमण जीवाला फारच गांजतें. मोक्षाची स्वाभाविक स्थितीच खरी सुखदायक होय. पण पौद्गलिक सुखाच्या नादीं लागून जीव आर्त व रौद्रध्यान लावतो व त्यामुळें कर्मबंध होऊन त्याची फलें भोगण्यासाठीं अनेक जन्ममरणांचे फेरे जीवाला फिरावे लागतात. हीं फलें भोगतां भोगतांच नवे कर्मबंध होतात व रहाटगाडगें तेव्हांच थांबतें कीं जेव्हां जीव धर्म व शुक्लध्यानीं रत होऊन नवें कर्मबंध होऊं देत नाहीं, व तपश्चरणानें जुने कर्मबंध छेदून टाकतो. महावीर तीर्थंकरांनीं तसें केलें व जितके जीव आजपर्यंत सिद्ध पदवीला पोहोंचले त्या सर्वांना असेंच करावें लागलें. अनंत सिद्धांनीं हा मार्ग आपल्या आचरणानें भव्यजीवांना घालून दिला आहे व तोच तीर्थंकरांनींहि उपदेशिला आहे. हल्लीं जे अनंत जीव या कर्मभूमींत आहेत त्या सर्वांना कर्मबंध करण्याची किंवा न करण्याची मुभा आहे. भोगभूमींत असलेल्या जीवांना केवळ कर्मफलें भोगण्याची सत्ता आहे. नवे कर्मबंध बांधण्याची किंवा जुने छेदण्याची शक्ति त्यांना नाहीं. म्हणूनच रत्नत्रयीला साधक केवळ ही कर्मभूमीच

आहे असें म्हटलें जातें. मनुष्यजन्म हा तर रत्नचिंतामणी आहे. मनुष्यभवांत मोक्षपद प्राप्त करून घेणें शक्य असतें. तीर्थकरांचा उपदेश अंगीं बाणून घेऊन त्याप्रमाणें व अनंत-सिद्धांच्या मार्गानें प्रत्येक जीवानें प्रयत्न करून अव्याबाध व स्वाभाविक सुखाची प्राप्ति करून घेतली पाहिजे. या बाबतींत सर्व भव्यजीव समान अधिकारी आहेत. तीर्थकराच्या जीवालाहि कर्मभोग चुकले नाहींत. त्यांनाहि कर्मबंध टाळण्यासाठीं खडतर तपश्चर्या करावी लागली; तेव्हांच त्यांना मुक्ति-सुख प्राप्त झालें. प्रत्येक जीवाला तसेंच करणें भाग आहे. त्यासाठीं त्यालाच प्रयत्न केले पाहिजेत. तीर्थकर व सिद्ध परमात्मे केवळ ध्येय म्हणून पुढें ठेवण्यास उपयोगी आहेत. त्याहून त्यांची अधिक मदत होणें शक्य नाहीं. जसें व जितकें कर्म जीव करील तसें व तितकें फल त्याला मिळेलच असा स्वभाव-सिद्ध कायदाच आहे. हा कोणाच्या मर्जीचा प्रश्नच नाहीं. महावीर तीर्थकरांच्या पूर्वभवावरून हाच बोध घ्यावयाचा कीं कर्मफल कोणालाहि सुटणें नसून प्रत्येकानें तें प्रयत्नानेंच टाळलें पाहिजे. तीर्थकर म्हणजे किती बलिष्ठ आत्मसत्ता आहे तें तीर्थकर महात्म्यांत सांगितलें आहे. प्रत्येक जीवाला तसें होतां येणें शक्य नसलें तरी सर्व भव्यजीवांना त्यांची सिद्ध पदवी प्राप्त करून घेतां येईल. प्रत्येक जीवाची तीच स्वाभाविक स्थिति आहे व ती गांठणेंच प्रत्येक जीवाचें कर्तव्य आहे.

---

## प्रकरण चवथें.

# महावीर समकाल.

पार्श्वनाथ तीर्थकरांना होऊन अडीचशेंच वर्षे झालीं होतीं, पण एवढ्या काळांत फिरून मिथ्यात्वाला फारच जोर चढला होता. दिवा विझतांना ज्याप्रमाणें मोठा होतो त्याप्रमाणेंच खोट्या उपासनामार्गाच्या मिथ्यात्वापुरता तरी निदान तो खरा ठरला असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण महावीरतीर्थकर लगेच अवतरले व त्यांच्याबरोबरच सिद्धार्थ गौतमहि हिंसात्मक यज्ञ व असंख्य देवतो-पासनेला विरोध करण्यास त्याच वेळीं सज्ज झाले. या दोन थोर पुरुषांच्या सामुदायिक बलामुळें वेदमार्गाचें मिथ्यात्व जवळ जवळ जमिनदोस्तच झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं, व शंकराचार्यांनीं जेव्हां वैदिक धर्माचें पुरुज्जीवन

केलें तेव्हांहि हिंसात्मक तामसी यज्ञपद्धति अजीबात बंद करून त्यांनीं बौद्ध व जैनमताचा विजय मान्य केला यांत मुळींच शंका नाहीं. शंकराचार्यांच्या ब्राह्मणी धर्मावर जैनमताचा छाप पडली याबद्दल १९०४ सालीं बडोद्यास भरलेल्या जैन कॉन्फरन्सचे वेळीं खालील उद्गार टिळकांनीं काढलेले आहेत: "जैन धर्माचें महत्त्व आज ब्राह्मणधर्मानुयायांस बरोबर कळत नाहीं तसें दोन हजार वर्षांपूर्वी नव्हतें. जैनधर्म व ब्राह्मणधर्म यांचा त्यावेळीं मोठा झगडा चालला होता. अहिंसा व मुक्तिसाधनाचें सर्व वर्णांना ज्ञानदान हीं तत्त्वें जैनांनीं प्रमुखपणें स्वीकारलीं होतीं. मीमांसक मुक्तीकरितां हिंसात्मक यज्ञयाग करीत. पशुवधानें मोक्षप्राप्ति होत नाहीं असें गाजवून सांगून जर कोणी दयेचा ध्वज प्रथम उभारला असेल तर तो मान जैनांनाच आहे. ब्राह्मणधर्म व जैनधर्म यांच्या तत्त्वांतील कारण हिंसाच होय...... अहिंसेचें तत्त्व पूर्णपणें पाळणारे लोक पृथ्वीवर जैनच आहेत. पंचद्राविड ब्राह्मण निवृत्तमांस आहेत हा जैनांचाच प्रताप होय. अशा रीतीनें दुसऱ्या धर्मावर छाप बसवून जय मिळविल्यामुळें जैनांनीं जैन हें नांव अन्वर्थ केलेलें आहे पशुयज्ञ वेदविहित मानला असल्यामुळें ब्राह्मण सोडीनात आणि जैन म्हणत कीं, वेदांत हिंसा असेल तर ते वेद आणि अहिंसेनें तृप्त होणाऱ्या देवता आम्हांस पूज्य नाहींत. वेदामध्यें पशुयज्ञासंबंधाचें जें श्रौतप्रकरण आहे त्यावरून जैनांना वेदांचें प्रामाण्य नाकबूल करावें लागलें. शेवटीं ब्राह्मणांनीं जैनांचें अहिंसातत्त्व स्वीकारलें आणि हिंदुधर्माची पुन्हा स्थापना झाली. तेव्हां ब्राह्मणांनीं अहिंसातत्त्व आपल्या धर्मांत दाखल केलें ...... जगांत अहिंसा तत्त्वाचा प्रसार करण्यांत महावीरस्वामींनीं जी दृढता दाखविली ती अवतारी पुरुषाखेरीज दुसऱ्यांना दाखवितां येण्याजोगी नाहीं. जैनधर्मामागून झालेल्या बौद्धधर्मानेंहि जैनधर्मापासूनच अहिंसातत्त्व स्वीकारलें." मिथ्यात्व वेदमार्गीयांनीं सोडलें. इतकी विलक्षण क्रांति महावीर कालीं झाली हें आश्चर्य होय. सम्यक्त्वाचा विजय झाला यांत कांहींच आश्चर्य नाहीं. कारण सत्यमेव-जयते असा शाश्वत सिद्धान्त आहे. इ. स. पूर्व सहावें शतक हें भारतवर्षाला तर विशेष महत्त्वाचें आहेच, पण जगाच्या इतर भागांतहि या कालांत विशेष फरक झाले आहेत. भरतखंडांत या शतकांत धार्मिक, राजकीय, सामाजिक व आर्थिक वगैरे सर्वच बाबतींत विलक्षण क्रांति झाली असल्यामुळें भारतीय इतिहासांत हें शतमान फार महत्वाचें आहे. त्यावेळची परिस्थिति जाणण्यासाठीं त्यापूर्वी कोणती स्थिति होती तें प्रथम पाहिलें पाहिजे.

तीच महावीरसमकालीन स्थिति होय. त्यांच्या उपदेशांच्या परिणामामुळें निर्माण झालेली परिस्थिति वीरोत्तरकालीन परिस्थिति होय.

पार्श्वनाथतीर्थकरांच्या उपदेशामुळें अनेक भव्यजीव मुक्तीला गेले असतील व कांहीं अंशीं धार्मिक प्रगति म्हणजे जैनधर्माची प्रभावना झाली असेल, पण मिथ्यात्वाचा जोर कांहीं कमी झाला नव्हता. उलट पार्श्वनाथस्वामींच्या निर्वाणानंतर मिथ्यात्वीं मतें अधिकच वाढलीं असें दिसून येतें व त्या सर्वांचा जोर महावीरस्वामींच्या वेळीं होता. त्यावेळीं मोठमोठे चौऱ्यांशीं पंथ प्रचलित होते, असें जैन ग्रंथांतून म्हटलेलें आहे. त्यांपैकीं प्रमुख पंथ व त्यांचें प्रवर्तक खालीलप्रमाणें होते. पहिला पंथ पूर्णकाश्यपाचा. त्या काळीं दिगम्बरत्व हें साधूला आवश्यक मानलें जात असे. पूर्णकाश्यप नग्नपणें विचरत असे व स्वतःला तीर्थंकर म्हणवून घेत असे. जें कांहीं कर्म घडतें तें आत्मा करीत नसून आपोआप घडतें असा त्याचा सिद्धांत होता. त्याकाळीं नियतिवाद्यांचा जो एक जबरदस्त पंथ होता व ज्याचें रूपांतर पुढें वैष्णवशैवादि ईश्वरेच्छावादी लोकांत झालें त्यापैकींच पूरण काश्यप एक होता असें म्हणावयास हरकत नाहीं. दुसरा पंथ प्रवर्तक मक्खलि गोशाल. हे पूर्वी पार्श्वनाथस्वामींच्या संघांतील होते. पुढें दिगम्बरमुनींचें चारित्र पाळणें अशक्य झाल्यामुळें ते आजीवकपंथाचे झाले. Ignorance is bliss अज्ञानांतच सुख आहे असें एक वचन आहे व तें एका अर्थी खरें आहे. मोक्षालाहि अज्ञानच साधन आहे असें गोशालाचें मत होतें. म्हणून ज्ञानप्राप्तीसाठीं मुळींच साधना न करतां अगदीं अज्ञान स्थितींतच राहणें उत्तम, असा त्याचा उपदेश होता. तिसरे मोठे पंथप्रवर्तक संजय वेरत्थी किंवा मौद्गलायन हे होत. हेहि पार्श्वनाथस्वामींच्या शिष्यपरंपरेपैकींच होत. स्याद्वादमताचा विपर्यास करून हे उपदेश देत असत. चौथे मतप्रवर्तक अजितकेश कंबली होत. यांना पुनर्जन्म मुळींच मान्य नव्हता. चार महाभूतापासून हें जग व आत्मादि निर्माण झालें अशा मताचा ते प्रसार करीत. हें जवळजवळ चार्वाक मतच होतें. पांचवे मतप्रवर्तक पकुडकात्यायन होत. जें आहे त्याचा कधींहि नाश होत नाहीं व असत्तेमधून कशाची उत्पत्तीहि होत नाहीं असा त्यांचा अभिप्राय होता. पृथ्वी, आप, तेज, वायु, सुख, दुःख व आत्मा हीं सात तत्वें व प्रमुख जगांतील सर्व घडामोड त्यांच्यामुळेंच होते; सुखतत्वामुळेंच संयोग व दुःखतत्वामुळें वियोग होतो वगैरे प्रकारचें त्यांचें मत होतें. या मतप्रवर्तकांच्या विचार-

सरणींत खोल उतरून कांहीं लाभ होणार नाहीं. त्यांच्या सर्व शिकविणीचें सार हेंच कीं, शुभ प्रयत्नांची मुळींच जरूर नाहीं व जी कांहीं स्वाभाविक प्रवृत्ति आहे तिला रोकण्याचीहि आवश्यकता नाहीं. त्यामुळें धर्माचरणाचा लोप व स्वेच्छाचारास पाठबळ मिळत असल्यामुळें अर्थात्च या तोतया तीर्थकरांच्या नादीं बहुसंख्यांक मूढ समाज लागला असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं. मनाला वाटेल तसें वागा. तुमच्या कर्मांना तुम्ही जबाबदार नाहीं व तुम्हांला जाब विचारणाराहि कोणी नाहीं असें सांगणारा भेटल्यावर मूढ जनांना आणखी काय पाहिजे ? असो.

वैदिक धर्मीयांच्या लीला तर याहूनहि अधिक घातुक होत्या. त्यांनीं तर मांसाशन व सुरापान आणि इतर स्वेच्छाचार मोक्षसाधकच ठरविला होता. त्यामुळें यज्ञयागांना ऊत आला होता, मूक पशूंच्या हिंसेला सीमा नव्हती व पुरुषार्थाला थाराच नव्हता. सम्यक्‌धर्मापासून समाज फार दूर गेल्यामुळें तो दुःखाच्या खोल गर्तेत अधिकाधिक पडत होता. पण त्यांच्या धर्मगुरूंनीं त्याला इतकें भारून सोडलें होतें कीं, वरवर सुखकारक दिसणारा मार्गच शाश्वत सुखदायक मोक्षाचा आहे, असेंच त्याला वाटे. अशा वेळीं या मूढ जीवांना व मूक प्राण्यांना दुःखांतून सोडवून खऱ्या सुखाच्या मार्गाला लावणारा कोणी तरी पाहिजे होताच व अशा योग्य वेळीं महावीर तीर्थंकर आल्यामुळें इतर कांहीं तीर्थंकराच्या काळाला जें महत्व आलें नाहीं तें महत्व महावीरकाळाला आलें यांत शंका नाहीं. उत्तरध्रुवाकडील नैसर्गिक वर्णनांना वैदिकांनीं जें एकदां देवता व अर्चन मंत्र म्हणून कल्पिलें तें कायमचेंच. त्या देवतांचे नांवानें अजूनहि यज्ञ चालू आहेतच. भारतीय तत्वज्ञानाची छाप जरी आर्यांवर पडली तरी त्यांचें एक निराळेंच वैदिक तत्वज्ञान बनलें. ईश्वर, सृष्टि, आत्मा, मोक्ष, मोक्षसाधन वगैरे कल्पना आर्यांना भारतवर्षांत आल्यावर जरी सुचल्या तरी मूळ भारतीय तत्वज्ञानाहून त्यांचें तत्वज्ञान अगदीं भिन्न आहे. यज्ञसमारंभ हे या तत्वज्ञानाचें मुख्य अंग होय. वीरकालीं तर वैदिकधर्म म्हणजे हिंसात्मक यज्ञ व तें करणें म्हणजेच धर्मसाधन अशीच हल्लीं ज्याप्रमाणें हिंदुधर्म म्हणजे जातिधर्म अशी कल्पना आहे, तशी कल्पना रूढ होती. तत्वज्ञानाची चर्चा यज्ञकालीं, पितृतर्पण यज्ञकालीं, राजकीय उहापोह यज्ञकालीं, किंबहुना प्रत्येक गोष्ट यज्ञद्वारींच त्यावेळीं केली जात असे. मूल जन्मल्यावर यज्ञ, अध्ययनारंभीं यज्ञ, विवाहसमयीं यज्ञ व मेल्या-

बरहि यज्ञ. याप्रमाणें उठतां बसतां यज्ञ होऊं लागल्यामुळें पुरोहितवर्गाचें प्रस्थ फार माजलें होतें. या ब्राह्मणपुरोहितवर्गाच्या हातीं सर्व समाजाच्या नाड्या यज्ञाच्या निमित्तानें आल्यामुळें तो वर्ग समाजास डोईजड होऊन बसला. ऐहिक व पारलौकिक अशा दोन्ही कार्यांतून त्यांची मध्यस्थी समाजास जाचक होऊं लागली. याचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य क्षत्रियवर्गातच होतें व त्याप्रमाणें तें त्या वर्गानें केलें. गौतमबुद्धाला ही ब्राह्मणांची लुडबुड नको होती. ती ऐहिक बाबतींत नको होती म्हणून मूक प्राण्यांच्या हिंसेच्या सबबीवर यज्ञसंस्थाच त्यानें बंद पाडली व या कार्याला पायाभूत असलेल्या स्वर्गनरकाच्या व इंद्रादि देवतांच्या कल्पनेलाच त्यानें उडवून दिलें. आत्मोन्नतीस ब्राह्मण पुरोहितांच्या मध्यस्थीची जरूर नसून कोणालाहि भिक्षु होऊन किंवा दीक्षा घेऊन तपश्चर्या करतां येतें असें बुद्ध व महावीरांनीं उपदेशून ब्राह्मणांचें मिथ्यात्व व पाखंड हाणून पाडलें. नियतिवादी अनाचारी पंथ व हिंसात्मक यज्ञमार्गी वैदिक यांच्याशिवाय व्यर्थ कायशोषण करणारा एक हटयोग्यांचाहि पंथ त्यावेळीं बळावला होता. यालाहि रत्नत्रयमय सम्यक्धर्माचा व मध्यस्थीवर्गाचा प्रचार करून महावीर व बुद्धांनीं आळा घातला. तत्कालीन् समाजांत उच्चनीचत्वाचें बंड फारसें नव्हतें व आहाराविहारास जन्मजाति फारशा आडव्या येत नसत. ब्राह्मणकुलापेक्षां क्षत्रिय व वैश्यकुळाला अधिक मान होता. ब्राह्मणाचा व्यवसाय पौरोहित्याचा ब्राह्मण म्हणजे भूदेव किंवा ब्रह्मज्ञानी ही कल्पना त्यावेळीं नव्हती. ब्राह्मण व वैश्यांच्या मुली क्षत्रिय करीत असत. त्यावेळीं हल्लींप्रमाणें जातवार धर्म नव्हतें. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन्ही वर्णांच्या लोकांचें परस्पराशीं रोटीबेटीव्यवहार होत होते. वर्णभेद होण्याला कारण असा मनुष्याच्या शरीरांत वर्ण आकृतीचा बिलकूल भेद नव्हता. म्हणून ब्राह्मणादींचा शूद्रादिकांबरोबर गर्भाधानविधि होत असे. जीवन्धर कुमार जातीनें क्षत्रियपुत्र होते पण विद्याधर गरुडवेगाची कन्या गन्धर्वदत्ता इच्याशीं त्यांचा गांधर्व विवाह झाला होता. प्रीतिंकर या वैश्यपुत्राला राजा जयसेनानें आपली मुलगी पृथ्वीसुंदरी दिली होती. याशिवाय अनेक राजांचीं लग्नें परस्पर भिन्न जातींत झालेलीं आहेत. यावरून महावीरकालीं जातीभेद कोणत्याच प्रकारचा पाळला जात नव्हता असें दिसतें. इतिहास हा बहुतेक राजांचा किंवा मोठ्या विभूतींचाच लिहिला जातो; प्रत्येक व्यक्तीचा लिहिला जात नाहीं आणि यावरूनच तत्कालीन् परिस्थितीचें दिग्दर्शन करावयाचें असतें.

त्याकडे पाहतां आमचीं वरील विधानेंच खरीं ठरतात. सध्यांसारखें जातिभेदाचें वेड त्या वेळेस मुळींच नव्हतें. फक्त वर्णाश्रमपद्धतीच अस्तित्वांत होती. धर्माबद्दल निरनिराळीं मतें होतीं; तीं मर्जीप्रमाणें बदललीं तरी जात बदलत नसे. म्हणजे धर्ममत बदललें तरी जातीला बट्टा लागत नसे. असो. या धार्मिक बाबींप्रमाणेंच सामाजिक बाबतींत चातुर्वर्ण्याच्या मूळ हेतूचा दुरुपयोग करून ब्राह्मणांनीं स्वार्थसाधनास सुरुवात केली होती. धर्मगुरुत्व आपणाकडे घेऊन धर्मग्रंथवाचनाचा व साधु होण्याचा अधिकार त्यांनीं इतर वर्णांपासून हिरावून घेतला होता. क्षत्रियवैश्यादिकांना या अतिक्रमणाची फार चीड आली होती व ते ब्राह्मणांचें वर्चस्व झुगारून देण्यास आतुर झाले होते. अशा वेळीं मोक्षसाधनाचा सर्वांना अधिकार आहे असें सांगणारे महावीर व वाटेल त्याला भिक्षु करून घेणारे गौतमबुद्ध अवतरल्यावर त्यांच्याकडे सर्व समाज झुकला असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

या धार्मिक व सामाजिक स्थितीचा परिणाम राजकीय परिस्थितीवर झाल्याशिवाय मुळींच राहिला नाहीं. जैन व बौद्धांच्या अहिंसात्मक शिकवणीमुळें समाज निर्बल बनला व राष्ट्र परतंत्र झालें असा सिद्धान्त कांहीं दीड शहाणे ठोकून देतात; पण अहिंसा आत्मबल वाढविणारी आहे, पौरुष खर्ची करणारी नाहीं हें या मूढांना कळत नाहीं त्याला निरुपाय आहे. अहिंसेची शिकवण बलात्कार, अत्याचार, क्रौर्य. परपीडन, वगैरे शिरजोरीला रोकील, सामर्थ्याला रोकणार नाहीं. तसें असतें तर अहिंसेची ओळखहि नसलेले कोट्यावधि लोक मोठे शूर निपजले असते व म. गांधींसारखे अहिंसक वीर निर्माण झालेच नसते. पौरुष नाहींसें होतें तें अहिंसेच्या पालनानें नसून चैनबाजीनें आणि बेजबाबदार वृत्ति व ईश्वरेच्छावादानें होते. ज्या समाजाचीं धार्मिक कृत्येंसुद्धां मांसाशन, सुरापान, व इतर स्वैच्छाचाराशिवाय होत नाहींत त्या समाजाची चैनबाजी काय वर्णावी? ब्राह्मणाकडे सर्व पापपुण्यांचा मक्ता देऊन व ईश्वरेच्छेचा हवाला देऊन मनसोक्त वागणाऱ्या लोकांची बेफिकिरी व स्वैच्छाचारवृत्ति तरी किती वर्णावी ? महावीरकालीन समाजांत यज्ञमार्गीयांच्या व नियतिवाद्यांच्या सुळसुळाटामुळें ही स्वेच्छाचारवृत्ति फार बोकाळली होती व म्हणूनच समाज कर्तव्यशून्य बनला होता, पुढेंहि मायावाद व ईश्वरेच्छावाद जसजसे फैलावत गेले तसतशीं महंमदी व ख्रिस्ती लोकांचीं साम्राज्यें वाढत जाऊन हिंदुसमाज कर्तृत्वशून्य बनला हें

विसरतां कामा नये. शेंबूड आपल्या नाकाला व हंसे लोकाला या म्हणीप्रमाणें वैदिक शिकवणीचाच दोष असतां जैनबौद्धांच्या अहिंसेसारख्या सर्वकल्याण-कारक तत्त्वावर शिंतोडे उडविण्यास अर्धवट तरुणच काय पण ज्ञानवृद्ध कपीहि तयार होतात या परती स्वार्थांधवृत्ति ती कोणती? असो. महावीरकालीं एक-छत्रीं राज्य असें मुळींच नव्हतें. एवढेंच नव्हे तर राज्यकारभार एकतंत्रीहि नव्हता. सर्वांच्याच हातीं मताधिकाराचें कोलीत देण्याइतकें लोकशाहीचें खूळ जरी त्यावेळीं मातलेलें नव्हतें तरी लोकमताला विशेष मान होता व बहुमता-नेंच सार्वजनिक हिताचें निर्णय करण्यांत येत असत. त्यावेळीं अनेक गणराज्यें होतीं. हे गण समाजांतून निवडून पाठविले जात व त्यांच्या बैठकी भरून बहु-मताप्रमाणें कोणतीहि गोष्ट करण्यांत येत असे. त्यामुळें राजकीय बाबतींत कुर-कूर करण्यास समाजाला मुळींच जागा नव्हती. आर्थिक परिस्थितीहि फार चांगली होती. पण सामाजिक असमता किंवा ब्राह्मणांची मक्तेशाही व हिंसात्मक यज्ञयाग आणि नियतिवाद यांच्या सुळसुळाटामुळें समाज कर्तृत्वशून्य बनला होता व म्हणूनच दुःखीहि होता. तो किंकर्तव्यमूढ बनला होता. त्याला कर्तव्यपथावर आणणाऱ्या व सुखाचा मार्ग दाखविणाऱ्या महात्म्याची जरूर होती व भगवान महावीर आणि महात्मा बुद्ध यांच्या आगमनामुळें ती जरूर भागली. या दोन थोर पुरुषांनीं समाजांत चैतन्य उत्पन्न केल्यावर धार्मिक व सामाजिकच काय पण राजकीय बाबतींतहि समाजानें पुरुषार्थ करून दाखविला ही गोष्ट त्यांच्यानंतर जीं मोठमोठीं राज्यें व साम्राज्यें झालीं त्यावरूनच सिद्ध होते. पुढें तीं कांहीं काळानंतर लयास गेलीं याचें कारण ईश्वरेच्छावादाचा झालेला सुळ-सुळाटच होय.

एकंदरींत महावीरकालीन आर्थिक परिस्थिति आजच्यासारखी शोचनीय नव्हती. त्यावेळीं खरोखरच भरतखंडांत सोन्याचा धूर निघत होता. त्यावेळच्या बौद्ध व जैन ग्रंथांत आणि त्यानंतर येऊन गेलेल्या चिनी प्रवाशांनीं लिहून ठेवि-लेल्या माहितीवरून त्यावेळच्या समृद्धीची कल्पना येते. पोटाची फिकीर तर कधीं कोणालाच पडली नव्हती, व उपजीविकेसाठीं श्रमहि फारच थोड्यांना करावे लागत असत. अलिकडे स्त्रिया, अल्पवयी मुलें व वृद्धानांहि पोटासाठीं राबावें लागतें. हिंदुस्तानवर अशी आपत्ती कधींच आली नाहीं. व त्यावेळीं तर सदृढ तरुण पुरुषांतसुद्धां फारच थोड्यांना पोटासाठीं राबावें लागे. शेतीप्रमाणेंच

कलात्मक इतर धंदेहि पुष्कळ होते. त्यावेळेचा समाज खराखुरा सुधारलेला होता. आधुनिक यंत्रयुगांत कलेची कल्पनाच भ्रष्ट झाली असल्यामुळें तत्कालीन् कलेची कल्पनाहि अर्वाचीन लोकांना येणार नाहीं. संगीत, शिल्प, साहित्य वगैरे सर्व कला हौसेखातर होत्या; पोटासाठीं नव्हत्या. सीलोन, इराण, चीन वगैरे परदेशांना भारतीय लोक पोटासाठीं जात नसत, तर प्रवासाच्या शोकाखातरच जात व आपल्या कलात्मक वस्तु देऊन सुवर्ण आणीत. नाणें, हुंडया, वगैरे देवघेवीचे प्रकार धान्याच्या अदलाबदलीप्रमाणेंच त्यावेळीं रूढ होंत. शेतकरी लोक धान्य देत, पण इतर कलावन्त लोक नाणें, हुंड्या व आपापल्या कलात्मक वस्तु देवघेवीच्या व्यवहारासाठीं वापरीत. शहरेंहि त्यावेळीं बनलेलीं होतीं व हल्लींप्रमाणें तीं दुर्गंधीनें भरलेलीं नसून हवेशीर होती व तलाव, बगिचे, बाजार व मोठमोठ्या प्रासादांनीं सुशोभित होतीं. गटारें व मोऱ्यांची पद्धत आणि लहान प्रमाणावर पाण्याच्या नळांचीहि पद्धत त्यावेळेपासूनचीच आहे. कारंजांची पद्धत तशीच जुनी आहे. रेशमी वस्त्रें व विविध अलंकार आणि इतर असंख्य शोभिवंत वस्तु त्यावेळींहि वापरल्या जात. याप्रमाणें सर्व दृष्टीनें देश समृद्ध होता व ही समृद्धि कशी भोगावी तेंहि चांगलें जाणण्याइतका तो सुसंस्कृत होता. हल्लींप्रमाणें त्याकाळीं धन एकवटत नसे. राजसत्ता जशी पुष्कळांचे हातीं होती तशी धनसत्ताहि पुष्कळांचे हातीं होती. शिवाय प्रजा आताप्रमाणें पिळून काढली जात नसे. ती स्वाश्रयी होती. पोटासाठीं तिला राजसत्तेवर मुळींच अवलंबून रहावें लागत नसे. राज्यसत्ताधारी हल्लींप्रमाणें बनियागिरी करीत नसत. शौर्य दाखविणें हेंच त्या वीरांचें काम होतें. सत्तेच्या जोरावर व्यापार चालवून प्रजेचें धन शोषून घेणें व पुन्हां प्रजेसच पोटासाठीं आपल्यावर अवलम्बून ठेवणें हा राक्षसी उपद्व्याप तत्कालीन राजे करीत नसत. यामुळें प्रजेची आर्थिक स्थिति उत्तम राहून पुन्हां राज्यवैभवांतहि कांहीं तूट पडत नसे. तत्कालिन् राज्यवैभव व धनधान्यसमृद्धिपुढें हल्लींच्या जगांतील कोणत्याहि राष्ट्राचें वैभव तुच्छ होय असें म्हटल्यास तें मुळींच अतिशयोक्तीचें होणार नाहीं. राजसत्तेच्या व धनसत्तेच्या दुरुपयोगामुळें किंवा केंद्रीकरणामुळें हल्लीं जी स्थिति जगांत सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येत आहे तिची कल्पनाहि महावीरकालीन लोकांना नव्हती. असो.

त्याकाळीं समाजाची नीतिमत्ता तर हल्लीं असंभवनीय वाटण्याइतकी उच्च दर्जाची होती. इतकीं साधनसमृद्ध घरें असून कुलूप लावण्याची पद्धतच नव्हती.

दरवाजांची योजना केवळ शीतोष्णपवन निवारण्यासाठीं व एकांतवासासाठींच होती. सुरक्षिततेसाठीं नव्हती. युद्धांतून व प्राकृतिक मरणानेंच लोक मरत; खून मारामाऱ्यांमुळें किंवा भयंकर रोगामुळें मरत नसत. सुरापानाचा हल्लींइतका प्रचार नव्हता; जो होता तोहि विलासाची वस्तु म्हणून थोडा होता. काबाड-कष्टाचे श्रम न वाटावेत म्हणून सुरापान करण्याची जरूरीच नव्हती. आगलावे-पणा, चहाडखोरपणा, शिंदळकी, वगैरे अनीतीचें नांवनिशाणहि नव्हतें. सर्व प्रकारच्या अनाचारांचा त्या काळीं अभाव होता.

युद्धकलानिपुण व राजकारणविशारद क्षत्रिय, कर्मकुशल कलावंत, विद्वान् ब्राह्मण व स्वकर्मरत लोक निर्माण करणें हाच चातुर्वर्ण्यपद्धतीचा मुख्य हेतु आहे. महावीर कालीं ब्राह्मणांच्या बाबतींत तो कांहीं अंशीं खोटा ठरला होता. पण क्षत्रिय वैश्यादिकांचे बाबतींत तो चांगल्याप्रकारें साधला जात होता. त्यावेळीं खालील महत्त्वाचीं गणराज्यें होतीं. पहिलें लिच्छवी गणराज्य. यामध्यें इक्ष्वाकु-वंशाचे क्षत्रिय अधिक होते. याची राजधानी वैशाली व त्यावेळचा राजा चेटक. त्याला प्रभावती, प्रियकारिणी, त्रिशलादेवी, मृगवति, शिवा, जेष्टा, सुजेष्टा व चेलना अशा सात मुली होत्या. शेवटली मुलगी मगधदेशाचा राजा श्रेणिक यास दिली होती. सुजेष्टाहि श्रेणीकालाच दिलेली होती. उज्जयिनीच्या चंडप्रद्योत राजास शिवा दिली होती. बौद्ध ग्रंथांतून ज्याला परंतप म्हटलें आहे त्या कोशांबीच्या राजास मृगावति दिली होती. महावीरस्वामींचे बंधु नंदीवर्धन यांना जेष्टा दिली होती. चंपादेशाचा राजा दधिवाहन यास पद्मावती दिली होती, व सिंधूदेशांतील वीतभय नगरच्या उद्दायन राजास प्रभावती दिली होती. चेटक राजाची पहिली मुलगी त्रिशलादेवी महावीरस्वामींचे वडील राजा सिद्धार्थ यास दिलेली होती. याप्रमाणें विदेहदेशाचें हें घराणें वीरसमकालीं जैनधर्मी होतें व त्यानें सोयरिकीनें इतर अनेक राजघराण्यांतहि जैनधर्म फैलाविला होता. असो. दुसरें गणराज्य मगधदेशचें. याची राजधानी राजगृह व राजा बिंबिसार. जैनग्रंथांतून याला श्रेणिक म्हटलें आहे. याला दोन भार्या होत्या. एक कोसल देशची कोसल देवी व दुसरी विदेहदेशाची चेलना. बिंबिसाराला बालपणीं त्याचे वडील उपश्रेणिक यांनीं राज्याबाहेर घालवून दिलें होतें. तेव्हां बौद्धभिक्षूंनीं त्याला आश्रय दिल्यामुळें तो बौद्धधर्मी बनला होता. पुढें राज्यपदावर परत आल्यावर चेलनेच्या सहवासामुळें तो फिरून जैनधर्मी बनला होता. श्रेणिकाला

अजातशत्रु किंवा कुणिक, वारिषेण, हल्ल, विदल, जितशत्रु व गजकुमार असे पुत्र होते व ते सर्व जैनधर्मी होते. उपश्रेणिकानें घालवून दिल्यावर श्रेणिक राज्याबाहेर असतां इंद्रदत्तश्रेष्ठीच्या नंदश्री नामक पुत्रीशीं त्यानें विवाह केला होता. तिच्यापासून त्याला अभयकुमार नांवाचा पुत्र झाला होता. तिसरें राज्य अंगदेशचें. राजधानी चंपापूर व राजा दधिवाहन. चवथें कोसलदेशचें राज्य. राजधानी श्रावस्ती. राजा पसेनादि जैनग्रंथातून यास अग्निदत्त म्हटलें आहे. याचा मुलगा विद्युदाभ. कोसलदेशाच्या दक्षिणेस वत्सराज्य होतें व त्याची राजधानी कौशांबी. राजा शातानिक. त्याचा मुलगा उदयन. सहावें राज्य उज्जयिनीचें. राजा चंडप्रद्योत. सातवें राज्य सिंधुदेशचें. राजा उदायन. राजधानी पाटनगर. आठवें राज्य शाक्यवंशाचें.राजधानी कपिलवस्तु. राजा शुद्धोदन. त्याचप्रमाणें मल्ल, कोलिय, भग्ग, अल्लकप्प, पिप्पलिवन, कलिंग, कुरू, पांचाल, मत्स्य, अस्सक, गांधार, कंबोज वगैरे गणराज्यें होतीं.

काशीप्रांताचा नवमल्लिकराजा, पुलासपुरचा विजयराजा, अमलकलपादेशचा श्वेतराजा, पोदनपुरचा प्रसन्न चंद्रराजा, हस्तशीर्षचा अदिनशत्रुराजा, ऋषभपुरचा धनावहराजा, वीरपुरचा वीरकृष्ण मित्रराजा, विजयपुरचा वीसवदत्तराजा, सौगंधिकदेशचा अप्रतिहतराजा, कनकपुरचा प्रियचंद्रराजा, महापुरचा बलराजा, सुघोषदेशचा अर्जुन, चंपानगरीचा दत्त, साकेतपुरचा मित्रनंदी, काशीनगरचा जितशत्रु, दशार्णदेशचा दशभद्र, अन्तर्यदेशआर्द्रकपुरचा आर्द्रकराजा, पावापुरीचा हस्तिपाळ वगैरे राजांचींहि छोटीं छोटीं राज्यें होतीं. या राजांमध्यें नवीं नवीं राज्यें काबीज करण्यासाठीं व राजकन्येकेला वरण्यासाठीं वरचेवर युद्धें होत असत. पण भगवान महावीर व गौतमबुद्ध यांच्या प्रभावामुळें पुढें राजांचीहि उद्दंडता कमी झाली.

संयुक्तप्रांतातील एक विद्वान् श्री व्यंकटेश नारायण त्रिपाठी एम्. ए. यांनीं महावीरकालीन परिस्थितीचें वर्णन खालीलप्रमाणें केलेलें आहे "महावीरस्वामींच्या जन्मकालीं पशुबलीची पराकाष्ठा झाली होती. निर्दोष, दीन, मूक व असहाय अशा प्राण्यांच्या रक्तानें यज्ञवेदी लाल होत असे. असे बळी दिल्यामुळें देणाऱ्याच्या सर्व कामना पूर्ण होतात अशी त्याकाळीं मान्यता होती. पुरोहितांचें जीवनच यज्ञावर अवलंबून असल्यामुळें यज्ञ करविण्यांत ते विशेष तत्पर असत. कांहीं लोकांच्या मनांत ही पशुहत्या खटकत होती; पण शेवटीं

ती महावीरस्वामींनींच बंद पाडली. हिंसात्मकयज्ञ, कर्मकांड व हटयोग हेच त्यावेळीं धर्म मानले जात असत. त्यामुळें धर्माचे ऐवजीं ढोंग व अधर्मच सर्वत्र पसरलेला होता. अनात्मवादाचें सार्वभौम राज्य होतें. समाजाचा आत्मा घोर अंधःकारांत पडला होता व प्रकाश मिळावा म्हणून धडपडत होता. यज्ञांतील पशुहिंसेमुळें मानवांचीं हृदयें कठोर व निर्दय तर बनत होतींच पण इतरांच्या जीवांची त्यांना कांहीं किंमतच वाटेनाशी झाली होती. स्वसुखाखातर तें वाटेल तें करावयास तयार होत असत व जड वस्तूंचें महत्त्वच त्यांना अधिक वाटूं लागलें होतें. अध्यात्मिक बाबीकडे अगदीं दुर्लक्षच झालें होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. यज्ञ केले कीं पातकांचा परिहार होतो व सर्व सुखें प्राप्त होतात अशी समाजाची भावना झाली असल्या-मुळें पाप करण्यास समाज कचरत नसे व सुखासाठीं पुरुषार्थहि करीत नसे. असल्या समाजांत पावित्र्य व निर्दोष जीवन कोठून असणार! आत्म्यावरील पापांचे कलंक पुसून काढण्यास पश्चात्ताप व प्रायश्चित्ताची मुळींच जरूरी नसून मांस, तूप व हवि जाळून निघणाऱ्या धुरानेंच हे कलंक पुसले जातात अशी उलटी कल्पना रूढ होती. पण या धुरानें आत्म्याची कलुषितता अधिकच वाढत होती. शिवाय यज्ञ करणें हीहि कांहीं सोपी बाब नव्हती. बराच पैसा खर्च करावा लागत असल्यामुळें थोडे क्षत्रिय व वैश्यच यज्ञसमारंभ करूं शकत. त्यामुळें बहुजनसमाज या कर्मकाण्डाच्या विरुद्ध बनला. खडतर तपश्चर्या केल्यानें आपणांला ऋद्धिसिद्धि प्राप्त होतील व दैवी शक्ति प्रगट होतील आणि नैसर्गिक शक्तीवरही आपला ताबा राहील अशीहि कल्पना रूढ होती. आत्मा देहरूपी कारावासांत आहे, त्याला त्यांतून सोडविला कीं तो मुक्त होईल अशीहि कल्पना असल्यामुळें ऐहिक व परमार्थिक अशा दोन्ही हेतूनें कांहीं सामर्थ्यवान् लोक हटयोगाचा अवलंब करीत असत. पण अनुभवानें मनःशांति देण्यास हटयोग, कर्मकांड व हिंसात्मक यज्ञ यांपैकीं कांहींच उपयोगी पडत नाहीं असें समाजाला दिसून आलें. त्यामुळें प्रचलित धर्माविरुद्ध विचारी लोक बोलूं लागले होते. पण नवा धर्म समाजापुढें ठेवण्याइतकें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नव्हतें. तें काम भगवान महावीर व म. बुद्धाचेंच होतें. समाजाची मनोभूमिका तयार असल्यामुळें वरील दोन महापुरुषांचें कार्य सुलभ झालें."

याप्रमाणें महावीरस्वामींच्या वेळेची परिस्थिति होती. राजकीय व आर्थिक

स्थिति चांगली होती. पण सामाजिक व धार्मिक परिस्थिति अगदीं बिघडली होती. पहिल्या दोन बाबतींतील चांगल्या परिस्थितीचा परिणाम दुसऱ्या दोन बाबतींतील परिस्थिति सुधारण्याकडे होत नसे, पण धार्मिक व सामाजिक शोचनीय परिस्थितीचा परिणाम आर्थिक व राजकीय सुस्थितीवर जरूर होत असे. काल हमेशा एकसारखा रहात नाहीं, व कोणतीहि परिस्थिति कायम टिकत नाहीं. जगांत असें कांहीं अभव्य आत्मे आहेत कीं, जे नेहमीं संसारांत गोते खातच राहणार व सामाजिक परिस्थिति बिघडविणार. कधीं सुख व कधीं दुःख त्यांनाहि मिळत असतें; पण सुखदुःखापासून पूर्णपणें सुटका त्यांची कधीं होत नाहीं. भव्य-जीवांना तरी हा मोक्ष सोपा थोडाच आहे? पूर्वशुभकर्मोदयामुळें काललब्धि झाली तर मोक्षमार्गावर ते येतात; नाहीं तर तेहि गोते खातच भवचक्रांत फिरत राहतात. म्हणूनच अवसर्पिणी व उत्सर्पिणी असे कालाचे भेद पडलेले दिसून येतात. कर्मानुसार जीवांना बुद्धि होते व कालानुसार यशापयश मिळतें. दोन्ही प्रकारचे जीव अनादिकालापासून आहेत. ऋषभदेवांनीं यथार्थ मार्ग घालून दिला, पण त्यांचाच नातू मरीचि मिथ्यात्वाचा प्रवर्तक बनला. असें हें घडावयाचेंच. आज तरी वीरकालीन परिस्थिति कोठें राहिली आहे? त्यावेळीं राजकीय व आर्थिक परिस्थिति तरी चांगली होती पण आतां तीहि अतिशय बिघडली आहे. धार्मिक व सामाजिक बाबतींतहि मिथ्यात्व व असमतेची वाढच झाली आहे. कालक्रमाच्या ठराविक नियमानुसार आतां तीर्थंकर अवतरून सद्यः-स्थिति सुधारणें शक्य नसलें तरी कोणीतरी सिद्ध महात्मे होणें जरूरच आहे, व त्यांच्या आगमनाला अनुकूल भूमिकाहि तयार होत आहे. महावीरकालीन भरतखंडच आजहि आहे; पण त्या कालाप्रमाणें प्रतिभासंपन्न, शक्तिशाली व दीर्घायुषी लोक आतां नाहींत. हल्लींचे भारतीय दीनदुबळे झाले आहेत. बुद्धि, शक्ति, ऐश्वर्य वगैरे गमावून बसले आहेत. त्यावेळीं सर्व जगाला भारतवर्ष आदर्श होता, पण आज भारतीय त्यांचे दास बनले आहेत, व प्रत्येक बाबतींत परकीयांच्याच ओंजळीनें पाणी पीत आहेत. आपल्या प्राचीन वैभवाची आठ-वण त्यांना होत असते, पण पूर्वजन्मीं केलेले पराक्रम त्यांचे हातून होत नाहींत. ते होतील तेव्हांच सद्यःस्थिति बदलेल. महावीरकालाप्रमाणेंच आतांहि क्रांतीची आवश्यकता आहे. तत्कालीन प्रजा कांहीं बाबतींत पीडलेली होती पण हल्लींचे भारतीय सर्वच बाबतींत पीडलेले असून परिस्थितीला कंटाळलेले आहेत. काला-

नुसार ही परिस्थिति बदलेलेच, पण तशी तयारी होण्यासाठीं वीरकालाचा प्राचीन इतिहासहि त्यांना अनुकरणीय आहे.

---

## प्रकरण ५ वें.

# जन्मस्थान व वर्षनिर्णय.

इ. स. पू. सहाव्या शतकांत जीं गणराज्यें होतीं व त्यामध्यें जे क्षत्रियवंश प्रख्यात होते त्यापैकींच लिच्छवी हा एक वंश आहे. या वंशाचे रीतिरिवाज, शासनप्रणाली, धार्मिक व इतर कल्पना बऱ्याच विशुद्ध होत्या. लिच्छवी-वंशांचीं बहुतेक सर्व घराणीं जैनधर्मांचींच होतीं. हा वंश मूळ इक्ष्वाकुवंशांतलाच व याचें गोत्र वशिष्ट. लिच्छवीवंशांत झालेल्या सुसंस्कृत व पराक्रमी क्षत्रियामुळें हा वंश फार मानला जात होता व इतर वंशाचे क्षत्रिय या वंशाशीं सोयरीक करण्यांत धन्यता मानीत असत. लिच्छवीवंशाचे क्षत्रिय वज्जियन संघाचे मानले जात; कारण त्यांची सत्ता सर्व वज्जियन किंवा वृजदेशावर होती. या संघामध्यें आठ निरनिराळ्या जातींचे क्षत्रिय होते. त्यांत लिच्छवीवंश श्रेष्ठ होता. या सर्व जातींमध्यें सख्य असल्यामुळें कधीं दुफळी माजली नाहीं व वृजदेश सर्व दृष्टीनें समृद्ध राहिला. वृजदेशांत शांतता व समृद्धि असल्यामुळें अर्थातूच कला व मौज शोकाची वृद्धि झाली. तथापि हे क्षत्रिय विलासप्रिय झाले नाहींत. म्हणूनच त्यांचें वैभव टिकून राहिलें. त्याकाळीं मगधाधिपानें बराच धुमाकूळ माजविला होता. पण वज्जियन संघांपुढें त्यांचेंहि कांहीं चाललें नाहीं. तक्षशिला येथील विद्यापीठ त्यावेळीं बरेंच भरभराटींत होतें व बहुतेक सर्व क्षत्रिय तरुण तेथून सर्व विद्या शिकून येत. त्यामुळें ते सुसंस्कृत व निर्व्यसनी असत. पराक्रमामुळें व संस्कारितेमुळें या क्षत्रियवंशांतून कृत्रिम उच्चनीचता मानली जात असे व म्हणून लिच्छवीवंशांत इतर वंशांतून मुली येत. पण लिच्छवीवंशाच्या मुली इतर वंशांतील तरुणांना दिल्या जात नसत. वैशालीं राज्याचे बाहेर मूली देतां येणार नाहींत अशी रूढी होती. त्यामुळें वैशालीचा राजा चेटकानें आपली मुलगी मगधेश श्रेणिकालाहि प्रथम देण्याचें नाकबूल केलें होतें, पण घराण्यांची अनुरूपता पाहून रूढी मोडूनहि पुढें सोयरिक झाली या-

वरून वरील रूढींचें बंधन हितकारक होतें; समाजघातुक नव्हतें असें स्पष्ट दिसून येतें. असो. लिच्छवी गणराज्याजी राजधानी वैशाली होती. राजधानी-जवळच कुन्डपुर म्हणून गांव होतें. तेथें राजा सिद्धार्थ रहात असे. त्यांचें घराणें फार पूर्वीपासून जैनधर्मांचें अनुयायी होतें.

जैनग्रंथांतून वैशाली नगरी चेटक राजाची राजधानी होती असें लिहिलेलें आहे. अर्थात् लिच्छवीवंशाचीं जीं गणराज्यें होतीं त्यांचें मुख्य प्रथक वैशाली हें असलें पाहिजे. वैशाली नगरीजवळ कुंडग्राम किंवा कुंडलपूर होतें. सिद्धार्थाला कुंडग्रामचा राजा म्हणून जैनग्रंथांत लिहिलेलें आहे. सिद्धार्थराजाच्या कुलाचें नांव ज्ञात होतें म्हणून महावीरस्वामींना नातपुत्र म्हणून बौद्ध व कांहीं जैन ग्रंथांतून संबोधिलेलें आहे. ज्ञातकुलातर्फे राजा सिद्धार्थ वज्जियन संघांत प्रति-निधि होते व त्याकाळीं प्रतिनिधींनाच राजा ही पदवी होती. वैशाली नगरी फार विशाल होती, म्हणूनच तिला तें नांव पडलें. चिनी प्रवासी यानाचाना यानें वैशाली नगरीचा विस्तार वीस चौ. मैल असल्याचें लिहिलें आहे. या नगरीच्या आसपास तीन किल्ले आहेत असेहि त्यानें लिहिले आहे. वज्जियन संघांत जे वंश सामील होते त्या वंशांच्या राजधानींत किल्ले असत. वैशालीनगरीजव-ळच कुंडग्राम होतें व ती ज्ञातवंशाची राजधानी होती. अशाच आणखी दोन वंशांच्या राजधान्या वैशाली नगरीजवळ असाव्यात. वृजदेश सोळाशें मैलांच्या परिघाचा आहे असें यानाचानानें लिहिलें आहे. या देशाचें त्यानें केलेलें वर्णन ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचें आहे. तो लिहितो कीं, हा देश समृद्ध आहे; आंबे, केळीं वगैरे फळांचीं झाडें पुष्कळ आहेत. लोक विश्वासू, शुभवत् कार्यरत, उदार, विद्याप्रेमी व सुसंस्कृत आहेत. घरें सुंदर व कलाकौशल्यानें भरलेलीं आहेत. मनमोहक देवमंदिरें ठिकठिकाणीं आहेत. बागबगीचेहि लोक-वस्तींतून आहेत. हा देश स्वर्गतुल्य आहे! हल्लींच्या मुझफरपुर जिल्ह्यांतील बसाड गांवाचे जागींच पूर्वी वैशाली नगरी होती असा अंदाज आहे. इतर भागाच्या मानानें हल्लींहि हा भाग समृद्ध आहे. मग त्यावेळीं तो तसा असेल त्यांत नवल काय? वरील ऐतिहासिक वर्णनाप्रमाणेंच अशगकवीचें काव्यात्मक वर्णन आहे. आपल्या महावीरचरित्राच्या सतराव्या सर्गांत विदेहदेशाबद्दल कवि लिहितो "या भरतक्षेत्रांत प्रसिद्ध सत्पुरुषांची उत्कृष्ट निवासभूमि असा विदेह नांवाचा देश आहे. हा सुसंपन्न आहे व खरोखर पृथ्वीवरील सर्व शोभिवंत

प्रदेश एकत्र आणून ठेवलेला आहे कीं काय असा दिसतो. या देशांतील अरण्य शुभ गायींच्या खिल्लारांनीं व मनसोक्त विचरणाऱ्या हरिणांनीं गजबजलेलें असून लहान मुलांनाहि न भिवविता रात्रीं आनंद देणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणेंच तो अरण्यभाग दिसतो. अर्थात् हिंस्र जनावरें विदेहदेशाच्या अरण्यांत नव्हतीं. खलता लोकांमध्यें मुळींच नसून ती शेतांत मात्र धान्याच्या खळयाच्या रूपानें होती; कुटिलता समाजांत मुळींच नसून सुंदर स्त्रियांमध्यें तेवढी ती होती; मधुपप्रलाप फुलांतून होता; पण दारूड्यांचें बडबडणें गांवांतून नव्हतें. पंकस्थिति म्हणजे पापरति लोकांत नव्हती. पंक म्हणजे चिखलांत राहणें, कमलांना व शेतकऱ्यापुरतेंच होतें. बहुरंगीपणा लोकांत मुळींच नसून मोरपिच्छांतून तेवढा होता. स्वतःला वेढणाऱ्या नागवेलीच्या पानांच्या कांतीनें ज्यांनीं दिग्भागाला हिरवेगार केलें आहे अशा सुपारीच्या झाडांनीं गजबजलेलीं विदेह देशांतील गांवें चमकणाऱ्या अमूल्य पाचरत्नांनीं बनविलेल्या उंच तटपंक्तींनीं वेढल्याप्रमाणें शोभत होतीं. तो देश आश्रित लोकांची तहान भागविणाऱ्या, तळभागीं नेहमीं स्वच्छ असलेल्या, कमळांनीं व हंसपक्ष्यांनीं भरलेल्या अशा अनेक सरोवरांनीं जसा शोभत होता तसाच आश्रित लोकांच्या आशातृष्णा शमविणाऱ्या, हृदयांत नेहमीं प्रसन्नता धारण करणाऱ्या, संपत्तीनें युक्त व निर्दोष अशा ब्राह्मण क्षत्रिय व वैश्यांकडून आदरणीय अशा असंख्य सत्पुरुषांमुळें चोहोंकडे प्रख्यात होता. या विदेह देशांत करताडन मृंदगावरच होई; एकमेकांवर होत नसे. बंधन घोड्यांनाच होतें, लोकांना नव्हतें. द्वंद, उपसर्ग, गुणलोप, विकार वगैरे समाजांत नव्हते; व्याकरणांत तेवढे होते. अशा या विदेहदेशांत सगळ्या वस्तूंना आश्रय देणारे, सूर्य, चंद्र, बुध, वृषभरास व तारागणांनीं युक्त अशा आकाशाप्रमाणें शोभिवंत जगविख्यात असें कुंडनपुर नांवाचें नगर होतें. या नगरांतहि सर्व प्रकारच्या वस्तु होत्या; अनेक प्रखर कलांना धारण करणारे विद्वान् होते. गोधन व सुवर्ण, रौप्य, मौक्तिकहि या नगरींत भरपूर होते. तटाला बसविलेल्या प्रराग रत्नांच्या प्रतिबिंबामुळें व्याप्त झालेला खंदक दुपारीहि सायंकाळची शोभा गांवाला देत असे. कुंडनपुरांतील स्त्रिया निर्मळ अंतःकरणाच्या, मनोहर व सर्वालंकृत होत्या. शहरांतील वाडे अतिशय उंच, चंद्रप्रकाशामुळें धवल दिसणारें. गर्भाला जडवलेल्या रत्नांमुळें पल्लवयुक्त भासणारें व स्त्रीपरिवारांनीं गजबजलेले आहेत."

## जन्मस्थान व वर्षनिर्णय.

अशा ह्या वैशाली नगरीजवळ असलेलें कुंडग्रामच महावीर भगवानांचें जन्मस्थान होय. वैशालीच्या जवळच असलेले कोल्लागग्रामही महावीरस्वामींचें जन्मस्थान म्हणून सांगतात; कारण तेथेंहि नाथ किंवा ज्ञातिवंशाचे क्षत्रिय राहात होते; पण तसा जैनग्रंथांतून उल्लेख नाहीं. बौद्धांच्या महावग्गनामक ग्रंथांत लिहिलेलें आहे कीं, एकदां महात्मा बुद्ध कोटिग्रामला आले असतां ते एका ज्ञातिवंशाच्या क्षत्रियाचे घरीं उतरले होते. तेथून ते पुढें वैशालीला गेले. यावरून कुंडग्राम किंवा कोटिग्रामाचें अस्तित्व सिद्ध होतें; तसें कोल्लागग्रामाचें अस्तित्व सिद्ध होण्यास आधार नाहीं. हल्लींहि राजग्रहाजवळ कुंडलपूर म्हणून एक गांव आहे; पण कुंडग्रामाची ती बरोबर जागा नव्हे.

आतांपर्यंत महावीरस्वामींच्या जन्मस्थानाचा विचार झाला. आतां जन्मवर्षाचा विचार करूं. महावीरस्वामी बहात्तराव्या वर्षी मोक्षाला गेले याबद्दल एकमत आहे; पण त्या वर्षाबद्दल तीन मतें प्रचलित आहेत. इ. स. पू. ५२७ वें वर्ष हें बऱ्याच अंशीं मान्य आहे. दुसऱ्या मतानुसार तें इ. स. पू. ४६८ आहे व तिसऱ्या मतानुसार तें इ. स. पू. ६०६ हें होय. पहिलें मत हल्लीं सर्वत्र रूढ आहे. त्याला खालील आधार दिले जातात. नन्दीसंघाच्या दुसऱ्या पट्टावलींत खालील गाथा आहे. " सत्तरि चदुसदजुत्तो तिणकाला विक्कमो हवइ जम्मो । अठवरस बाललीला सोडस वासे हि भम्मिए देसे ॥ १८ ॥ महावीरनिर्वाणानंतर ४७० वर्षांनीं विक्रमाचा जन्म झाला, आठ वर्षे बाललीला केली, वगैरे वरील श्लोकाचा भावार्थ आहे. तिलोयपण्णत्तींत खालील गाथा आहे. " णिव्वाणे वीरजीणे छव्वास सदेसु पंच वरिसेसु । पण मासेसु गतेसु संजादो सगणिओ अहवा ॥ वीरनिर्वाणानंतर सहाशें पांच वर्षे पांच महिने लोटल्यावर शक राजा झाला, असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे. त्रिलोकसारांत खालील श्लोक आहे, पण छस्सयवस्सं पण मासजुंद गमिय वीरणिव्वु इदो । सगराजो तो कक्की चदुनवमिय महिय सगमासं ॥ ८५० ॥ वीरनिर्वाणानंतर ६०५ सहाशें पांच वर्षे पांच महिने लोटल्यावर शक राजा झाला. व तीनशें चौऱ्याण्णव वर्षे सात महिने लोटल्यावर कल्की झाला असें वरील गाथेंत म्हटलें आहे. आर्यविद्यासुधाकरांत खालील श्लोक आहेत. " ततः कलिनाचखंडे भारते विक्रमात्पुरा । स्वमुन्यं बोधिविमते वर्षे । वीराव्हयो नरः ॥ प्राचारज्जैनधर्मबौद्धधर्मस्तमप्रभम् ॥ बौद्धधर्मासारख्याच प्रभावी धर्माच्या वीर

नांवाच्या पुरुषानें भरतखंडांत प्रचार केला असें वरील श्लोकांत म्हटलें आहे. सरस्वतीगच्छाच्या प्रस्तावनेंत ' बहुरिश्रीवीरस्वामीकूं मुक्ति गये पीछें चारसैं सत्तर वर्ष गये पीछें श्रीमन्महाराज विक्रमराजाका जन्म भया " असें स्पष्ट म्हटलें आहे. नेमिचंद्राचार्यांच्या ( श्वेतांबरी ) महावीरचरित्रातहि महावीरस्वामींच्यानंतर सहाशेंपांच वर्षे पांच महिन्यांनीं शकराजा झाला असें म्हटलें आहे. नन्दीसंघाची पट्टावली व सरस्वतीगच्छाची पीठिका यांतील वर दिलेल्या वचनांत महावीरनिर्वाणानंतर ४७० वर्षांनीं विक्रमाचा जन्म झाला असें स्पष्ट म्हटलें आहे. विक्रमाचा संवत् त्याच्या वयाच्या अठराव्या वर्षीं सुरू झाला हें प्रसिद्धच आहे. इसवीसनाहून विक्रमसंवत् ५७ वर्षांनीं प्राचीन व विक्रमसंवताहून वीरनिर्वाण काल ४७० + १८ म्हणजे ४८८ वर्षांनीं प्राचीन म्हणजे तो इ. स. पू. ५४५ ठरतो. तर मग इ. स. पू. ५२७ कसा मानण्यांत आला ? याचें कारण विक्रमाच्या अठरावे वर्षीं विक्रमसंवत् सुरू झाला हें लक्षांत न घेतां चालू विक्रम संवतांत ४७० वर्षे मिळवून जैनांनीं वीरसंवत् गणला हेंच होय. वीरनिर्वाणानंतर ६०५ वर्षे पांच महिन्यांनीं शकराजा झाला, या अभिप्रायाला मात्र जैनांनीं गणलेला प्रचलित वीरसंवत् बरोबर जुळतो. तेव्हा विक्रमराजा झालेल्या वर्षापासून विक्रमसंवत् गणण्यास सुरवात झाली, हें म्हणणें तरी खोटें ठरविलें पाहिजे किंवा वीरनिर्वाणानंतर ४७० वर्षांनीं विक्रमाचा जन्म झाला अशा आशयाचे आधार तरी खोटे ठरविले पाहिजेत. दोहोंकडून आपत्तिच आहे पण शालिवाहन शकाशीं वर दिलेले दुसरे आधार व प्रचलित वीरसंवत् जुळत असल्यामुळें तोच खरा ठरवितां येण्याजोगा आहे. पण बाबू कामताप्रसादजींनीं आपल्या ' भगवान् महावीर व म. बुद्ध ' या पुस्तकांत जे विचार प्रदर्शित केले आहेत तेहि लक्षांत घेणें जरूर आहे. ते लिहितात, " जैनग्रंथावरून हें निश्चित आहे कीं, महावीरस्वामींना मोक्षलाभ वयाच्या बहात्तराव्या वर्षीं झाला व बौद्धग्रंथावरून हेंहि निश्चित आहे कीं, महावीर बुद्ध वयाच्या ऐंशीव्या वर्षीं निर्वाणाला गेले. यावरून ही गोष्ट स्पष्ट आहे कीं, " गौतमबुद्ध महावीरस्वामीपेक्षां अधिक [illegible] वर्षे जगले. आतां डॉ. हार्नलेसाहेबांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, महावीरस्वामी मोक्षाला गेल्यानंतर पांच वर्षांनीं म. बुद्ध निर्वाणाला गेले. असें मानल्यास महावीरस्वामीच्या जन्मापूर्वी तीनच वर्षें म. बुद्धाचा जन्म झाला

असें सिद्ध होतें. म्हणजे महावीरस्वामींच्या जन्माच्या वेळीं म. बुद्ध तीन वर्षांचे होते. त्यांच्या दीक्षेच्या वेळीं ते तेहतीस वर्षांचे होते व त्यांना केवलज्ञानप्राप्ती होऊन त्यांनीं धर्म प्रभावनेला सुरवात केली तेव्हां ते पंचेचाळीस वर्षांचे होते असें ठरतें. उलट ज्यावेळीं म. बुद्धानें आपल्या पस्तीसाव्या वर्षी मध्यम मार्गाचा उपदेश सुरू केला तेव्हां भगवान महावीर सुमारें तेहतीस वर्षांचे होते असें म्हणावें लागेल. प्रो. कर्नसाहेबांच्या मतानुसार म. बुद्ध बहात्तर वर्षांचे असतांना श्रेणिक बिंबसार मरण पावला व त्यानंतर थोड्याच वेळानें बौद्धसंघात देवदत्तानें फूट पाडली. मज्झिमनिकायांतील अभयराजकुमार सुत्तावरून हें स्पष्ट होतें कीं, या दुफ-ळीची वार्ता भगवान महावीरांना समजली होती. दिगंबरग्रंथांतूनहि लिहिलें आहे कीं, सम्राट श्रेणिक कालवश झाल्याबरोबर अजातशत्रु मिथ्यात्वी झाला व चेलना राणीनें महावीरस्वामीकडे जाऊन आर्याचंदनाजवळ दीक्षा घेतली. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते कीं, भगवान महावीर त्यावेळीं इहलोकीं होते, व बौद्धांच्या सामयगामसुत्त व पासादिकासुत्तावरून असें ठरतें कीं, महावीर स्वामींच्या निर्वाणानंतर म. बुद्ध कांहीं वर्षे हयात होते. यावरून ते जास्तींतजास्त पांच वर्षेच महावीरस्वामी-नंतर हयात असावेत असें दिसतें; कारण जैन व बौद्ध या दोन्ही ग्रंथांच्या आधारें सम्राट श्रेणिक बिंबिसाराच्या मरणाचे वेळीं महावीर स्वामी इहलोकींच होते. ज्याअर्थी यावेळीं म. बुद्ध बहात्तर वर्षांचे होते त्याअर्थी भगवान महावीर निदान एकुणसत्तर वर्षांचे असले पाहिजेत. म्हणून महावीर स्वामींच्या निर्वाणानंतर म. बुद्ध पांच वर्षांहून अधिक काल हयात नव्हते असें सिद्ध होतें. म. बुद्धाचे देहावर बालपणीं जीं चिन्हें होतीं तीं चार तीर्थंकारांचीं होतीं व त्यांत महा-वीरस्वामींचें नांव होतें; लांछन नव्हते. इतर तीर्थंकरांचीं लांछनें होतीं. यावरून महावीरस्वामींचा अजून जन्म व्हावयाचा होता असें सिद्ध होतें. त्याप्रमाणें म. बुद्धाच्या पन्नासीनंतरच्या वीस वर्षांचा इतिहास चांगला मिळत नाहीं. यावरूनहि कांहीं अनुमान काढतां येतें. ज्या वेळीं भगवान महावीरांनीं धर्म-प्रभावनेस सुरवात केली, त्यावेळीं म. बुद्ध पंचेचाळीस वर्षांचे होते व मध्यम मार्ग उपदेशून चुकले होते. नंतर पांच वर्षांत वीरशासनाचाच विशेष फैलाव झाला असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं. नंतरच्या वीस वर्षांत बौद्धग्रंथां-तूनहि म. बुद्धांच्या हालचालींबद्दल कांहीं विशेष माहिती मिळत नाहीं; कारण हींच वर्षे भगवान महावीरांच्या धर्मप्रभावनेचीं होतीं. डॉ. हार्नेले साहेबांच्या

कालनिर्णयाप्रमाणें बऱ्याच बाबींचा उलगडा होत असल्यामुळें तोच योग्य वाटतो. बाद्धग्रंथांतून म्हटलें आहे कीं, नातपुत्त महावीरांचा प्रभाव बराच पडला होता, पण म. बुद्धांच्या दिव्योपदेशामुळें तो क्षीण झाला. या म्हणण्याचाहि विचार करणें जरूर आहे. उलट जैनधर्मशास्त्रकारांनींहि म्हटलें आहे कीं, महावीर भगवानांचा उपदेश सुरू झाल्याबरोबर बौद्धादि एकांतमताचा विच्छेद झाला. वरील दोन्ही लिखाणें अगदीं स्वाभाविक अशींच आहेत; कारण प्रत्येकाला स्वमताचें महत्त्व असणारच. पण मग म. बुद्धांच्या आयुष्यात त्यांच्या वयाच्या पन्नास ते सत्तर वर्षांमधील इतिहास तेवढा बौद्धशास्त्रकारांनीं कां वर्णिलेला नाहीं ? यावरून हें स्पष्ट होतें कीं, हीं वर्षे बौद्धधर्माला भरभराटीचीं गेलीं नाहींत. त्याचप्रमाणें एका महत्त्वाच्या राजकीय घटनेमुळेंहि वरील विचारासच पुष्टि मिळते. श्रेणिकबिंबिसाराच्या मरणानंतर लगेच अजातशत्रु किंवा कुणिक बुद्ध कां झाला ? याच वेळीं त्याला बौद्धधर्म पटला असें थोडेंच आहे ? तो क्षायिकसम्यक्त्वी श्रेणिकाच्या मरणाला कारण झाला म्हणून पितृघ्न अजातशत्रु जैनांच्या दृष्टीनें अगदीं घृणित ठरला होता. अशा वेळीं बौद्धसंघानें त्याला जवळ केला असल्यास त्यांत काय नवल ? त्यामुळें श्रेणिकाच्या मरणानंतर मगध व अंगदेशचें राज्य बौद्धधर्माचें झालेलें त्या धर्माच्या प्रभावामुळें नव्हे हें उघडच आहे. त्यानंतर थोड्याच वर्षांनीं भगवान महावीर निर्वाणाला गेले. त्यावेळीं आजीवक पंथाचा राजा पद्म यानें जैनसंघाचा छळ केला असा उल्लेख आहे. तो जैन व बौद्धग्रंथानुसार व वरील कालनिर्णयाप्रमाणें बरोबर जुळतो. वीरशासनाचा पूर्वी प्रभाव फार होता व नंतर कमी झाला हें बौद्धाचार्यांचें मतहि वरील घटनेनुसार खरें ठरतें. शिवाय महावीर भगवानांनीं सुरू केलेली धर्मप्रभावना म. बुद्धाच्या मध्यममार्गांत आडवी आली होती असें बौद्धग्रंथांतहि म्हटलेलें आहे महावीर भगवानांच्या निर्वाणापूर्वी दोनतीन वर्षेच देवदत्तानें बौद्धसंघांत वाद उपस्थित केला होता. त्याचें म्हणणें संघांतून मांसाशन बंद करून भिक्षूंना अधिक संयमी बनवावें असें होतें. या प्रश्नावरच दोन तट पडले. मांसाशनत्यागाचा उपदेश महावीरस्वामीशिवाय दुसरें कोणीहि त्यावेळीं करीत नसल्यामुळें त्यांच्याच उपदेशाचा परिणाम बौद्धसंघावर झाला हें उघड आहे. बौद्धांच्या महावग्गग्रंथावरून असें कळतें कीं, भिक्षूंना नग्नावस्था धारण करण्याची आज्ञा देण्याविषयीं कांहीं भिक्षूंनीं म. बुद्धाला सारखा तगादा लावला होता. दिगम्बर संघाच्या

प्रभावामुळें भिक्षूंचें महत्त्व कमी होत चाललें होतें असें यावरून दिसतें. म. बुद्ध अन्धकविन्दांत होते, तेव्हां त्यांच्याबरोबर १२५० भिक्षु होते व कांहीं वर्षांनंतर कसीनाराला ते होते तेव्हां त्यांच्याबरोबर अवघे २५० च भिक्षु होते यावरून हें उघड दिसतें कीं, इतर जनतेप्रमाणेंच महावीरस्वामींच्या उपदेशाचा प्रभाव बौद्धभिक्षुसंघावरहि पडत होता. तीर्थंकराच्या जीवनांत सर्वज्ञ होऊन धर्मप्रभावना करण्याचाच प्रसंग अद्वितीय प्रभावशाली असतो. तेव्हां या प्रसंगाचा प्रभाव बौद्धसंघावरहि पडला. तीर्थंकराचा विहार समवसरणासहित होतो व उपदेश शास्त्रसिद्ध आणि अनुभवगोचर असतो, कारण ते स्वतः केवलज्ञानी असतात. तीर्थंकरांच्या पुण्यप्रकृतीच्या प्रभावामुळें आसपास चारशें योजनें दुर्भिक्ष रहात नाहीं व समवसरणाच्या मानस्तंभाचें दर्शन घडलें कीं, मिथ्यात्व दूर होतें. अशा थोर महात्म्याचा प्रभाव म. बुद्ध व त्यांच्या संघावर पडला असल्यास त्यांत नवल कसले? म्हणूनच बहात्तराव्या वर्षी राजगृहनगरींत म. बुद्ध आले असतां एका कुंभाराच्याच घरी रात्र काढावी लागली. बौद्धग्रंथांतच खालील उद्गार आहेत. "पावापुरीच्या चण्ड नांवाच्या व्यक्तीनें मल्लदेशांतील सामगांवांत असलेल्या आनंदाला महावीर तीर्थंकरांच्या निर्वाणाची बातमी दिली, ती ऐकून आनंद म्हणाला, "मित्रा चंडा! ही वार्ता तथागत बुद्ध भगवानाला कळविली पाहिजे. चल आपण त्यांच्याकडे जाऊन ही बातमी देऊं." म. बुद्धाला ही बातमी कळविल्याबरोबर त्यानें संघापुढें एक महत्त्वपूर्ण व्याख्यान दिल." या उद्गारावरून बौद्धसंघाला महावीरनिर्वाणाचें किती महत्व वाटलें तें दिसून येतें. आतांपर्यंत मध्यम मार्गाच्या प्रसारांत म. बुद्धाला जो अडथळा होता तो आतां दूर झाला. वीरनिर्वाणानंतर म. बुद्ध व त्याचा शिष्य सारीपुत्त यांनीं मध्यम मार्गाचा प्रचार बराच केला. वरील सर्व विवेचनावरून डॉ. हॉर्नलेसाहेबाचाच कालनिर्णय सर्व घडामोडींशीं जुळतो असें दिसून येतें. बौद्ध शास्त्रात एके ठिकाणीं आपण सर्व मतप्रवर्तकांत लघु आहात का असें विचारलें असतां म. बुद्धांनीं मौन सेविल्याचा उल्लेख आहे. हें लघुत्व वयाच्या दृष्टीनें नसून मताच्या दृष्टीनें होतें हें उघड आहे. वयानें ते महावीरस्वामीपेक्षां मोठे होते व मतानें मात्र सर्व मतांत अर्वाचीन अर्थात् लघु होते यांत शंका नाहीं.

वीरनिर्वाणाबद्दल तीन मतें जीं प्रचलित आहेत तीं वर दिलीं आहेत. त्यांपैकीं इ. स. पू. ५२७ हें मत हल्लीं रूढ आहे. दुसरें मत डॉ. जॉर्ज चार्पेंटर यांचें

आहे. तें म्हणजे इ. स. पू. ४६८ या वीरनिर्वाणवर्षाचें. पण या मतानुसार म. बुद्धाच्या निर्वाणानंतर महावीरस्वामी मोक्षाला गेले असें ठरतें व तें जैन आणि बौद्धशास्त्रांना अगदींच सोडून आहे. अर्थात् हें मत सर्वस्वी त्याज्यच होय. इ. स. पू. ६०६ हें वर्ष *ठरविणारें मत पं. नाथुराम प्रेमी यांनीं मांडलें आहे.* त्यांनीं देवसेनाचार्य व अमितगत्याचार्य यांचे आधार दिले आहेत. त्यांत विक्रमाच्या मरणवर्षापासून वी. संवत् सुरू झाल्याचें धरलें आहे आतां शास्त्रग्रंथांतून जे आधार वर दिले आहेत त्यावरून वीरनिर्वाणवर्ष इ. स. पू. ५४५ ठरतें व सिंहली बौद्धांनीं बुद्ध परिनिर्वाणाचें वर्ष इ. स. पू. ५४३ निश्चितपणें ठरविलें असल्यामुळें आणि डॉ. हॉर्नलेसाहेबांचें मतच कसें ग्राह्य आहे तें बाबू कामता प्रसादांच्या वर दिलेल्या उताऱ्यांत स्पष्टपणें दिसून येत असल्यामुळें या दोन्ही मतांशीं इ. स. पू. ५४५ हेंच निर्वाणवर्ष बरोबर जुळतें. कारण या वर्षाप्रमाणें म. बुद्ध भगवान महावीरापूर्वी सहा वर्षे जन्मले व म. बुद्ध वीरनिर्वाणानंतर दोन वर्षांनीं निर्वाणाला गेले असें ठरतें. हा काळ इतिहासाला व योग्य प्रमाणाला धरून आहे पण रूढ कल्पनेनुसार म. बुद्ध अगोदर निर्वाणाला गेले व नंतर सोळा वर्षांनीं महावीरस्वामी मोक्षाला गेले असें ठरतें व ही गोष्ट बौद्धग्रंथांतील वर्णनांना सोडून आहे. बुद्ध निर्वाणाचें वर्ष इ. स पू. ४८० हि कांहीं विद्वानांनीं ठरविलें आहे. पण खण्डगिरा येथील खारवेळच्या शिलालेखाशीं हें वर्ष जुळत नाहीं. सिंहलीबौद्धांच्या मतांशीं खारवेलचा शिलालेखहि जुळतो म्हणून तेंच मत अधिक विश्वसनीय होय व दोन्ही थोर पुरुषांच्या चरित्रांतील संबंधांशीं डॉ. हॉर्नले यांच्या विचारसरणीनुसार तें मत जुळत असल्यामुळें ऐतिहासिक दृष्ट्या वीरनिर्वाणवर्ष इ. स. पू. ५४५ च अधिक ग्राह्य होय. पण रूढ कल्पना कशी बदलावी ?

वरील नव मतास हिंदी विश्वकोषांतील आणखी एक आधार आहे तो असा तीर्थोद्धार प्रकीर्ण व तित्थुगलियपयन्न या दोन प्राचीन जैन ग्रंथांनुसार ज्या रात्रीं महावीरस्वामी मोक्षाला गेले त्याच रात्रीं पालक राजाला अवंतीनगरीच्या सिंहासनावर राज्याभिषेक झाला होता. पालकवंशानें साठ वर्षे राज्य केलें. नंतर नंदवंशानें १५५ वर्षे, मौर्यवंशानें १०८ वर्षे, नंतर पुष्यमित्र राजानें ३० वर्षे, पुढें बलमित्र किंवा भानुमित्रानें ६० वर्षे, नंतर नरसेन नबरवाहनानें ४० वर्षे, पुढें गर्दभिल्लानें १३ वर्षे राज्य केल्यावर चार वर्षे शकराजानें राज्य केलें. म्हणजे

४७० वर्षे झालीं अशी राजपट्टावली आहे. सरस्वतीगच्छाच्या पट्टावलींतील गाथेंत स्पष्ट म्हटलें आहे कीं, " वीरात् ४९२, विक्रमजन्मान्त वर्ष २२, राज्यन्तवर्ष ४, " म्हणजे हीं सर्व समान होत. शक राज्यान्त वर्ष **वीरनिर्वाणानंतर** *४७० म्हणजे विक्रमजन्मान्तवर्ष बावीसावें. वयाच्या अठराव्या वर्षी विक्रमाला* राज्याभिषेक झाला असल्यामुळें वीरात् ४९२ म्हणजे विक्रमाभिषेकाब्दपूर्व ४८८ वें वर्ष. म्हणजे इ. स. पू. ५४५–४४ होय. म्हणजे हल्लीं जो महावीरसंवत् गणला जातो तो खऱ्या वीर संवतापेक्षां अठरा वर्षांनीं कमी आहे, हें साधार सिद्ध होत आहे. याप्रमाणें वीरजन्मवर्षनिर्णय करणें फार घोटाळ्याचें झालें आहे. शेवटीं वाद एवढ्यावरच येऊन ठेपला आहे कीं, वीरनिर्वाणनंतर ४७० वर्षांनीं विक्रमजन्म झाला आहे असें स्पष्ट लिहिलें असतांना त्याप्रमाणें विक्रम-संवत् सुरू होण्यापर्यंतचीं १८ वर्षे अधिक धरून वीरसंवत् गणावयाचा कीं, तसें न करतां विक्रम संवतांत अंधपणानें ४७० वर्षेच तेवढीं मिळवून वीरसंवत् गणावयाचा ? कसें केलें पाहिजे तें वाचकांनींच ठरविलें पाहिजे. जैनग्रंथ, हिंदी विश्वकोष, सरस्वतीगच्छाची पट्टावली, म. बुद्ध आणि भगवान महावीर-स्वामींच्या जीवनक्रमांत बसणारा मेळ, व बौद्ध ग्रंथ या सर्वांचेच आधार धाब्यावर बसवून देऊन कोणी तरी चुकून अठरा वर्षे न मिळवितां वीर-संवताची गणना केली म्हणून तीच चालू ठेवण्याचा हट्ट धरावयाचा हा केवढा कदाग्रह होय !

## प्रकरण सहावें.

# वीरजन्मकल्याणक.

जो देवाणवि देवो जं देवा पंजलि नमं संति ।
नं देवदेव महिअं सिरसा वंदे महावीरम् ॥

राजा सिद्धार्थ हे लिच्छविवंशाचे असल्यामुळें वैशालीपति मगधाधीश राजा चेटकाला आपली वडील मुलगी सिद्धार्थराजास देण्यास कांहींच वाटलें नाहीं. चेटक स्वत: खरा राजा व सिद्धार्थ वज्जियनसंघांतील ज्ञातिवंशातर्फे एक प्रतिनिधि म्हणूनच केवळ राजा; तरी पण सोयरिक करण्यांत चेटकाला अभिमानच वाटला. याचें कारण अर्थात्‌च सिद्धार्थराजाचें कुलशीलच होय. दोन्हीं घराणीं जैनधर्माचींच अनुयायी होतीं, पण सिद्धार्थराजा विशेष धर्मनिष्ठ होता. वैयक्तिक बाबींप्रमाणेंच सार्वजनिक बाबतींतहि ते कुंडग्रामांत न्यायनिपुण व नि:स्वार्थी म्हणून प्रख्यात होते. ते अनेक विद्यापारंगत होते. आपल्या पुरुषार्थानें त्यांनीं ज्ञातिवंशाला भूषविलें होतें. त्रिशलादेवीहि बापाप्रमाणेंच अद्वितीय व गुणी होती. तिच्या गुणामुळेंच तिला प्रियकारणी हें नामाभिधान प्राप्त झालें होतें. सौंदर्य, दया व शील वगैरे गुण तिच्यामध्यें परिपूर्ण होते. विवाहानें बद्ध झाल्यानंतर एक मनानें व एक विचारानेंच राजा सिद्धार्थ व त्रिशलादेवी संसार करीत होतीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हें दांपत्य त्याकाळीं अगदीं आदर्श म्हणून मानलें जात असे.

एका रात्रीं त्रिशलादेवीला पडलेल्या सोळा स्वप्नांचें वर्णन असगमहाकवीनें आपल्या वर्धमानचरित्राच्या सतराव्या सर्गांत खालीलप्रमाणें केलें आहे. "इकडे ज्याचें देवगतींतील आयुष्य सहा महिने उरलें आहे व जो पुढच्याच जन्मीं संसारसमुद्र तरून जाण्यासाठीं अद्वितीय असें तीर्थ निर्माण करणार आहे, त्या पुष्पोत्तर विमानांतील प्राणतेंद्र देवाकडे सर्व देव गेले व त्याला नमस्कार करूं लागले. त्यावेळीं अवधिज्ञान झालेल्या सौधर्म इंद्रानें भावी जिनमाता जी त्रिशलाराणी तिची तुम्ही उपासना करा अशी कुंडलपर्वतावरील आठ दिक्कुमारींना आज्ञा केली. चूडामणी रत्नांच्या कांतीनें जिचा पुष्पमुकुट शोभत आहे अशी चूलावती,

त्रैलोक्यसुंदर मालनिका, पुष्पभरानें लवलेल्या वनमालेप्रमाणें सुंदर नवमालिका दिक्कन्या त्रिशिरा; उमललेल्या फुलाप्रमाणें जिचें हास्यवदन आहे व कल्पवृक्षाचीं फुलें जिनें धारण केलीं आहेत अशी पुष्पचूला, चित्रविचित्र बाहुभूषणांनीं युक्त अशी कनक चित्रा; स्वतेजानें सुवर्णकांतीसहि लाजविणारी कनकादेवी व अप्रतिम सुंदर अशी वारुणी देवी अशा या आठ दिक्कन्यका हात जोडून विनम्र मस्तकानें त्रिशला राणीकडे गेल्या. स्वाभाविक सुंदर आकृतीच्या या अष्ट दिक्कन्यकांनीं परिवेष्टित अशी त्रिशलाराणी अधिकच शोभूं लागली. बरोबरच आहे. चंद्रिका एकाकी असली तरी जननयनांना आनंदविते; मग ती तारांगणानें वेष्टित असल्यावर त्या शोभेचें काय वर्णन करावें ? कुबेराच्या आज्ञेनुसार तिर्यग्विजृंभक देवांनीं पंधरा महिनेपर्यंत ज्यांचे किरण चोहोंकडे पसरलेले राहतील अशा साडेतीन कोटी रत्नांची वृष्टि केली. अमृतवत् शुभ्रमहालांत मऊ कापसाच्या बिछान्यावर त्रिशलादेवी पहुडली असतां, जिनेश्वराच्या जन्माची सूचना देणारीं व भव्यांनीं गायिलेलीं सोळा स्वप्नें तिनें पाहिलीं. मस्तीच्या मदरसानें ज्याचें गंडस्थळ ओलें झालें आहे असा ऐरावत, चंद्रप्रकाशाप्रमाणें शुभ्र व डरकाळी फोडणारा वृषभ, मोठ्या आयाळाचा व भयंकर पिंगाक्ष सिंह, रानहत्तीकडून अभिषिक्त अशी लक्ष्मी, आकाशांत लोंबत असलेल्या सुगंधितमय दोन पुष्पमाला, घनांधकारनिवारक पूर्ण चंद्र, कमळविकासी बालसूर्य, स्वच्छपाण्यांत मनसोक्त क्रीडा करणारें मत्स्ययुगल, फलाच्छादित व कमलपुष्पवेष्टित कलशद्वय, स्फटिकाप्रमाणें पाणी असलेलें कमलसरोवर, आपल्या तरंगांनीं सर्व दिशा व्यापून टाकणारा समुद्र, रत्नमणिकिरणांनीं सुशोभित सिंहासन, फडफडणारी पताका असलेलें देवविमान, नागकन्यकांनीं गजबजलेलें नागभवन, आकाशभर पसरलेला रत्नपुंज व धूमरहित वन्हि हे सोळा विषय त्रिशलाराणीनें स्वप्नांत पाहिले. ज्या रात्रीं पुष्पोत्तरविमानांतून देव च्यवून त्रिशलाराणीच्या गर्भाशयांत प्रवेश करता झाला त्या रात्रीं प्रातःकालाचे थोडें पूर्वी वरील स्वप्नें तिला दिसलीं. प्रातःकाळीं उठल्यानंतर आश्चर्यचकित होऊन तिनें तीं सर्व स्वप्नें सिद्धार्थराजाला सांगितलीं. राजालाहि तीं ऐकून आनंद झाला, व त्यानें स्वप्नफल सांगण्यास सुरवात केली ती खालीलप्रमाणें, " राज्ञे, स्वप्नांत ऐरावत पाहिला असल्यामुळें तुला त्रैलोक्याचा अधिपति असा मुलगा होईल. वृषभ पाहिला असल्यामुळें मुलगा धर्मप्रवर्तक होईल. सिंहदर्शनामुळें तो सिंहाप्रमाणें पराक्रमी होईल. लक्ष्मीदर्शनामुळें मेरू

पर्वतावर इंद्रादि देवाकडून अभिषेक करण्यास योग्य असा होईल. पुष्पमाळा-द्वयाच्या दर्शनामुळें तो यशाचा सांठा संपादन करील. चंद्रदर्शन स्वप्नांत झालें असल्यामुळें तो मोहांधकाराचा नाश करणारा होईल. सूर्यदर्शनामुळें होणारा पुत्र कमलरूपी भव्यलोकांना आनंद देणारा होईल. मत्स्ययुगलांचें दर्शन झालें असल्यामुळें मुलाला अनंतसुखप्राप्ति होईल. स्वप्नांत कलश दिसलें असल्यामुळें मुलाचा देह १००८ लक्षणांनीं युक्त असेल. सरोवरदर्शनामुळें तो लोकांची पिपासा दूर करणारा होईल; आणि स्वप्नांत सिंहासन दिसलें असल्यामुळें अंतीं तो उत्कृष्ट पद म्हणजे मोक्षपद मिळवील. देवविमानाच्या अवलोकनावरून असें सिद्ध होतें कीं, तो देवगतींतून येथें जन्माला येईल. नागभवनाच्या दर्शना-मुळें तो तीर्थप्रवर्तक होईल. रत्नराशीच्या अवलोकनावरून तो अनंत गुणांचा धारक होईल व स्वप्नांत अग्नि दिसला असल्यामुळें कर्मक्षय करणारा होईल.' वरीलप्रमाणें स्वप्नफल सिद्धार्थराजानें त्रिशलाराणीला सांगितलें त्यामुळें तिला जन्मसार्थक्य झाल्यासारखें वाटलें व इतर परिवारालाहि विशेष आनंद झाला. मोक्षाधिकारी व धर्मप्रवर्तक असा पुत्र आपल्या पोटीं जन्मणार असें ऐकून कोणाला बरें आनंद वाटणार नाहीं ?

पुढें तो प्राणतेंद्रदेव पुष्पोत्तरविमानांतून च्यवून धवलगजाच्या स्वरूपानें आषाढ शुक्ल षष्ठीच्या दिवशीं उत्तराफाल्गुनी नक्षत्रावर, चंद्र उन्नतावस्थेला प्राप्त झाला असतां त्रिशलादेवीच्या मुखांत प्रविष्ट झाला. त्याच क्षणीं चार इंद्रांचीं सिंहासनें कंपायमान झालीं व त्यावरून तीर्थंकरांचें गर्भावतरण झालें हें ओळखून त्रिशलादेवीजवळ आले व दिव्य रत्नालंकार, गंध, पुष्पमाला व अमूल्यवस्त्रें वगैरेंनीं तिचा सत्कार त्यांनीं केला व तीर्थकल्याणक महोत्सव करून परत देव-लोकाला गेले. स्वतःच्या देहकांतीनें आकाशाला प्रकाशित करणाऱ्या श्री, ऱ्ही, धृति, लवणा, बला, कीर्ति, लक्ष्मी व वाक् या आठ देवता वृद्धिंगत होणाऱ्या आनंदासह इंद्राच्या आज्ञेनुसार त्रिशलादेवीजवळ आल्या. मुखांत लक्ष्मी, हृद-यांत धृति, शरीरात लवणा, गुणामध्यें कीर्ति, बळांत बळादेवी, महत्वामध्यें श्री, भाषणात वाक्देवी व नेत्रांत लज्जा या रीतीनें त्या देवतांनीं त्रिशलादेवीच्या शरिरांतील यथोचित स्थानीं वास केला. जगाला अद्वितीय नेत्राप्रमाणें असलेले प्रभु मातेच्या गर्भामध्यें विराजमान झाले होते, पण ते त्रिज्ञानधारी होते. उदय-पर्वताच्या आड बालसूर्य असला तरी त्याला तेजस्वी किरण असतातच. त्या-

प्रमाणेंच मातेच्या उदरांतहि तीर्थंकर त्रिज्ञानधारीच होते. चिखलाचा संपर्कहि नसला म्हणजे पाण्यांत खोलपर्यंत बुडालेल्या कमलाच्या देठाला कांहीं त्रास होतो काय ? नाहीं. त्याचप्रमाणें जिनेश्वराला गर्भांत वास करूनहि मुळींच त्रास झाला नाहीं. त्रिशलादेवीचा देह शुभ्र झाला, जणुं काय वीरभगवानाचें धवल यशच बाहेर पडत होतें. जिनेश्वराबद्दलची आपली भक्ति व्यक्त करण्यासाठीं कुबेर सुंदर वस्त्रें, उटी, पुष्पमाला, रत्नालंकार वगैरे घेऊन त्रिशलादेवीची त्रिकाळ पूजा करीत असे. इतर स्त्रियांप्रमाणें त्रिशलादेवीला भलतेसलते डोहाळे झाले नाहींत. कुलाचारानुसार सिद्धार्थानें पूंसवनविधिहि केला.

योग्य कालानंतर सर्व ग्रह उच्चस्थानीं येऊन त्यांनीं लग्न पाहिलें असतां, चैत्र शु॰ ॥ १३ स सोमवारीं पहाटे चंद्र उत्तराफाल्गुनी नक्षत्रांत असतां, त्रिशलामातेनें श्रीभगवानाला जन्म दिला. भगवंताच्या जन्माबरोबर सर्व दिशा प्रसन्न झाल्या व सर्व प्राणिमात्राचीं अंतःकरणें प्रफुल्लित झालीं. आकाश निरभ्र झालें. देव पुष्पवृष्टि करूं लागले व दुंदुभिनाद होऊं लागला. त्रैलोक्याचे अद्वितीय स्वामी, संसारभ्रमणांतून जीवाला सोडविणारें, तीर्थंकराचें वैभव असलेलें बालक जन्मास आल्यामुळें इंद्राचीं आसनें कंपायमान झालीं. अवधिज्ञानानें तीर्थंकर जन्म झाला असें ओळखून घंटानाद करीत सर्व देवासमवेत इंद्र आनंदानें व विनतमस्तकानें कुंडग्रामाला आले. बालजिनेश्वराची पूजा करण्याबद्दल देवांमध्येंहि अहमहमिका सुरू झाली. नानाप्रकारचे रत्नालंकार, उत्तम वेष व सुंदर विमानें यांसह देवांनीं सर्व आकाश घेरून टाकलें. कुंडग्रामाच्या लोकांना मागें भिंत नसूनहि अंतरालांत देवादिकांचीं चित्रें कोणीं काढलीं असें आश्चर्य वाटलें. इतके ते देव स्तब्धपणें मार्गप्रतीक्षा करीत होते. ज्योतिर्लोकांत सिंहनाद करून चंद्रादिक ज्योतिर्देव गोळा करण्यांत आले व ते सौधर्मेंद्राला येऊन मिळाले. शंखध्वनीनें भवनावासांतील चमर वैरोचन वगैरे भवनवासी देव आपल्या परिवारासह सौधर्मेंद्राला येऊन मिळाले. दुंदुभिनादानें व्यंतरदेव गोळा झाले व ते कुंडपुराला आले. इंद्रादि देवांनीं बालजिनेश्वराचें दर्शन घेतलें. नंतर जन्मकल्याणिक महोत्सवाप्रीत्यर्थ मेरूपर्वतावर अभिषेक करण्यासाठीं एक मायावी बालक त्रिशलादेवी राणीजवळ ठेवून इंद्रादि देवांनीं जिनबालकाला ऐरावतावर इंद्राणीचे मांडीवर ठेवून आकाशमार्गानें मेरूपर्वतावर नेलें. मेघगर्जनेप्रमाणें गंभीर व कर्णमधुर वाद्यध्वनीनें त्रैलोक्य व्यापून गेलें. किन्नरेंद्र गाणें गाऊं लागले. ईशानेंद्रानें जिनबालकावर श्वेत छत्र

धरलें होतें. माहेंद्र व सनत्कुमारांनीं चवऱ्या धरल्या होत्या; चामर, स्फटिकमण्याचा दर्पण, पंखा, कलश, कल्पवृक्ष, पुष्पांच्या माळा व इतर अष्टमंगलद्रव्यें इंद्राण्यांनीं घेतलीं होतीं. सर्व देव मनोवेगानेंच मेरूपर्वतावर जेथें अकृत्रिम जिनालयें आहेत तेथें येऊन पोहोंचले. या पांडुकवनांत शंभर योजनें लांब व पन्नास योजनें रुंद आणि आठ योजनें उंच अशा चंद्रप्रकाशाप्रमाणें शुभ्र असलेल्या पांडुक शीलेवर सर्व देव आले. चंद्रकलेच्या आकाराच्या त्या पांडुकशीलेवर पांचशें धनुष्य व्यासाचें, अडीचशें धनुष्य उंचीचें व त्याच्या दुप्पट लांबीचें असें एक सिंहासन ठेऊन त्यावर जिनबालकाला ठेवण्यांत आलें. सर्व देवांनीं जिनमहिमा गाण्यास सुरवात केली. तेजस्वी महारत्नखचित घागरींत क्षीरसमुद्राचें पाणी भरून आणून इंद्रादि देवांनीं शंख, नौबत वगैरे मंगलवाद्यांच्या निनादांत जिनबालकाला अभिषेक केला. त्यावेळीं मेरुपर्वतहि गद्गद झालला; कारण जिनेश्वर अनंत बलशाली असतात. त्याच वेळीं इंद्रादि देवांनींच जिनबालकाचें वीर असें नांव ठेविलें. अभिषेकानंतर अप्सरा नृत्य करूं लागल्या. जिनबालकाला रत्नमय अलंकारांनीं व मनोहर वस्त्रांनीं भूषित केलें, मंगल द्रव्यें अर्पण करण्यांत आलीं व इंद्रादिदेवांनीं खालील प्रमाणें स्तुति केली. ' हे वीर नाथा ! जर तुझी अबाधित जिनवाणी नसती तर भव्यजीवांना या भूतलावर वस्तूंचे खरें स्वरूप कसें समजलें असतें ? सूर्यप्रकाशावांचून कमलें जशीं विकसत नाहींत त्याचप्रमाणें जिनेश्वराच्या आगमानाशिवाय भव्यजीवहि प्रफुल्लित होत नाहींत. हे जिनेशा, तेलवातीशिवायचे आपण दीप आहांत; काठिण्यविरहित चिंतामणि आहांत; सर्परहित चंदनवृक्ष आहांत; उष्णतारहित सूर्य आहांत. क्षीरसमुद्रावरील फेनाप्रमाणें आपलें यश धवल आहे.' याप्रमाणें स्तुति करून व मंगलारति पूर्ण करून सर्व देव जिनबालकाला घेऊन कुंडग्रामांतील सिद्धार्थराजाच्या प्रासादांत आले.

इकडे कुंडग्रामांतहि प्रभु जन्मल्याची वार्ता हत्तीवरून साखर वांटीत लोकांना विदित करण्यांत आली असल्यामुळें भेटी घेऊन पुरवासी नरनारी व बालकें सिद्धार्थाच्या वाड्यांत जमलीं होतीं. देवांनीं प्रथम दिव्यवस्त्रें, अलंकार, पुष्पहार व उटीचे पदार्थ वगैरेंनीं सिद्धार्थराजा व राणी त्रिशला यांचें पूजन केलें, भेटी अर्पण केल्या व नृत्यगायन करून जिनस्तुति करीत करीतच इंद्रादिदेव देवलोकाला परत गेले. पुरवासी जनांच्या भेटी सिद्धार्थानें घेतल्या व यथोचित दानहि केलें. वैशालीनगरीस व इतरत्र वीरजन्माची वार्ता कळविण्यांत आली.

त्याचप्रमाणें गांवोगांवचे आप्त, इष्ट, मित्र बारशाला आले. वीरजन्मानंतर मेघवृष्टि झाली. दैन्यहि दूर झालें. रोगराई नष्ट झाली. सिद्धार्थाचें घरींहि बरीच संपत्ति वृद्धिंगत झाली. या प्रकाराला अन्वर्थक असेंच वर्धमान हें नांव ठेवण्यांत आलें. जमलेल्या सर्व लोकांना यथोचित आहेर करण्यांत आले व मिष्टान्नानें तृप्त करण्यांत आलें. एकदां चारणऋद्धीनें युक्त असे विजय व संजय असे दोन मुनि भगवंताच्या दर्शनास आले असतां, दर्शनमात्रेंकरूनच त्यांचें सर्व संदेह दूर झाले म्हणून त्यांनीं जिनबालकाला सन्मति हें नामाभिधान दिलें. याप्रमाणें इंद्रादिदेवांनीं वीर हें नांव ठेवलें. घरीं वर्द्धमान हें नांव ठेवण्यांत आलें व मुनींनीं सन्मति हें नांव दिलें. असो. जन्मकल्याणक महोत्सवाचें वर दिलेलें वर्णन दैवी चमत्कारजन्य आहे म्हणून तें असंभवित मानण्याचें कारण नाहीं. आपल्या कोत्या बुद्धयनुसार दुनियेंतील प्रकारांचें माप करून चालणार नाहीं. जगांत अशा अनंत वस्तु आहेत कीं, ज्यांच्या सामर्थ्याचा पार मानवबुद्धीला लागत नाहीं. अशा वेळीं तज्ञाच्या सांगण्यावर भरंवसा ठेवणें भाग असतें. तीर्थंकर जसे असामान्य तसेच त्यांचे इतर सर्व प्रकारहि असामान्यच असणार.

पण तीं असामान्यता मिळविण्याची ताकद सर्वांमध्यें आहे. राजे सर्वच होऊं शकत नाहींत; पण राजा होण्याचा संभव सर्व मानवांना आहे. तसेंच तीर्थंकरांचे बाबतींतही आहे. त्यांचीं अलौकिक वर्णनें वाचून सामान्य माणसें तें सर्व कृत्रिम व खोटें आहे असें मानूं लागतात, पण आत्म्याच्या अनंतबलावर ज्यांचा विश्वास आहे ते अशा आप्तवाक्यावर विश्वास ठेऊन चालतात व मग त्यांनाहि कांहीं प्रमाणांत आत्मशक्तीचा अनुभव येऊन तीर्थंकरांच्या अनंतबलाची कल्पना करण्याचीहि पात्रता येते. म्हणून श्रद्धा ही महत्त्वाची चीज आहे व तिचा त्याग न केल्यास अनंताचेंहि ज्ञान होणें शक्य आहे. महावीरासारखे तीर्थंकर अनंत काळांत चोवीसच होतात; त्यामुळें त्यांचें महत्त्व विशेष आहे. तें महत्त्व न जाणतां या पौराणिक गोष्टी म्हणजे भाकडकथा हेत असें मानून शहाणें म्हणविणारे कांहीं लोक अशा महाभागांचीं चरित्रेंच विसरून जातात व त्यांवर श्रद्धा ठेवीत नाहींत अशा करण्यानें त्यांचेंच नुकसान होत असतें; कारण त्यामुळें स्वाभाविक महत्ता प्राप्त करून घेण्यास त्यांनाच विलंब होतो. केव्हांना केव्हांतरी त्यांनाहि अशा शक्तीवर विश्वास ठेवावा लागेल व ती त्यांना प्राप्त करून घ्यावी लागेल व होईलहि. पण आतां मात्र व्यर्थ संशयात्मे बनून दुर्गतीचे फेरे फिरत

आहेत. दुर्दैव बिचाऱ्यांचें ! असो. नैसर्गिक नियमानुसार बालवर्धमान वाढूं लागलें व सर्वांच्या नयनांना सुखवूं लागलें. त्यांच्या बाललीला पाहून मातापितरांना कौतुक वाटे. ते जन्मतःच त्रिज्ञानधारी असल्यामुळें त्यांच्या सर्व लीला जाणतेपणाच्या असत. त्यांच्या सेवेला रोचकद्वीपांतील छप्पन्न कुमारिका होत्या. त्यांचे बोबडे बोल सर्वांचें मनरंजन करूं लागले. त्यांचें सौंदर्य अप्रतिम व देहयष्टि डौलदार असल्यामुळें सर्व लोक त्यांच्याकडे आकर्षिले जात. त्यामुळें कुंडनपुरांतील बहुतेक लोक त्यांना खेळविण्यास व मुलें त्यांच्याशीं खेळण्यास जमत. एके दिवशीं एका मोठ्या वडाच्या झाडावर संवगड्यांसह प्रभू चढून खेळत असतां संगम नांवाचा देव त्यांना भिवविण्यासाठीं आला. त्यानें हजार फणांच्या नागाचें भयंकर स्वरूप धारण केलें व बुंध्यापासून वरपर्यंत वटवृक्षाला त्यानें वेढे घातले. इतर मुलें भिऊन पळालीं व कांहीं झाडावरच राहिलीं. पण वर्धमानानीं नागाच्या फणीवर प्रथम पाय ठेऊन नंतर त्याच्या मऊ अंगावरूनच झाडाखालीं तें उतरले. अनंतबलशाली आत्म्यास भय कसलें ? संगमदेवाला प्रभूच्या अनंतबलाची कल्पना झाली व त्यानें त्यांचें नांव महावीर ठेविलें. कुंडपुरांतील लोकांनाहि प्रभूच्या सामर्थ्याचें आश्चर्य वाटलें व ते महावीराकडे निराळ्याच दृष्टीनें पाहूं लागले.

बालपणांतील विविध क्रीडा करून वर्धमान पौगंडावस्थेस प्राप्त झाले. त्यांना लौकिकविद्या शिकण्याची जरूरीच नव्हती, कारण ते जन्मतःच त्रिज्ञानधारी होते. तरीपण पद्धतीप्रमाणें क्षत्रियोचित विद्या त्यांना सांगण्यांत आल्या व त्या एकदां ऐकून व पाहूनच त्यांनीं त्या आत्मसात केल्या. वयाच्या आठव्या वर्षीच वर्धमानानीं श्रावकाचीं बारा व्रतें घेतलीं. मातापितराबरोबर ते सर्व धार्मिक कृत्यें करीत. ते एक आदर्श राजकुमार बनले. बालपणांतील चांचल्य नाहींसें झालें व त्यांना युवावस्था प्राप्त झाली. घाम न येणें, शरीर सुगंधयुक्त असणें, रक्त वीर्यासारखें पांढरें असणें, वगैरे तीर्थंकराच्या स्वाभाविक दहा गुणांनीं युक्त असलेलें त्यांचें दिव्य शरीर सात हात उंच, दृढ व भव्य होतें. वयाचीं तीस वर्षे त्यांनीं कौमारावस्थेंत व घरींच काढलीं. तत्कालीन् क्षात्रपुत्र शिकारीस जात व इतर अनेक प्रकारच्या क्रीडा करीत. पण या यौवनोचित क्रीडा वर्धमानांनीं मुळींच केल्या नाहींत. धर्मध्यानांत ते मग्न असत व सिद्धार्थराजाबरोबर सार्वजनिक कामांतहि मन घालीत. त्यामुळें सर्व लहानथोरांवर त्यांची छाप पडली व त्यांच्या या अलौकिक गुणांची ख्याति दिगंत पसरली. लौकिकव्यवहारांत असूनहि ते

त्याहून निराळे होते. अनेक पूर्वभवांतून त्यांनीं कर्मक्षय केलेला असल्यामुळें व तर्थिंकर नामगोत्र बांधलेलें असल्यामुळें त्यांना या जन्मीं विशेष कर्मक्षय करावयाचा राहिला नव्हता व नवा कर्मबंधहि त्यांनीं केला नाहीं. सामान्य जीवांना श्रावकांचीं बारा व्रतें पाळणेंहि कठीण जातें, पण वर्धमानांना तें मुळींच बिकट गेलें नाहीं. त्यांनीं तीं अगदीं बाळपणींच आठव्या वर्षींच घेतलीं व पाळलीं. स्वतः तरून इतर भव्यांना तीर्थ बनणाऱ्या या महात्म्याच्या बाबतींत असे अजब प्रकार घडणेंच स्वाभाविक होय. अशा थोर पुरुषाचें कौतुक मातापितरांना व इतर लोकांना वाटलें असल्यास नवल नाहीं; पण तें स्वाभाविकच होतें असें ज्ञानी महात्म्यांनीं सांगून ठेविलें असल्यामुळें श्रद्धाळु भव्यजीवांनीं तें विश्वसनीय मानलें होतें; व त्याचें आश्चर्य मानण्याचें सोडून दिलें होतें. सम्यक्श्रद्धान हाच भव्यजीवांचा मुख्य गुण होय व तीर्थंकरांना जाणण्यास व अनुसरण्यास असेच भव्य लायक होत.

---

## प्रकरण सातवें.

# दीक्षाग्रहण व केवलज्ञानप्राप्ति.

**श्रीवर्धमानमानन्दं नौमि नानागुणाकरम् ।**
**विशुद्धध्यानदीप्तार्चिर्हुतकर्मसमुच्चयम् ॥**

महावीरस्वामी बालपणापासूनच विरक्त होते व यौवनावस्थेंतच त्यांना वैराग्य प्राप्त झालें होतें. सांसारिक सुखांत त्यांना आनंद वाटणें शक्य नव्हतें व तीस वर्षें संसारांत राहूनहि ते त्यापासून अलिप्त राहिले. आत्म्याच्या शुद्धावस्थेचा अनुभव घेणेंच जीवात्म्याचें कर्तव्य आहे हें ते पूर्णपणें जाणत होते व त्या कर्तव्याची पूर्ती करण्यासाठींच हा त्यांचा जन्म होता. एके दिवशीं त्यांना एकाएकीं विशेष उपरति झाली, तेव्हां त्यांनीं अवधिज्ञानानें जाणलें कीं, सर्व पूर्वकर्मबंध आतां तुटलेले आहेत. विषयाकडे उद्धत इंद्रियांची स्वभावतःच प्रवृत्ति असते या गोष्टीचाहि त्यांनीं विचार केला. नाना प्रकारच्या मुगुटांच्या किरणांनीं मेघ नसतांनाहि इंद्रधनुष्याची शोभा उत्पन्न करणाऱ्या लौकांतिक देवांचा समुदाय त्यावेळीं तेथें प्रभूजवळ आला. मोक्षेच्छु सन्मति जिनेश्वरास विनयपूर्वक वंदन करून देवगण

म्हणाला, हे वर्धमान, दीक्षा घेण्याची वेळ जवळ आली आहे. तपोलक्ष्मी अतिशय उत्कंठित होऊन आपल्याकडे झपाट्यानें येऊं लागली आहे. जन्मतःच उत्पन्न झालल्या अशा निर्मल तीन ज्ञानांनीं हे प्रभो, आपण युक्त आहांत. ज्यांना तत्त्वाचें थोडेंबहुत स्वरूप समजलें आहे अशाकडून आपणाला मोक्षाचा उपदेश कसा बरें केला जाईल? म्हणून आमचें हें कथन औपचारिकच आहे. हे भगवन् तपश्चरणानें घातिकर्मांच्या प्रकृतींचा नाश करून व केवलज्ञानाची प्राप्ती करून घेऊन भवभ्रमणाच्या भयानें त्रस्त झालेल्या भव्यजीवांना मोक्षोपाय दाखवून द्या. याप्रमाणें विनंती करून देवगण निघून गेला. महावीरस्वामींनीं अवधिज्ञानानें आपल्या आयुकर्मांचीहि स्थिति जाणली व दीक्षा घेण्याचा निश्चय केला. मातापितरांनीं त्यांची मनोवृत्ति प्रथमपासूनच ओळखली होती. विवाहासाठीं त्यांना अनेक वेळां आग्रह करण्यांत आला, पण तो त्यांनीं जुमानला नाहीं. (श्वेतांबर ग्रंथानुसार त्यांनीं विवाह केला होता व त्यांना एक मुलगीहि झाली होती अशी मान्यता आहे.) तथापि विवाह नाहीं तर नाहीं, पण घर सोडून तपश्चर्येला महावीरस्वामी जाणार ही वार्ता ऐकून मात्र मातापितरांना फार दुःख झालें. हें दांपत्यहि धर्मज्ञ होतें पण मोहापुढें त्या धर्मज्ञानाचें कांहीं चालेना. महावीरस्वामींचें अनंतबल बाळपणींहि दृग्गोचर झालें असूनहि खडतर तपश्चर्येचे त्रास तुझ्याकडून कसे सहन केले जाणार म्हणून त्रिशलादेवी त्यांना विचारूं लागली. येथें झालें तरी तपश्चरण चाललें आहे; श्रावकांचीं बारा व्रतें घेतलींच आहेत. म्हणून आम्हाला दुःखांत टाकून तूं दीक्षा घेऊन घर सोडून जाऊं नकोस असें मातेचें म्हणणें होतें. पण महावीरस्वामींनीं तिला खालीलप्रमाणें उत्तर दिलें. 'पूज्य मातोश्री, संसार मृगजलाप्रमाणें आहे. मोहांधपणामुळें सांसारिक जीवांना सांसारिक वस्तु मूळ रूपाहून भिन्न दिसतात. ज्याला मोक्षप्राप्तीची इच्छा असेल त्यानें सांसारिक वस्तुसंबंधींचा अनुराग सोडून संन्यस्तवृत्ति धारण केली पाहिजे. दृश्य सांसारिक वस्तु पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें क्षणिक आहेत. रोग, शोक, परिताप हीं सतत मागें लागलेलींच आहेत. शारीरिक बलाला व सौंदर्याला तीं क्षीण करतात, मग विषयिक सुख तरी कोठून मिळणार! मृत्यू तर क्षणोक्षणीं मागें लागलेलाच असतो. वेळ भरतांच तो झडप घालतो. मृत्युनंतर जीवाबरोबर त्याच्या कर्मांशिवाय दुसरें कांहीं जात नाहीं. अशा स्थितींत माते, अरण्यांत जाऊन आत्मध्यानांत लीन होणेंच माझें मुख्य कर्तव्य

नाहीं काय ? ' महावीरस्वामींच्या या उत्तरावर त्रिशलादेवी कांहीं बोलूं शकली नाहीं; पण तिचा पुत्रमोह कांहीं दूर झाला नव्हता. श्वेताम्बर ग्रंथांतून तर म्हटलें आहे कीं, आईच्याखातर आणखी दान वर्षे दीक्षा घेण्याचें महावीरस्वामींनीं पुढें ढकललें. पण नंतर तरी मन घट्ट करून त्रिशलादेवीला दीक्षेची अनुज्ञा महावीरस्वामींना द्यावीच लागली. आप्तेष्टमित्रांचा निरोप घेऊन, सर्वस्वाचा त्याग करून कुंडग्राम सोडून महावीरस्वामी निघाले. नंतर देवांनीं आणलेल्या रत्नखचित पालखीमध्यें प्रभु विराजमान झाले व नागखंडवनांत जाऊन उतरले. तेथें उत्तरेकडे तोंड करून एका स्फटिकशीलेवर बसले. अनंतसिद्धांना नमस्कार करून त्यांनीं अंगावरील वस्त्रालंकार काढून दान केले. मार्गशीर्ष कृष्ण १० ला त्यांनीं परमकल्याणकारी निर्ग्रंथदीक्षा धारण केली. पांच मुठी केशलोच केला. इंद्रानें प्रभूचे केस रत्नपात्रांत घेऊन क्षीरसमुद्रांत नेऊन टाकले. सर्व देवांसमवेत इंद्रानें प्रभूच दीक्षाकल्याणक केले व ते सर्व देवलोकीं परत गेले.

महावीरकालीं नग्नावस्था ही साधूला आवश्यक मानली जात होती व तें यथायोग्यच आहे. नग्न होण्यापूर्वी कामेच्छा तर पूर्णपणें जिंकावी लागतेच, पण त्याशिवाय देहावरील ममताहि सोडावी लागते व लज्जेचा आणि मानापमानाचा त्याग करावा लागतो. म्हणून नग्नावस्था ही साधूची एक मोठी कसोटीच आहे यांत शंका नाहीं. दिगम्बरजैनशास्त्राप्रमाणें श्वेतांम्बर व इतर हिंदुशास्त्रांनाहि नग्नावस्था ( दिगम्बरावस्था ) श्रेष्ठ असल्याचें मान्य आहेच; पण ती इतर धर्मशास्त्रांनाहि मान्य आहे. बायबलमध्यें सॅम्युयल १९–२४ मध्यें म्हटलें आहे, ' ज्यानें आपलीं वस्त्रें फेंकून दिलीं व दिवसभर तो नग्न राहिला व नंतर त्यानें विचारलें कीं काय ? हा आत्मा पैगम्बरापैकींच आहे ? " इसाया २०–२ मध्यें म्हटलें आहे, ' प्रभूनें अमोजचा पुत्र इसा याला म्हटलें, पादत्राण व वस्त्रें काढून ठेऊन ये. तसें त्यानें केलें व नग्नपणें विचरूं लागला. ' महंमदापूर्वी काबाची प्रदक्षिणा स्त्रीपुरुषांना नग्न होऊन करावी लागत असे; तेव्हां अरबांनाहि नग्नावस्थेचें महत्त्व माहीत होतें असें दिसतें. स्वर्गाचें राज्य बालकांचें आहे असें बायबलांत म्हटलें आहे. ज्याला परमार्थ साधावयाचा आहे त्यानें बालकाप्रमाणेंच निर्विकार, निर्मोह, निर्लज्ज व निरामय बनलें पाहिजे हें स्पष्ट आहे. बौद्धग्रंथांतही दिगम्बरत्वाची स्तुतीच केलेली आहे. दिगंबर होणें मूल, मूर्ख व साधु या तिघांशिवाय कोणालाहि शक्य नाहीं. मनुष्यमात्राला जोंपर्यंत विकार आहेत

तोंपर्यंत त्याला शरम आहेच. झांकून बेशरमपणें तो कसाहि वागत असेल; पण उघडपणें तसें त्याला वागवणार नाहीं. पण पापाचरणांत लाज असावी; पुण्याचरणांत ती कशाला ? दिगंबरत्व धारण करावयाचें आहे तें पुण्याचरणासाठीं किंवा, पापक्षालनासाठींच. अर्थात् सर्व पापी विचारांचा त्याग केल्याशिवाय दिगम्बरत्व धारण करण्याचें धैर्यच होणार नाहीं. महावीरस्वामींनीं घर सोडल्याबरोबर दिगंबरदीक्षा घेतली. कारण सर्व पापी विचारांचा त्यांनीं कधींच त्याग केला होता.

दीक्षा घेतल्यानंतर लौकरच प्रभूंना बुद्धि, विक्रिया, तप, बल, औषध, रस व क्षेत्र अशा सात ऋद्धि प्राप्त झाल्या व मनःपर्यय ज्ञानहि प्राप्त झालें. आतां भगवान महावीर दिगंबरमुनींचीं कठिण व्रतें आचरूं लागले व परीषह सहन करूं लागले. सहा सहा महिन्यांपर्यंतचे उपवास त्यांनीं आदरले व पार पाडले. कौल्यिनामक क्षत्रिय जातीचा उल्लेख ग्रंथांतून सांपडतो. दिर्घनिकाय नांवाच्या बौद्धग्रंथांतील कौल्यिजातीचे क्षत्रिय रामगांवांत बरेच होते असें महापरिनिव्वानसुत्तन्तांत म्हटलेलें आहे. या जातीची राजधानी कुलपुर असावी. येथें आहार घेऊन महावीरस्वामी दशपुराला गेले होते. तेथेंहि दूधभाताच्या भिक्षेचा त्यांनीं स्वीकार केला. तेथून ते वनांत गेले व बारा प्रकारचीं तपें आचरूं लागले. पांच महाव्रतें, पांच समिति, तीन गुप्ती व चौऱ्याशीं हजार उत्तरगुण त्यांनीं दीक्षा घेतल्याबरोबर धारण केले होते. पुढें ते उज्जयिनी नगरीला गेले होते. त्या नगरीजवळील अतिमुक्तक स्मशानांत ते ध्यानस्थ बसले असतां भवनामक रुद्रानें त्याना बरेच उपसर्ग केले; पण वीरप्रभूंनीं आपलें शुक्लध्यान मुळींच ढळूं दिलें नाहीं. तेव्हां भवरुद्रानें त्यांची अतिवीर म्हणून स्तुति केली. उज्जयिनींहून प्रभू कौशंबीला गेले. तेथें चंदनबालेनें घातलेल्या भिक्षेनें त्यांनीं सहा महिन्यांच्या उपवासाचें पारणें केलें. नंतर त्यांनीं मौनव्रत धारण करून आपली बारा वर्षांची तपश्चर्या पुरी केली. एकदां कुमारगांवाजवळ ते कायोत्सर्ग करून ध्यानस्थ उभे असतां जवळच्या शेतांतील शेतकऱ्यानें बैल सोडले व तो कांहीं कामासाठीं जवळच्या खेड्यांत गेला. तेथून बैल चरत चरत भलतीकडेच गेले. शेतकरी परत येऊन पाहतो तों तेथें बैल नाहींत. तेव्हां त्याला अतिशय संताप चढला व महावीरस्वामींना तो त्या बाबतींत विचारूं लागला. त्यांनीं मौनधारण केलें असल्यामुळें ते उत्तर देऊं शकले नाहींत. पण त्यामुळें

शेतकऱ्याला त्यांचाच संशय आला व त्याचा राग दुणावला. नंतर गांवांत जाऊन हातोडा व खिळ्यासह दोन माणसांना घेऊन येऊन त्यानें महावीरस्वामींच्या दोन्हीं कानांत खिळे ठोकले तरी ते शुक्लध्यानापासून चळले नाहींत. अशी श्वेतांबरग्रंथांतून कथा आहे. दिगंबरग्रंथांतून अनेक उपसर्गांची हकीगत नाहीं. असले भयानक उपसर्ग होण्याइतकी महावीरस्वामींचीं पूर्वकर्में बलवत्तर नव्हतीं असें म्हणतात. पण असे उपसर्ग त्यांना झाले म्हणून मानले तरी कांहीं कमी-पणा येत नाहीं किंवा शास्त्रमर्यादाहि सुटत नाहीं. त्या शेतकऱ्याचें हें कठोर कार्य संपतें न संपतें तोंच त्याचे बैल चरत चरत तेथेंच परत आले. तेव्हां त्या शेतकऱ्याला आपल्या नीच कृत्याबद्दल फार पश्चात्ताप झाला, पण त्याचा आतां काय उपयोग? पुढील गांवीं गेल्यानंतर लोकांनीं त्यांच्या कानांतून ते खिळे काढविले. तेव्हांच्या असह्य वेदना प्रभूंनीं सहन केल्या व आर्तध्यान केलें नाहीं. शेतकऱ्याचें खिळे ठोकण्याचें काम चालू असतां इंद्रानें येऊन त्याचें पारिपत्य करण्याची इच्छा दर्शविली; पण प्रभूंनीं त्याबद्दल नकार दर्शविला. स्वावलंब-नानेंच तपश्चर्या पुरी करावयाची असा त्यांचा निर्धार होता. एकदां ते एका नदीजवळून चालले असतां तेथें एक विषारी सर्प त्यांना आढळला. त्याच्या फूत्कारानेंच विषबाधा होत असे म्हणून त्या बाजूला न जाण्याबद्दल गांवकऱ्यांनीं प्रभूंना सांगितलें होतें. पण महावीरस्वामी सरळपणें गेले तों त्या सर्पाजवळच आले. त्यानें एकदम दंश केला व प्रभूंच्या पायांतून दुधासारखें रक्त स्रवूं लागलें. पुढें त्या महासर्पाला जातिस्मरण झालें व मरून तो उत्तम गतीला गेला.

याप्रमाणें अनेक उपसर्ग श्वेतांबर ग्रंथांतून वर्णिलेले आहेत. त्यांवरून महावीर स्वामींनीं किती खडतर तपश्चर्या केली हें दिसून येतें. असे अनेक अनुकूल व प्रतिकूल उपसर्ग झाले तरी त्यांचें शुक्लज्ञान चळलें नाहीं हेंच विशेष होय. जसे रौद्रभयानक असे प्रतिकूल उपसर्ग झाले तसे सुंदर युवतींचें गाणें, नाचणें व इतर शृंगार. चेष्टादिक अनुकूल उपसर्गहि झाले. पण कोणत्याहि उपसर्गाची बाधा महावीरस्वामींना होऊं शकली नाहीं. पावसाळ्याचे चार महिने सोडून आठ महिने प्रभु विहार करीत असत. पहिल्या वर्षाचा चातु-र्मास त्यानीं अस्थिकग्रामांत केला होता. दोन चम्पापुरींत व एक पृष्ट चम्पापुरींत केला होता. बाकीचे आठ वैशाली व वाणिक ग्रामांत केले होते.

बारा वर्षे खडतर तपश्चर्या केल्यानंतर सर्व पूर्वकर्मांचा नाश झाला व नवीन

कर्मबंधाचीं द्वारेंहि बंद झालीं. तेव्हां महावीरस्वामींना केवलज्ञानाची प्राप्ति झाली. एकदां ते ऋजुकलानदीचे कांठीं सालवृक्षाखालील शीलेवर बसले असतां वैशाख शु० ॥ १० स अपराण्हकालीं प्रभूच्या घातिकर्मांचा नाश होऊन त्यांना केवलज्ञान प्राप्त झालें. लगेच इंद्रादि देवांनीं येऊन यथास्थित लोकालोकाला एकसमयावच्छेदेंकरून प्रकाशित करणाऱ्या, इंद्रियांची अपेक्षा नसलेल्या, तीर्थकराच्या दहा विशेष गुणांसहित असलेल्या महावीरप्रभूंना वंदन केलें व समवशरणाची रचना करून दिली. प्रत्येक तीर्थंकराचें जसें दिव्य शरीर बनतें तसें महावीरप्रभूंचेंहि बनलें. त्यांचें मौन संपलें व जिनवाणी स्रवूं लागली. त्यांना अनंतज्ञान, अनंतदर्शन, क्षायिक सम्यक्त, क्षायिक चारित्र, अनंतदान, अनंतलाभ, अनंतभोग, अनंत उपभोग व अनंत वीर्य अशा नऊ लब्धि प्राप्त झाल्या. प्राकार, चैत्यवृक्ष, ध्वजा, वनदेवी, स्तूप, स्तंभ, तोरणसहित मानस्तंभ या वस्तु समवसरणांत असतात व ते तीर्थंकरदेहाच्या बारापट उंच असतें. महावीरप्रभु केवलज्ञानी झाल्यामुळें त्यांच्या ज्ञाननेत्राला सर्व लोकालोकांतील चराचर वस्तु दिसूं लागल्या. ते सर्वज्ञ झाले; त्रिलोकवंदनीय बनले. ज्ञानावरणादि चार घातीकर्मांचा क्षय झाल्यामुळें ते सयोगकेवली झाले. त्यांची ज्ञानधारा एक क्षणहि मंद होणें यापुढें शक्य नव्हतें. ही अवस्था प्राप्त करून घेतल्यानंतरचेंच जीवन खरोखर सुखानंदकारी होय. तें दिव्य होय; परमोत्कृष्ट होय. जेव्हां प्रभूंना केवलज्ञानप्राप्ति झाली तेव्हां लोकालोकांत अलौकिक घटना घडूं लागल्या. आसमंतातील दुर्भिक्ष दूर झालें. भव्यजीवांची वृद्धि झाली. डॉ. विमलचरण लॉ. एम्. ए यांनीं या बाबतीत असें लिहिलें आहे कीं, ' भगवान महावीर सर्वज्ञ, सर्वदर्शी व अनंत केवलज्ञानी म्हणजे सर्वकाळीं, सर्व अवस्थांमध्यें व सर्व वस्तूंचें ज्ञान असणारे होते. कोणाची वृत्ति कशी आहे हें ते बरोबर जाणत होते. ते परमविद्वान् होते व शिष्यांचे पूर्वभव सांगत असत. ' केवलज्ञानाची व्याख्या याहून अधिक करणें शक्यहि नाहीं. कारण तीहि इंद्रियगोचर स्थिति नाहीं. इंद्रियांच्या अपेक्षेवांचून होणारें ज्ञान तें केवलज्ञान. मग त्या अवस्थेचें वर्णन इंद्रियें काय करणार ! अनंतज्ञान झालेल्या सर्वज्ञांना सृष्टीचें कोडें सुटलेलें असतें. त्यांना अनंतसुख व अनंतवीर्यहि असतें. त्यांच्या भाग्याला काय उणें ! महावीरप्रभूंनीं खडतर तपश्चर्येनंतर अशी स्थिति प्राप्त करून घेतली कीं, जीमुळें संसारांत पुन्हां येणें त्यांना जरूर राहिलें नाहीं. आत्म्याची जी स्वाभाविक परमोच्चस्थिति ती त्यांना प्राप्त झाली. आतां ते कृत्रिमता

कशाला धारण करतील ? हीच स्थिति प्रत्येक आत्म्याला प्राप्त करून घ्यावयाची आहे, म्हणून सर्व भव्यजीवांना ती शक्य तितक्या लवकर प्राप्त होवो असेंच कोणीहि इच्छील.

---

# प्रकरण आठवें.

## महावीरशासन

श्रीमत्परमगंभीरस्याद्वादामोघलांछनम् ।
जीयात त्रिलोकनाथस्य शासनं जिन-शासनम् ॥

केवलज्ञानप्राप्ती झाल्यानंतर प्रभु महावीरांनीं दिव्यवाणीनें त्रिकालाबाधित तत्वज्ञानाचा उपदेश भव्यजीवांना करण्यास सुरवात केली. त्या दिव्यवाणीचा अर्थ मानवी भाषेंत करून गौतमादि गणधरांनीं सांगितला. त्याचा सारांश खालील-प्रमाणें आहे. या विश्वात मूल षट् द्रव्यें आहेत तीं येणेंप्रमाणें—जीव, अजीव, धर्म, अधर्म, आकाश व काल. 'अवस्थान्तरं द्रवतीति – गच्छतीति द्रव्यम्'। ज्याचें रूपांतर होत असतें तें द्रव्य. 'उत्पादव्ययध्रौव्ययुक्तं स द्रव्यलक्षणम्' उत्पाद म्हणजे उत्पत्ति, ध्रौव्य म्हणजे स्थिति व व्यय म्हणजे नाश असें उत्पत्तिस्थितिलय हें द्रव्याचें लक्षण आहे. 'जीवो उवगो गमओ अमुत्ति कत्ता सदेह परिमाणो । भुत्ता संसारत्थो सिद्धो सो विस्स सोड्ढगई ॥' जीव, (आत्म-तत्त्व) चैतन्यस्वरूप, अदृश्य, कर्मांचा स्वतंत्र कर्ता व भोक्ता, स्वदेहपरिमित, संसारी, मुक्त होण्यास लायक व नेहमीं ऊर्ध्वगति असतो. 'सुखदु:खज्ञानं वा हितपरिकर्मचाहितभीरुत्वम् । यस्य न विद्यते नित्यं तं श्रमणा वदन्त्यजीवम्' ॥ सुखदु:खाचें ज्ञान किंवा हिताविषयीं प्रवृत्ति व अहितापासून भीति जेथें कधींच संभवत नाहीं त्यास अजीव द्रव्य म्हणतात. यास पुद्गलहि म्हणतात. 'स्पर्शरस गन्धवर्णवन्त: पुद्गला:' स्पर्श, रस, गंध व वर्ण ज्याला आहे तें पुद्गल द्रव्य होय. जीव व अजीव द्रव्यांना गमन करण्यास जें सहाय्य करतें तें धर्म द्रव्य होय. त्याची व्याख्या अशी आहे. 'उदयं जहमच्छाणं गमणाणुग्गहयरं हवइलोए ।

तह्जीव पुग्गलाणं धम्मं दव्वं वियाणेहि ॥' माशास जसें पाणी गमनाला साहाय्य-भूत होतें पण प्रेरक नसतें तसें धर्मद्रव्य जीव व अजीव द्रव्यांस गमनास उदासीनपणें साहाय्य करतें, प्रेरक नसतें. अधर्म द्रव्याची व्याख्या खालीलप्रमाणें आहे. 'द्रव्याणां पुद्गलादीनामधर्मस्थितिकारणम् । छायेव धर्मतप्तानामश्वादीनामिवाक्षितिः ॥' घामेजलेल्या व उन्हाच्या तापानें पोळलेल्या जीवांच्या स्थितीस ज्याप्रमाणें सावली कारणीभूत होते त्याप्रमाणें अधर्म द्रव्य, जीव व अजीव द्रव्यांच्या स्थितीला उदासीनपणें कारणीभूत होते. त्यांच्या गतीला प्रत्यक्ष अडथळा करीत नाहीं. 'अवगासदाणजोग्गं जीवादीणं वियाण आयासं । जेण्हं लोगागासं अल्लोगागासमिदि दुविहं ॥' जीव व अजीव द्रव्यांना अवकाश देण्यास जें योग्य आहे तें आकाश द्रव्य होय. लोकाकाश व अलोकाकाश असे त्याचे दोन भेद आहेत. पांची द्रव्यांना अवकाश देणारें तें लोकाकाश व त्याचे पलिकडे असलेलें अलोकाकाश. पहिलें परिमित आहे तर दुसरें अनंत आहे. 'दव्वपरिवट्टरूवो जो सो कालो इवेह ववहारो । परिणामादि लक्खो वट्टण लक्खोय परमट्ठो ॥' जें द्रव्य जीवादि द्रव्यांचें परिणमन करण्यास सहाय्यभूत होतें तें कालद्रव्य होय. द्रव्याचे पर्याय पालटण्यास कारणीभूत होणारा समय तो व्यवहार काल व त्यांच्या वर्तनाला किंवा क्रियेला जो आधार तो परमार्थकाल होय. वेळेंतील तारतम्यास परिणमन म्हणतात, व पर्यायांच्या अस्तित्वाच्या अनुभवास वर्तना म्हणतात.

जीव, अजीव, पुण्य, पाप, आस्रव, संवर, बंध, निर्जरा व मोक्ष असे नऊ पदार्थ आहेत. जीव म्हणजे आत्मतत्त्व व अजीव म्हणजे जडतत्व. शुभास्रव म्हणजे पुण्य व अशुभास्रव म्हणजे पाप असे आस्रवाचेच दोन भेद असल्यामुळें हे दोन निराळे पदार्थ मानलेले नाहींत. गुणभद्राचार्यांनीं म्हटलें आहे 'परिणाममेव कारणमाहुः खलु पुण्यपापयोः प्रज्ञाः ॥ कायवाङ्मनः कर्मयोगः स आस्रवः । कायावाचामनेंकरून जीं कर्मे घडतात तो आस्रवयोग म्हणजे बद्ध आत्मतत्वांत ज्यामुळें बरेंवाईट परिस्पंदन किंवा स्फुरण होतें तो. 'आत्मप्रदेशपरिस्पन्दो योगः' 'शुभाशुभकर्मागमद्वाररूपः आस्रवः' कर्मपुद्गलांच्या आगमनास अनुकूल अशी जीवाची क्रिया म्हणजे आस्रव होय. 'आसमन्तात् स्रवतीति – आगच्छतीति – आस्रवः' असें वचन आहे; तेव्हां आस्रव म्हणजे शुभाशुभ कर्मांचें द्वार होय. 'आस्रवनिरोध लक्षणः संवरः' कर्मपुद्गलांच्या प्रवेशाचा निरोध करणें

म्हणजे संवर होय. तो तीन गुप्ति व पांच समिति पाळल्यानें प्राप्त होतो. ‘ या संसारकारणादात्मनो गोपनं भवति स गुप्तिः ’ जिच्यामुळें संसारपरिभ्रमणापासून जीवाचें रक्षण होतें ती गुप्ति. ‘ सम्यक् योगनिग्रहो गुप्तिः ’ मनोयोग, काययोग व वचनयोग यांचा सम्यक्‌निग्रह करणें म्हणजे गुप्ति होय. ‘ प्राणिपीडा परिहारार्थं सम्यगयनं समितिः ’ ईर्या भाषैषणादाननिक्षेपोत्सर्गाः समितयः’ ईर्या, भाषा, एषणा, आदाननिक्षेपण व उत्सर्ग अशा पांच समिति प्राणिपीडापरिहारार्थ सांगितलेल्या आहेत. नित्य व्यवहार करतांना हिंसा न व्हावी म्हणून जपणें, प्रिय वचन बोलणें, निर्दोष आहार घेणें, सावधपणें वावरणें व शुद्ध जंतुरहित भूमीवर मळमूत्र क्षेपन करणें या त्या पांच समिति होत. या समितिगुप्तीशिवाय खालील बारा तपें आचरिलीं असतां संवर घडतो. अनशन, ऊनोदर किंवा अवमोदर्य ( उण्यापोटीं जेवणें, ) वृत्तिपरिसंख्या ( आहारविहाराची संख्या व वेळा परिमित करणें, ) रसपरित्याग, विविक्तशय्यासन, कायक्लेश, प्रायश्चित, विनय, वैय्यावृत्य ( अतिथ्य, दान, सेवा वगैरे ), स्वाध्याय, व्युत्सर्ग ( देहममत्व सोडणें, ) व ध्यान हीं तीं बारा तपें होत. ‘ आत्मकर्मणोरन्योन्य प्रदेशानुप्रवेशात्मको बन्धः ’ आत्मपरिमाणु व कर्मपुद्गलांचे प्रदेश एकमेकांत बांधले जाणें याचें नांव बंध. ‘ सकषायत्वाज्जीवः कर्मणो योग्यान्पुद्गलानादत्ते सबन्धः ’ जीव कषाययुक्त होऊन कर्मपुद्गल ग्रहण करतो तेव्हां बंध घडतो. मिथ्यात्व, कषाय, अविरति, प्रमाद व योग हे पांच बंधाचे हेतु होत. ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, वेदनीय, मोहनीय, आयु, नाम, गोत्र व अंतराय अशीं आठ कर्में आहेत व त्यामुळें बंध होतो. प्रकृति, प्रदेश, स्थिति व अनुभाग असे बंधाचे चार प्रकार आहेत. ‘ एकदेशकर्मक्षयलक्षणा निर्जरा ’ कर्मांचा अंशतः नाश करणें याला निर्जरा म्हणतात. निर्जरा दोन प्रकारची आहे. अविपाक व सविपाक. कर्माचें फळ न भोगतां त्यांचा नाश करणें म्हणजे अविपाक व कर्मांचें फळ भोगून तें नाहींसें करणें म्हणजे सविपाक निर्जरा होय. ‘ कृत्स्नकर्मविप्रयोगलक्षणोमोक्षः ’ संपूर्ण कर्मांचा अत्यंताभाव म्हणजे मोक्ष होय. ‘ निरवशेषनिराकृतकर्मफलकलङ्कस्याशरीरस्यात्मनोचिन्त्यस्वाभाविकज्ञानादिगुणमव्याबाधसुखमात्यन्तिकमवस्थान्तरं मोक्षः ’ इति । परभाव नष्ट करून आत्मभाव प्राप्त करून घेणें म्हणजे मोक्ष होय.

‘ सम्यग्दर्शनज्ञानचरित्राणि मोक्षमार्गः ’ सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यक्‌चारित्र हीं तिन्ही मिळून मोक्षमार्ग होतो. या तिन्ही साधनांच्या समूहाला

रत्नत्रयी म्हणतात. आत्म्याशिवाय अन्य कोणत्याही द्रव्यांत रत्नत्रय असत नाहीं. म्हणून जीवासच मात्र रत्नत्रयाधिकारी म्हणतात. ' पदार्थानां याथात्म्यप्रतिपत्तिविषयश्रद्धानसंग्रहार्थं दर्शनस्य सम्यग्विशेषणम् ' पदार्थांचें यथार्थ स्वरूपज्ञान हाच श्रद्धेचा मुख्य विषय ही गोष्ट स्पष्ट करण्याकरितांच सम्यक् हें विशेषण दर्शनास लावलेलें आहे. ' तत्वार्थश्रद्धानं सम्यग्दर्शनम् ' सात तत्त्वांचें श्रद्धान होणें म्हणजे जाणीव होणें किंवा त्यावर श्रद्धा बसणें म्हणजे सम्यग्दर्शन होय. ' येनकेन प्रकारेण जीवादयः पदार्थाः व्यवस्थितास्तेन तेनावगमः सम्यग्ज्ञानम् ' जीवादि नऊ पदार्थांची व्यवस्था कशी आहे याची ओळख होणें म्हणजे ज्ञान होय. ' अनध्यवसायसंशयविपर्ययनिवृत्त्यर्थं सम्यग्विशेषणम् ' मूढता, संशय व विपरीतता या दोषांनीं युक्त ज्ञानाची निवृत्ति दाखविण्यासाठीं सम्यक् हें विशेषण आहे. अर्थात् शुद्धज्ञान असेल तरच ते मोक्षपदवी प्राप्त करून देईल अन्यथा नाहीं. ' संसारकारणनिवृत्तिं प्रत्यागुणस्य ज्ञानवतः कर्मादाननिमित्तक्रियोपरमः सम्यक्चारित्रम् ' संसाराच्या कारणापासून सुटका करून घेण्यास उद्युक्त झालेल्या ज्ञान्यास कर्मबंधास कारण होणाऱ्या ज्या क्रियांची निवृत्ति जरूर आहे त्या टाकून सत्क्रिया करणें याला सम्यक्चारित्र म्हणतात. ' अज्ञानपूर्वकाचरणनिवृत्त्यर्थं सम्यग्विशेषणम् ' अज्ञानजन्य वाटेल त्या कर्मांनीं मोक्ष मिळणार नाहीं, ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठीं सम्यक् हें विशेषण योजलेलें आहे. याप्रमाणें खऱ्या ज्ञानानें, योग्य दर्शनानें व शुद्ध चारित्रानेंच मोक्षप्राप्ति होते; वाटेल त्या ज्ञानानें, दर्शनानें व चारित्रानें होत नाहीं आणि या त्रयांपैकीं एकाच कोणत्यातरी साधनानेंहि मोक्षप्राप्ति होत नाहीं. वरील तिन्हींच्या एकीकरणानेंच मोक्षप्राप्ति होणें शक्य आहे. ज्ञान पांच प्रकारचें आहे. मति, श्रुत, अवधि, मनःपर्यय व केवल हे ते पांच प्रकार होत. मति म्हणजे बौद्धिक, श्रुत म्हणजे ऐकीव, अवधि म्हणजे परिमित बाबतींतील सर्व प्रकारचें ज्ञान, मनःपर्यय म्हणजे दुसऱ्याचें मनोगत ओळखण्याची शक्ति व केवलज्ञान म्हणजे संपूर्ण बाबतींतील सर्वज्ञता.

उत्तम क्षमा, उत्तम आर्जव, उत्तम मार्दव, उत्तम सत्य, उत्तम शौच, उत्तम संयम, उत्तम तप, उत्तम त्याग, उत्तम आकिंचन्य, व उत्तम ब्रह्मचर्य हे दशलाक्षणिक धर्म होत. आर्जव म्हणजे ऋजुता किंवा सरळपणा. मार्दव म्हणजे मृदुता व आकिंचन्य म्हणजे अपरिग्रहीतपणा. प्रत्येक गुणाचे मागें उत्तम हें विशेषण लावलें आहे हें सहेतुक आहे. ' इष्टप्रयोजनपरिवर्जनार्थमुत्तमविशेषम् ' म्हणजे

वरील व्रतें व्यावहारिक दृष्ट्या न पाळतां आत्मबल वाढविण्याच्याच दृष्टीनें तीं पाळलीं पाहिजेत असा उत्तम विशेषण लावण्यांतील हेतु आहे. दर्शनप्रातिमा, व्रतप्रातिमा, सामायिक, प्रोषधोपवास, सचित्तत्याग, रात्रीभोजनत्याग, ब्रह्मचर्य, आरंभत्याग, परिग्रहत्याग, अनुमतित्याग व उद्दिष्टविरति या श्रावकाच्या एकादश प्रतिमा होत. शुद्ध सम्यक्त्वसहित तीर्थंकरप्रतिमादर्शन, पंचपरमेष्ठिजप, आत्मनिष्ठा, व्यसनत्याग, मद्य व पंचौदुंबर न खाणें ही पहिली प्रतिमा होय. दिग्व्रत, अनर्थदंडविरति, भोगोपभोगपरिमाण, हीं तीन गुणव्रतें; देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास व वैयावृत्त्य हीं चार शिक्षाव्रतें आणि अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हीं पांच अणुव्रतें अतिचाररहितपणें पाळणें म्हणजे व्रतप्रतिमा होय. त्रिकाळ जिनेश्वरांचें ध्यान करणें म्हणजे सामायिकप्रतिमा होय. चतुर्दशी, अष्टमी वगैरे उपवास पाळणें म्हणजे प्रोषधोपवास प्रतिमा होय. अचित किंवा प्रासुक आहार म्हणजे अहिंसात्मक व साधा आहार घेणें व चैतन्यमय आहाराचा त्याग करणें ही सचित्तत्यागप्रतिमा होय. अनीतीस कारण असलेल्या सर्व कार्यारंभांचा त्याग म्हणजे आरंभत्यागप्रतिमा होय. कोणत्याहि सांसारिक कर्माला अनुमति देण्याचें सोडणें म्हणजे अनुमतित्यागप्रतिमा होय. एखादें उद्दिष्ट मनांत योजून कर्म करण्याचें सोडणें म्हणजे उद्दिष्टविरतिप्रतिमा होय. अकरावी प्रतिमा घेतलेला श्रावक मुनिदीक्षा घेण्यास लायक मानला जातो.

अहिंसादि पांच महाव्रतें, ईर्यादि पांच समिति, सामायिक, प्रतिक्रमण, प्रत्या, ध्यान, जिनगुणस्तवन, दिग्वंदना व देहभावनिरसन हें षडावश्यक पाळणें, पंचेंद्रियांचे विषय सोडणें, वस्त्रत्याग, केशलोच, एकभुक्तता, स्थितिभोजन, पाणिपात्रत्व, अस्नान, अदंतधावन, हे अट्ठावीस मूळगुण मुनीला पाळावे लागतात. दिगंबरमुद्राधारी साधूंनीं निर्जन ठिकाणीं लहान मुलाप्रमाणें विकाररहित व निर्हेतुकपणें विचरावें. क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, मशकादिकांचे दंश, नग्नता, अरति, स्त्री, चर्या, आसन, शयन, दुर्वचन, वध, याचना, अलाभ, रोग, तृणस्पर्श, मलसत्कारपुरस्कार, प्रज्ञा, अज्ञान व अदर्शन अशा बावीस बाबतींतील परिषह ( कष्टसहन ) पाळावेत. उन्हाळ्यात पर्वतशिखरीं, हिवाळ्यांत नदीचे काठीं, आणि पावसाळ्यांत झाडाखालीं राहून तपश्चरण करावें. सर्वदा धर्म व शुक्लध्यान आणि स्वाध्यायांत रत असावें. ध्यान म्हणजे चित्तविक्षेपत्याग किंवा एकाग्रता. ध्यान चार प्रकारचें आहे. आर्तध्यान म्हणजे

विरहदुःख, चिंता, प्रखर विषयाभिलाषा व तळमळ होय. रौद्रध्यान म्हणजे कषायतीव्रता. अर्थात् हिंसा, असत्य, स्तेय वगैरे पातकांची अभिरुचि; मत्सर, हेवा किंवा कोणाचेंहि बरें न पाहवणें. धर्मध्यान म्हणजे चांगल्या व शुद्ध-विषयांचें चिंतन आणि शुक्लध्यान म्हणजे आत्मध्यान किंवा आत्मरति. शेवटीं मुनीनें समाधिमरण साधावें. अशा मरणास संन्यसन् ( संन्यासमरण ) किंवा सल्लेखना म्हणतात. उपवास करून, कायोत्सर्ग राखून व आत्मध्यानीं मग्न होऊन अंतकालपर्यंत देह असून विदेहावस्थेंत राहणें म्हणजेच सल्लेखना होय. या संन्यसनव्रतानें किंवा समाधिमरणानें उत्तम गति प्राप्त होते.

अनित्य, अशरण, संसार, एकत्व, अन्यत्व, अशुचित्व, आस्रव, संवर, निर्जरा, लोक, बोधिदुर्लभ व धर्म या बारा अनुप्रेक्षा होत. अनुप्रेक्षा म्हणजे भावना चिंतवन, विचार किंवा निदिध्यास होय. देह व तद्विषयक व्यवहार अनित्य आहेत असा विचार करणें ही अनित्यानुप्रेक्षा होय. धर्माचरणाशिवाय आपणांस दुसरा खरा आसरा नाहीं हें जाणणें म्हणजे अशरणानुप्रेक्षा होय. जन्ममरणांच्या अनंत फेऱ्यांमुळें हा प्रपंच मागें लागलेला आहे व तो दुःखमय आहे असें चिंतणें ही संसारानुप्रेक्षा होय. आपण आलों एकटे, जाणार एकटे व आपल्या कर्मा-पुरतें आपण एकटेच जबाबदार आहोंत याचा विचार करणें म्हणजे एकत्वानुप्रेक्षा होय. आत्मा व देहादिक अगदीं भिन्न आहेत हें ओळखणें ही अन्यत्वानुप्रेक्षा होय. देहाच्या अमंगलतेचा व पातकांच्या अनिष्टपणाचा विचार करणें म्हणजे अशुचित्वानुप्रेक्षा होय. मिथ्यात्व, कषाय, अविरति, प्रमाद व योग या पांच बंधनकारक कारणांमुळें होणाऱ्या आस्रवास दुःखमूळ समजून, सद्विचार, सदा-चार व सदुच्चार राखण्यास झटणें ही आस्रवानुप्रेक्षा होय. नव्या बंधनांनीं आत्मा बद्ध न व्हावा म्हणून उपाय योजणें ही संवरानुप्रेक्षा होय. नवीन बंधनकारक कर्में घडत नसलीं तरी प्रारब्धकर्मांचें भोग भोगणें बाकी असतेच. त्यांचा नाश करण्याचा उपाय योजणें ही निर्जरानुप्रेक्षा होय. हें जग अनाद्यनंत आहे व तें स्वयंभू आहे वगैरे प्रकारचा या इहलोकासंबंधींचा विचार करणें यास लोकानुप्रेक्षा म्हणतात. रत्नत्रयीस बोधी म्हणतात. ही रत्नत्रयी जीवाचा स्वभाव असला तरी वैषयिक आकर्षणामुळें ती दुर्लभ झालेली असते. ती पुन्हां प्राप्त कशी होईल किंवा जीवात्म्यांत प्रगट होईल याचा विचार करणें म्हणजे बोधिदुर्लभानुप्रेक्षा होय. जिनेंद्रभगवानप्रणित दशलाक्षणिक व रत्नत्रयमय धर्मच आत्म्याचा

स्वाभाविक धर्म होय. त्याचेंच पालन केलें असतां आत्मकल्याण होईल असा विचार करणें ही धर्मानुप्रेक्षा होय. या बारा अनुप्रेक्षांचा प्रत्येक भव्यजीवानें विचार केला पाहिजे.

मोह व योग यांच्या कमी होण्यानें व नाशानें रत्नत्रयमय आत्म्याच्या शुद्धतेची जी तारतम्यरूप विशिष्ट अवस्था तिला गुणस्थान म्हणतात. हीं गुणस्थानें चौदा कल्पिलीं आहेत. पहिलें मिथ्यात्व गुणस्थान होय. ही मिथ्यात्वी जीवाची अवस्था होय. अशा जीवास हिताहित व बरेंवाईट उमजतच नाहीं. व त्यास सम्यक्त्वाची रुचीच नसते. दुसरें सासादन गुणस्थान होय. सम्यक्त्वापासून च्युत होऊन जेव्हां जीव मिथ्यात्व गुणस्थानास जाण्यास प्रवृत्त होतो तेव्हां त्या अवस्थेस सासादन म्हणतात. ज्या गुणस्थानावरील जीवास सम्यक्त्वी व मिथ्यात्वी असे दोन्ही तऱ्हेचे परिणाम होतात त्यास मिश्र म्हणतात. चवथें गुणस्थान असंयत किंवा अविरतसम्यग्दृष्टि होय. या अवस्थेच्या जीवास सम्यक्त्वाची प्राप्ति झालेली असते, पण त्याच्याकडून व्रताचरण होत नसतें. पांचवें संयतासंयत किंवा देशविरत गुणस्थान होय. या अवस्थेंतील जीवास सम्यक्त्वप्राप्ति झालेली असते व श्रावकाचीं व्रतेंहि तो पाळतो. सहावें गुणस्थान प्रमत्तसंयत किंवा विरत होय. या अवस्थेंतील जीव मुनिव्रतें पाळीत असतो; पण त्याचे हातून क्वचित् प्रमाद घडत असतात. सातवें अप्रमत्तविरत किंवा संयत गुणस्थान होय. या गुणस्थानावरील मुनींचे हातून प्रमाद घडत नाहींत. आठवें अपूर्वकरण गुणस्थान होय. या स्थानावरील मुनींच्या कर्मबंधांचा नाश झपाट्यानें होत असतो. अशी स्थिती त्यानें पूर्वी कधींही अनुभवलेली नसते. नववें गुणस्थान अनिवृत्तिबादरसांपराय किंवा अनिवृत्तिकरण होय. या स्थानावरील जीव प्रतिक्षणीं झपाट्यानें शुद्ध होत जातो. दाहवें सूक्ष्मसांपराय गुणस्थान होय. या स्थानावरील जीवाचे कषाय सूक्ष्म झालेले असतात. अकरावें उपशांतमोह किंवा उपशांतकषायवीतरागछद्मस्थगुणस्थान होय. या स्थानावरील जीवास मोहनीय कर्माच्या उदयामुळें पुन्हां पतितावस्था प्राप्त होण्याचा संभव असतो, तो सहाव्या किंवा सातव्या गुणस्थानावर पुन्हां जातो. बारावें क्षीणमोह किंवा क्षीणकषायवीतरागछद्मस्थगुणस्थान होय. या अवस्थेंतील जीवाचीं ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय अशीं चार कर्में समूळ नाश

पावलेलीं असतात. त्याची चित्तवृत्ति स्फटीक मण्याच्या पात्रांतील पाण्या-प्रमाणें अत्यंत निर्मळ व स्थिर असते. तेरावें सयोगकेवली गुणस्थान होय. काययोगाशिवाय इतर सर्व योग नाहींसे झाल्यामुळें नवा कर्मबंध नसतो व प्रारब्धकर्माचाहि समूळ नाश झालेला असतो. ही स्थिति जीवनमुक्ताची होय. चौदावें गुणस्थान अयोगकेवली होय. हें गुणस्थान प्राप्त झालें कीं, पांच निमिषांतच काययोगहि नाहींसा होऊन मोक्षप्राप्ति होते. चौदा गुणस्थानें ओलांडून गेलेला ( जीव ) तीन लोकांच्या अग्रभागीं सिद्धशीला म्हणून स्थान आहे तेथें जातो व फिरून परत येत नाहीं. या सिध्दात्म्यास सम्यक्त्व, अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य, सूक्ष्मत्व, अवगाहनत्व, अगुरुलघुत्व व अव्याबाधत्व असे हे आठ गुण प्राप्त होतात. याप्रमाणें क्रमाक्रमानें चौदा गुणस्थानांवरून आत्मा उर्ध्वगमन करतो.

जिनशासनाच्या न्यायपद्धतीला स्याद्वाद म्हणतात. या पद्धतीमुळें कोणत्याहि वस्तूचें योग्य स्वरूप अविच्छन्नपणें, स्पष्टपणें व अबाधितपणें दिसून येतें. या पद्धतीनें केलेली व्याख्या घोटाळा उत्पन्न करीत नाहीं; कारण या पद्धतीमध्यें प्रत्येक वस्तूचा विचार सर्व दृष्टीनें–स्वकीय व परकीय–केला जातो. बाराव्या शतकाचे शेवटीं झालेले हेमचंद्रसूरी यांनीं आपल्या अन्ययोगव्यवच्छेदिकेंत म्हटलें आहे कीं, ' हे भगवन् , पर्यायापेक्षेनें विचार न करतां केवळ एखाद्या वस्तूचा समग्रपणें विचार करूं लागलों तर ती वस्तूच मूळ द्रव्य आहे असें वाटतें. अन्वयापेक्षेनें विचार करावयाचें सोडून एखाद्या पर्यायाचाच विचार करूं लागल्यासहि तो पर्याय मूळ द्रव्य होय असें वाटतें; परंतु सकल व विकल या अपेक्षाभेदानें सात तऱ्हेनें विचार करण्याची विद्वन्मान्य पद्धत हे प्रभो, तूंच मात्र दाखवून दिली आहेस. ' प्रत्येक द्रव्य अनंतधर्मसमुदायात्मक असल्यामुळें तें अमुक एकाच प्रकारचें आहे असें म्हणणें अयुक्तिक होय. त्या द्रव्याच्या अनेक प्रकारांपैकीं हा एक प्रकार आहे इतकेंच म्हणतां येईल. ही गोष्ट दाखविण्याकरितांच ' स्यात् ' या शब्दाची योजना आहे. स्यात् म्हणजे कथंचित् किंवा एका दृष्टीनें हा स्याद्वाद सात वाक्यांनीं केला जातो म्हणून त्यास सप्तभंगीनय असेंहि म्हणतात. ' एकत्रवस्तुनि एकैक धर्मपर्यनुयोगवशात् अविरोधेन व्यस्तयोः समस्तयोश्चविधिनिषेधयोः कल्पनयास्यात्कारांकितः सप्तधा वाक्प्रयोगः सप्तभंगी '. एखाद्या वस्तूबद्दल परस्परविरोध न

येतां एका दृष्टीनें व सर्व दृष्ट्या एकेक गुणधर्माचा सात तऱ्हेनें केलेला काल्पनिक विधिनिषेध म्हणजे सप्तभंगी होय. कोणत्याहि वस्तूचा विचार अपेक्षेनें करावयाचा असतो. द्रव्य, क्षेत्र, काल व भाव या त्या चार अपेक्षा होत. ही चर्चा करतांना पुन्हां स्वकीय चतुष्टय व परकीय चातुष्टय अशा दोन दृष्टीनें विचार करावा लागतो. सप्तभंगीचा स्यादस्ति हा पहिला प्रकार होय. हें अस्तित्व स्वकीय चतुष्टयाच्या अपेक्षेनें ठरविण्यांत येतें. स्यान्नास्ति हा दुसरा प्रकार होय. हें नास्तित्व वरील वस्तूचेंच पण परकीय चतुष्टयाच्या अपेक्षेनें ठरविण्यांत येतें. तिसरा प्रकार स्यादस्ति च नास्ति च होय. स्वचतुष्टयानुसार आहे पण परचतुष्टयानुसार नाहीं असा एकसमयावच्छेदेंकरून निकाल या प्रकारांत ठरविण्यांत येतो 'स्यादवक्तव्यम्' हा चौथा प्रकार होय. एकदम स्वकीय व परकीय चतुष्टयानुसार एकच उत्तर देणें अशक्य होय असें हा प्रकार दाखवितो. स्यादस्तिचावक्तव्यम् हा पांचवा प्रकार होय. स्वकीय चतुष्टयानुसार वस्तु आहे पण स्वकीयपरकीयचतुष्टयानुसार सांगणें अशक्य आहे ही गोष्ट हा प्रकार दाखवितो. साहवा प्रकार स्यान्नास्तिचावक्तव्यम् हा होय. परकीय चतुष्टयानुसार नाहीं व स्वकीय चतुष्टयानुसार सांगणें अशक्य ही गोष्ट हा प्रकार दाखवितो. स्यादस्तिनास्तिचावक्तव्यम् हा सातवा प्रकार होय. स्वकीय व परकीय चतुष्टयानुसार क्रमानें अस्तित्व व नास्तित्व सांगणें व एकदम तीं दोन्ही सांगणें अशक्य आहे ही गोष्ट हा प्रकार दाखवितो. अनेके अन्ताः धर्माः यस्मिन् भावे सः अयं अनेकान्तः । ज्यामध्यें अनेक धर्मांचा उल्लेख केला जातो त्यास अनेकान्त म्हणतात, म्हणून स्याद्वादास अनेकांतवाद असेंहि नांव आहे.

नय व प्रमाण या दोन अपेक्षेनेंहि प्रत्येक वस्तूबद्दल चर्चा करतां येते. प्रमाणापेक्षा म्हणजे सकलादेश व नयापेक्षा म्हणजे विकलादेश. एखाद्या वस्तूबद्दल एकदम अभेद दृष्टीनें म्हणजे अनेक गुणधर्मांकडे किंवा पर्यायांकडे लक्ष न देतां विचार करणें म्हणजे सकलादेश किंवा प्रमाणापेक्षा होय, व एखाद्या वस्तूच्या एकेक पर्यायाचा व गुणाचा अनुक्रमानें विचार करणें म्हणजे विकलादेश किंवा नयापेक्षा होय. एखाद्या वस्तूच्या कोणत्याहि पर्यायाचा किंवा गुणाचा निश्चय ज्यामुळें होतो त्यास नय म्हणतात. नैगम, संग्रह, व्यवहार, ऋजुसूत्र, शब्द, समभिरूढ व एवंभूत असे सात नय आहेत. अभेदभावाचें ज्ञान करून देणारा किंवा सामान्य धर्म निराळा व विशेष धर्म निराळा आहे असें ज्यामुळें कळतें तो

नैगमनय होय. अस्तित्व भावनेस न सोडतां हें जग आपापल्या भावनेनुसार चाललें आहे; पण अस्तित्वभावच मुख्य धरून सर्व जगाकडे एकाच दृष्टीनें पाहण्यास संग्रहनय शिकवितो. त्याच सत्तेस प्रत्येक वस्तूमध्यें भिन्नाभिन्न रूपानें पाहून वागण्यास व्यवहार-नय शिकवितो. या भिन्न भिन्न वस्तूंच्या तात्कालिक स्वरूपाकडेच तेवढें ऋजुसूत्रनय लक्ष देतो. लिंग, संख्या वगैरे भेद शब्दनय दाखवितो. या भिन्न भिन्न वस्तूकडे संज्ञेच्या दृष्टीनें पाहण्यास समभिरूढनय शिकवितो. वस्तु एकाच शब्दानें नेहमीं वाच्य होत नसते. अवस्थांतरानुसार नांवेंहि बदलतात ही गोष्ट एवंभूतनय दाखवितो. या सात नयांचा योग्य उपयोग केल्यास सम्यग्ज्ञान होतें; पण विपरीत उपयोगानें मिथ्यात्व उत्पन्न होतें. नैयायिक व वैशेषिकांनीं नैगमनयाचा, सांख्य व अद्वैत्यांनीं संग्रहनयाचा, चार्वाकांनीं व्यवहारनयाचा, बौद्धांनीं ऋजुसूत्रनयाचा आणि शब्द, समभिरूढ व एवंभूत नयांचा वैय्याकरणी वगैरेंनीं दुरुपयोग किंवा एकांतिक उपयोग करून मिथ्यात्व वाढविलें आहे व तत्त्वज्ञानांत घोटाळा माजविला आहे. या एकांतिक उपयोगास नयाभास म्हणतात. कारण ते कांहीं अंशांनीं कबूली देऊन इतर अंशांचा पूर्ण निषेध करतात. पण नयाचा उपयोग एखादा अंश ग्रहण करून बाकीच्या अंशाबद्दल उदासीन राहूनच करावयाचा असला तरी ते इतर अंश विचारांत घ्यावे लागतात.

याप्रमाणें हें वीरशासन आहे. तें येथवर थोडक्यांत सांगितलें आहे. प्रारंभींच्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें जिनशासन गभीर आहे व स्याद्वाद हाच त्याचा विशेष आहे. त्रैलोक्यनाथ महावीराच्या या शासनाचा नेहमीं विजयच होणार. कारण तें सार्वगिक, परिपूर्ण व शुद्ध आहे.

---

## प्रकरण नववें.

# एकादश गणधर व क्षात्र शिष्यगण.

त्रैकाल्यं द्रव्यषट्कं सकलगणितगणाः सत्पदार्था नवैव ।
विश्वं पंचास्तिकायव्रतसमितिविदः सप्ततत्त्वानि धर्मः ।
सिद्धे मार्गस्वरूपं विधिजनितफलं जीवषट्कायलेश्या ।
एतान्यः श्रद्दधाति जिनवचनरतो मुक्तिगामी सभव्यः ॥

केवलज्ञानप्राप्ति झाल्यानंतर मागील प्रकरणांत सांगितलेल्या जिनशासनाचा प्रचार करण्यासाठीं महावीरस्वामी विहारावर निघाले. संसारपरिभ्रमणकारक अष्टकर्मांचा उच्छेद त्यांनीं केला होता. केवलज्ञानामुळें लोकालोकांचें पूर्णस्वरूप ते ओळखीत होते. आपणाला जो अनुभव आला तोच इतर भव्य जीवांनाहि यावा म्हणून तसा उपदेश देण्यासाठींच ते परम कारुण्यभावानें आतां विहार करीत होते. गेलीं बारा वर्षे जो संचार त्यांनीं केला तो स्वात्मोन्नतीसाठीं होय. आतां मोक्षप्राप्ती होईपर्यंत त्यांनीं जो विहार केला तो परोपकारासाठीं होय. मागील विहाराप्रमाणेंच या विहारांतहि ते चातुर्मासांत एके ठिकाणीं वास्तव्य करीत. पूर्व विहारांत त्यांना तपश्चर्या करावयाची असल्यामुळें अनेक उपसर्ग सहन करावे लागले होते; पण केवलज्ञानप्राप्ती झाली तेव्हां त्यानीं सर्व कर्मांचा क्षय केलेला असल्यामुळें सुखदुःखात्मक फलें भोगणें आतां त्यांना आवश्यक नव्हतें. आतां त्यांना अव्याबाध सुखांत निर्विकारपणें राहूनच आयुकर्म संपवावयाचें होतें. हरिवंशपुराणांत जिनसेनाचार्यांनीं लिहिल्याप्रमाणें काशी, कौशल, कोसल, कुसंध्य, अश्वष्ट, साल्व, त्रिगर्त, पंचाल, भद्रकार, पाटच्चर, मौकमत्स्य, कनीय, वृकार्थक, सूरसेन, कलिंग, कुरुजांगल, कैकेय, अत्रेय, कांबोज, वाल्हीक, यवनश्रुति, सिंधु, गांधार, सौवीर, सूर, भीरु, दशेरुक, वाडवान, भारद्वाज, क्वाथतोय, जार्ण, कार्ण, प्रच्छाल, वगैरे अनेक देशांत विहार करून महावीरस्वामींनीं धर्मप्रचार केला.

याप्रमाणें विहार करीत असतां ते अशा एका ठिकाणीं गेले कीं, जेथें बरेच ब्राह्मण यज्ञसमारंभासाठीं जमले होते. तेथें इंद्रानें अग्रभागीं दिलेला श्लोक

म्हणून त्याचा अर्थ विचारला. 'सहा द्रव्यें त्रिकालाबाधित आहेत. सत्पदार्थ नऊ आहेत. पंचास्तिकायांत सर्व विश्वाचा समावेश होतो. जीवाच्या सहा लेश्या आहेत. मोक्षसिद्धीचा मार्ग विधिजनित आहे वगैरे जिनवचनावर जो श्रद्धा ठेवतो तो भव्यजीव मुक्तिगामी होय.' असा वरील श्लोकाचा आशय आहे. वेदांतील ऋचा म्हणून यज्ञयाग करणाऱ्यापलीकडे ज्यांचें ज्ञान नाहीं त्यांना वरील श्लोकांतील तात्विक अर्थ काय कळणार? ते एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. पण ते भिक्षुकगणाचे अध्वर्यू होते. असे द्विज घमेंडानंद असतात; पण तितकेच पराजयाला लाजणारे असतात. आपणाला अर्थ लागत नाहीं असें कबूल करणें त्यांना जड गेलें व तेथें अर्थ तर सांगतां येईना तेव्हां महावीरस्वामींकडे जाण्याचें त्यांनीं कबूल केलें. आपल्या ठेवणींतील कांहीं चिजा काढून महावीर स्वामींना चकित करावें व असा त्यांचा पराजय करून वरील श्लोकाचा अर्थहि त्यांच्याकडून ऐकून त्याला निराळे अर्थ सुचवून वादविवाद करावा असा इंद्र-भूतीचा बेत होता. तसा निश्चय करून तो हजारों शिष्यांसह समवसरणाकडे गेला. वाटेंत त्याला एक कुशंकाहि आली कीं, आपणच जाणें हा कमीपणा असून महावीरस्वामीलाच इकडे बोलवावयास पाहिजे होतें. पण एका शिष्यानें 'आपण आपल्या परिवारानेंच त्यांना लाजवून सोडूं' अशी समजूत करून दिल्यावर इंद्रभूति थेट समवसरणापर्यंत गेला. मानस्तंभ पाहिल्याबरोबरच इंद्रभूति व त्याच्या शिष्यपरिवाराचें मिथ्यात्व नाहींसें झालें. महावीरस्वामींचें दर्शन झाल्याबरोबर ते सर्व नम्र बनले व अवधि आणि मनःपर्यय ज्ञानाचे जोरा-वर त्यांची सर्व माहिती व मनोगत जाणून महावीरस्वामींनीं प्रश्न केल्यामुळें व उत्तरें दिल्यानें तर ते सर्व थंडच पडले. भगवानांनीं त्या श्लोकाचा अर्थ सांगि-तला व जिनशासनहि समजावून दिलें. तेव्हां सर्व मिथ्यात्वाचा त्याग करून इंद्रभूति आपल्या सर्व शिष्यांसह वीरानुयायी बनला.

इंद्रभूति गेला तो तिकडेच गेला हें पाहून अग्निभूति आपल्या पांचशें शिष्या-सह समवशरणाकडे आले; त्यांनाहि मानस्तंभाचें दर्शन झाल्याबरोबर त्यांचें मिथ्यात्व विलयाला गेलें व महावीरस्वामींचें दर्शन झाल्यानंतर त्यांचे सर्व कषाय नष्ट होऊन तेहि वीरानुयायी बनले. नंतर वायुभूति, आर्यव्यक्त, सुधर्माचार्य, मण्डिकपुत्र, मौर्यपुत्र, अंकपित, अचलवृत्त, मैत्रेय व प्रभास असे सर्व ब्राह्मण आपा-पल्या शिष्यांसह तेथें आले व त्यांनींहि जिनदीक्षा घेतली. या अकरा प्रमुख ब्राह्म-

यांनाच गणधर म्हणतात. महावीर तीर्थंकराबरोबर जो संघ होता त्याचे हे एकादश गणधर नायक होते. महावीर तीर्थंकरांच्या निर्वाणानंतरहि इंद्रभूति व सुधर्माचार्य हे दोन गणधर हयात होते. या सर्वांना केवल ज्ञानप्राप्ति होऊन ते मोक्षाला गेले. गणधरांना सात प्रकारची ऋद्धि असते. ततऋद्धि, चतुर्बुद्धिविक्रिया, अक्षीणर्द्धि, औषधि, लब्धि, रस व बलऋद्धि या सप्तऋद्धि होत. या सर्व गणधरांची एकंदर शिष्यसंख्या चौदा हजार होती. हे सर्व मुनि झाले. वीरसंघांत छत्तीस हजार अर्जिका होत्या. त्यांची योग्यता दिगम्बर मुनि इतकीच असते. त्यांना दिगम्बर मुद्रा धारण करतां येत नाहीं व त्याच जन्मीं त्यांना मोक्षप्राप्ति होऊं शकत नाहीं एवढाच फरक. महावीर तीर्थंकरांच्या समवसरणाबरोबर एक लाख श्रावक होते व तीन लाख श्राविका होत्या. हे सर्व व्रती होते. त्याशिवाय अनेक गृहस्थहि समवसरणाबरोबर होते.

ज्याप्रमाणें अनेक ब्राह्मण मिथ्यात्वाचा त्याग करून वीरानुयायी बनले त्याचप्रमाणें बरेच वैश्य व क्षत्रिय आणि इतर वर्णांचे भव्यजीवहि वीरानुयायी बनले होते. महावीर तीर्थंकरांच्या क्षात्र शिष्यांत राजा श्रेणिक व चेटक यांचें बरेंच महत्व आहे. सम्राट श्रेणिक किंवा बिंबिसारचा काळ इ. स. पू. ५४३ ते इ. स. पू. ४९१ हा आहे. प्रारंभीं श्रेणिक बुद्धानुयायी होते; पण पुढें चेलना राणीच्या प्रभावामुळें व महावीर तीर्थंकरांचें माहात्म्य ओळखून ते जैन बनले होते. गणधराप्रमाणेंच ते तीर्थंकरांना अनेक प्रश्न विचारून खुलासा करून घेत. त्यांनीं साठ हजार प्रश्न विचारले होते अशी मान्यता आहे, व याच्या उत्तर भागांत श्रेणिक जसे जैन होते तसे त्यांचे चिरंजीव कुणिक वयाच्या पूर्वभागांत जैन होते व म्हणूनच बौद्धग्रंथांतून ' कुणिक पापाचारखाच सर्व दुष्कृत्यांचा पोषक व समर्थक होता ' असें म्हटलेलें आहे. पण पुढें तो बुद्धानुयायी झाल्यावर मग लगेच त्याचीच स्तुती करण्यांत आलेली आहे. तात्पर्य हें कीं, सम्राट श्रेणिक व कुणिक हे वीरकालीं जैनधर्मानुयायी होते. सम्राट श्रेणिकाचे वडील उपश्रेणिक हे फार पराक्रमी होते. विष्णुपुराणांत शिशुनागवंशाचा राजा क्षत्रोजस यांचें जें वर्णन केलेलें आहे तें उपश्रेणिकांना बरोबर लागू पडतें. चंद्रपुरचा राजा सोमशर्मा हा त्या काळीं सर्वांत अधिक पराक्रमी गणला जात होता; पण त्याचाहि उपश्रेणिकानें पराजय केला होता. उपश्रेणिकांना इंद्राणी राणीपासून श्रेणिक जन्मले होते. बालपणापासूनच श्रेणिक अत्यंत चाणाक्ष व कुशाग्र बुद्धीचे होते.

क्षत्रियोचित सर्व विद्या त्यांनीं हस्तगत केल्या होत्या. एकदां उपश्रेणिक शिकारीसाठीं गेले असतां घनदाट अरण्यांत एक सुंदर क्षात्र रमणी त्यांच्या दृष्टीस पडली व ते तिजवर अतिशय मोहित झाले. पदभ्रष्ट झाल्यामुळें एक क्षत्रिय राजा आपल्या तिलकवती नामक कन्येला घेऊन जंगलांत एका भिल्लाचे घरीं रहात होता. राजा उपश्रेणिकासारखा त्रैलोक्यविख्यात तिलकवतीला मोहून आलेला पाहून आपलें भाग्य उदेले असेंच त्या अज्ञातवासी राजाला वाटलें व हिच्या पोटीं होणाऱ्या मुलालाच जर आपण आपली गादी द्याल तर मी तिलकवतीला आपणास देतों अशी अट त्यानें घातली. कामातुर उपश्रेणिकानें ती ताबडतोब मान्य केली व तिलकवतीशीं रममाण झाला. पुढें तिलकवतीला चलाती नांवाचा पुत्र झाला व त्यालाच गादीवर बसविणें उपश्रेणिकाला भाग पडलें. श्रेणिकाचा कांटा आपल्या वाटेंतून काढण्यासाठीं त्याच्यावर घोर अपराधाचा आळ घेऊन त्याला राज्यांतून हद्दपार करण्यांत आलें व परत आल्यास प्राणदण्डाची शिक्षा ठेवण्यांत आली. त्यामुळें श्रेणिक राज्य सोडून गेला व बौद्धभिक्षूंच्या आश्रमांत राहिला. बौद्ध मठांत कांहीं वर्षें घालविल्यानंतर इंद्रदत्त नांवाच्या शेटबरोबर श्रेणिक वेणपद्म नगरीला गेले. तेथें इंद्रदत्ताची मुलगी नंदीश्रीचें त्यानीं पाणिग्रहण केलें. इकडे चलातीनें प्रजेवर फार जुलूम चालविल्यामुळें राजगृहाची प्रजा श्रेणिकाची फार आठवण काढीत होती. ही बातमी श्रेणिकाला कळतांच तो राजगृहीला गेला. प्रजेचा मानस पाहून चलातीराजा, मुकाट्यानें पळून गेला व श्रेणिकाला फिरून राज्यपद देण्यांत आलें. बौद्धमठांत आश्रय मिळाला असतां ते बुद्धानुयायी झाले होते व तोच धर्म राज्यपदावर आल्यावर पाळूं लागले. श्रेणिक राजाचें लग्न विदेहदेशचा राजा चेटकाची कन्या चेलनेशीं झालें. पुढें नंदश्रीलाही राजा श्रेणिकानें आणविलें व तिच्यापासून त्याला अभयकुमार पुत्र झाला. केरलाधीश मृगांकराजानें आपली विलासवती नांवाची कन्याहि श्रेणिकाला दिली. ही पुढें बौद्धमताची झाली. चेलनेला बौद्धदीक्षा देण्याचा प्रयत्न श्रेणिकानें चालविला होता; पण जो भिक्षु तिला उपदेश देण्यासाठीं पाठविला होता त्यालाच तिनें वादांत परास्त केलें. श्रेणिकाच्या मनांत आपल्या गुरूचा हा अपमान डांचत होता व त्याचा बदला त्यानें जंगलांत ध्यानस्थ बसलेल्या मुनीच्या गळयांत साप घालून घेतला. या कृत्याबद्दल चेलनानें श्रेणिक राजाला फारच दोष दिला व

दोघेहि त्या जंगलांत आले तेव्हां ते मुनि उपसर्ग सहन करीतच बसले होते. हें पाहून श्रेणिकाला फारच आश्चर्य वाटलें व जैनमुनींबद्दल त्याच्या मनांत आदर उत्पन्न झाला. त्या मुनींकडून त्यानें शास्त्रार्थ श्रवण केला. त्यानीं त्याचे पूर्वभवहि सांगितले. एका पूर्वभवांत श्रेणिक सूर्यपुरचा स्वामी असतां सुषेण मुनीला त्यानें आहारदानाचें बाबतींत बरेच चाळविलें होतें. त्यामुळें क्रुद्ध होऊन सुषेण मुनि व्यंतर झाला व आपलें वैर साधण्यासाठीं पुत्ररूपानेंच कुणिक म्हणून जन्माला आला असें मुनीनें सांगितलें. इतरहि पुष्कळ शास्त्रार्थ झाल्यावर श्रेणिकनें तेथल्या तेथें जैनदीक्षाहि घेतली. पुढें राजगृहांत महावीरतीर्थंकर आले असतां त्यांचें समवसरणांत श्रेणिकराजा गेला होता व त्यानें अनेक प्रश्न विचारून आपलें समाधान करून घेतलें होतें. श्रेणिकाला चेलनेपासून कुणिक, वारिषेण, हल्ल, विदल, जितशत्रु व गजकुमार असे पुत्र झाले होते. कुणिकहून नंदश्रीपासून झालेला श्रेणिकाचा मुलगा अभयकुमार मोठा होता; पण त्यानें दीक्षा घेतल्यामुळें कुणिकाला गादी मिळाली. कुणिकानें बौद्धधर्म स्वीकारून श्रेणिकाचा बराच छळ केला व पूर्वभवांतील वैर साधलें. श्रेणिकाला बंदीखान्यांत ठेवण्यांत आलें होतें व त्याला अन्नपाणीहि देण्यांत येत नसे. चेलना चोरून श्रेणिकाला आहार नेऊन देत असे. हें कुणिकाला कळल्यावर तिलाहि कारागृहांत ठेवण्यांत आलें. चेलनेनें कुणिकाची बरीच समजूत घातल्यावर एक दिवस त्यांची माफी मागून त्यांची मुक्तता करावी म्हणून तो बंदीखान्याकडे चालला. त्याला येतांना पाहतांच आज कांहीं धडगत नाहीं, असें मानून श्रेणिकानें आपलें डोकें भिंतीवर आपटून प्राणत्याग केला व दिगम्बर मुनीला केलेल्या उपसर्गाचें फळ म्हणून नरकास गेला.

श्रेणिकराजाचे प्रथम पुत्र अभयकुमार हे नंदीश्रीच्या पोटांत असतांनाच तिला अन्यजीवांना अभयदान देण्याचे डोहाळे लागले होते म्हणून त्याचें नांव अभयकुमार ठेवण्यांत आलें. हा कुमार जैनमुनि झाल्यामुळें बौद्धग्रंथांतून त्यांची फार हेटाळणी केली गेली आहे. लिच्छवीवंशाचे बहुतेक सर्व क्षत्रिय जैन असल्यामुळें त्या वंशाचीहि नालस्ती करण्यांत आली आहे. या वंशांतील एका वेश्येपासून श्रेणिकाला अभयकुमार झाला असून तो भर दरबारांत येऊन श्रेणिकाच्या मांडीवरच जाऊन बसला म्हणून त्यांचें नांव अभय ठेवण्यांत आलें असें बौद्ध ग्रंथांतून लिहिलेलें आहे. असो. अभयकुमार बाळपणापासूनच सत्प्रवृत्त होते. इतर क्षात्रकुमारांप्रमाणें ते कधीं शिकारीला गेले नाहींत. ते

विद्याध्ययनांतच रत असत. ते सम्राट श्रेणिकाबरोबर, महावीरतीर्थकरांच्या समवसरणांत गेले होते. तेव्हांच त्यांना वैराग्य उत्पन्न झाले. ते गादीचे वारस युवराज असल्यामुळें त्याचें हें वळण कोणालाहि आवडेना. तेव्हां त्यांनीं मुनिदीक्षाच घेऊन टाकली. बरींच वर्षे तपश्चर्याकरून शेवटीं त्यांनीं मोक्षप्राप्ती करून घेतली.

श्रेणिकाचे दुसरें पुत्र वारिषेण हेहि मुनी झाले. तारुण्यावस्थेंतच त्यांना वैराग्य प्राप्त झालें. त्याचें दर्शन व चारित्र फारच उच्च दर्जाचें होतें. कुमार-वारिषेण हे राजवाडा सोडून रोज जंगलांत जाऊन सामायिक करीत असत. एकदां प्रोषधोपवास घेऊन ते जंगलांत रात्रीं सामायिक करीत बसले होते. राजगृहींतील विद्युत् नांवाचा एक गृहस्थ दत्तशेटच्या घरांतून एक रत्नहार चोरून आणून वेश्येच्या घरीं घेऊन चालला होता; तें कोतवालानें पाहून विद्युतचा पाटलाग केला. विद्युत गांवाबाहेर पळत सुटला. वाटेंत ध्यानस्त बसलेला इसम पाहून त्याचे अंगावर तो हार टाकून विद्युत पुढें पळून गेला. राजदूत पाठलाग करीत येतच होते. त्यांनीं हार घेऊन ध्यानस्थ बसलेला इसम पाहिला व तोच चोर म्हणून त्याला पकडून नेलें. या घोर अपराधाबद्दल त्या इसमाला फांशीची शिक्षा द्यावी, असा हुकूम सुटला. त्याप्रमाणें वारिषेण राजपुत्रालाच फांसाकडे नेण्यांत आलें; पण वारिषेणनें कांहीं प्रतिकार केला नाहीं. त्याच्यावर उगारलेली तलवार पुष्पहार झाली. तेव्हां चांडाळाला विचार पडला व अधिक चौकशी झाली. फांसावर देण्यास काढलेला इसम वारिषेण राजपुत्र आहे असें पाहून सर्वांना अचंबा वाटला व भीतिहि उत्पन्न झाली. पण वारिषेणानीं कोणालाहि शासन केलें नाहीं; उलट आपणच मुनिदीक्षा घेऊन राजगृहनगरी सोडून चालते झाले. महावीरतीर्थकरांचे समवसरणांत वारिषेण मुनीहि गेले होते. इतरांना मोक्षमार्गावर आणण्यांत ते फार चाणाक्ष होते व स्वतःहि मोक्षाला गेले.

राजगृहनगरीच्या या राज्यघराण्यांतील संतति एकापेक्षां एक चारित्रवान जिच्यामुळें निघाली त्या चेलनेचें माहेर तर जैनधर्मानुयायी फार पूर्वीपासून होतें. चेटक राजाच्या घराण्यांतील संततीहि धर्मोद्धारकच निघाली. तीर्थंकर-माता त्रिशलादेवीहि चेटकराजाचीच पुत्री. त्याची सर्वांत लहान मुलगी चंदनाहि अर्जिकांची नायिका म्हणून जैनशास्त्रांत प्रख्यात आहे. एकदां ती बागे-

च्यांत खेळत असतां तिच्या सौंदर्यावर मोहित होऊन एका विद्याधरानें तिला विमानांतून नेली. पण पुढें विद्याधरीच्या भयामुळें त्यानें चंदनेला वाटेंतच जंगलांत सोडून दिली. तेथें एका भिल्लानें तिला घेऊन कौशांबी नगरींतील शेठ वृषभसेनाला विकून टाकली. शेठाणी सुभद्रेला तिचें रूपलावण्य पाहून असूया उत्पन्न झाली व तिनें तिला तळघरांत कोंडून ठेविली. पण चंदनबालेच्या पुण्योदयामुळें महावीरस्वामी सहा महिन्यांच्या उपवासाचें पारणें करण्यासाठीं कौशांबीला आले असतां आपल्या अभिग्रहानुसार त्यांनीं चंदनबालेकडून आहार घेतला. त्यामुळें तिचें नांव गांवभर झालें. तिला राजवाड्यांत नेण्यांत आलें. चेटकाची एक मुलगी कौशांबीच्या राजाला दिली होती. तिनें आपल्या लघुभगिनीला तात्काळ ओळखलें. मृगावती राणीजवळ कांहीं दिवस राहून नंतर चंदनबालेनें आर्यिकेची दीक्षा घेतली व ती महावीर तीर्थंकरांच्या समवसरणांत येऊन दाखल झाली.

राजपुरीनगरींत सत्यंधर नांवाचा राजा राज्य करीत होता. तो इतका विषयासक्त होता कीं सर्व राज्यकारभार काष्टांगार मंत्र्यावर सोंपवून तो विजया राणीशीं नर्मीं रममाण होत असे. राणीला एक दुष्ट स्वप्न पडलें. त्यावरून आपला खून होणार असें तिला कळून आलें. तेव्हां सत्यंधर राजानें एक विमान तयार करून तें राणीला चालविण्यास शिकविलें जेणेंकरून आपत्ति आली असतां आकाशांत उडून जातां येईल. काष्टांगाराला पुढें दुष्टबुद्धि सुचली व राजाला मारून आपणच राज्योपभोग भोगण्याचें त्यानें ठरविलें. म्हणून सर्व सैन्य त्यानें सत्यंधर राजाविरुद्ध पाठविलें. सत्यंधरानें विजयाराणीला विमानांत बसवून पाठवून दिली व आपण लढतां लढतां मरून गेला. तें विमान स्मशानांत येऊन उतरलें. तेथें गंधोत्कटशेट आपल्या पुत्राची उत्तरक्रिया करण्यास आला होता. विमानांत विजयाराणी प्रसूत झाली होती. तिनें तो पुत्र स्मशानांत ठेवला व फिरून विमानांतून उडून गेली व पुढें तपस्व्यांच्या आश्रमांत राहिली. इकडे स्मशानांत पडलेलें तान्हें मूल पाहून गंधोत्कट शेटनें नेऊन तें आपल्या पत्नीस दिलें. तिनें त्या तान्हुल्याला पुत्रवत् प्रेमानें वाढविलें. त्याचें नांव जीवंधर ठेवण्यांत आलें होतें. आपल्या बाललीलांनीं जीवंधरानें शेठ व शेठणीला पुष्कळसें रमविलें. पुढें युवावस्था प्राप्त झाल्यानंतर पुष्कळ विद्याध्ययनहि केलें. गांधार देशाची राजकन्या गंधर्वदत्ता इच्याशीं जीवंधराचें लग्नहि झालें. जीवंधर

वैश्यकुमार मानला गेला असून वीणावादनाचा स्वयंवरांतील पण जिंकल्यामुळेंच त्याला क्षात्रकन्येनें वरलें होतें. राजपुरींत सुरमंजरी व गुणमाला अशा दोन क्षात्रकुमारी होत्या. त्यांना हत्तीच्या तावडींतून सोडवून जीवदान दिल्यामुळें मातापित्यांनीं त्या दोघी जीवंधरला अर्पण केल्या. पण हा हत्ती होता काष्टांगाराचा. त्यानें हत्तीला जखम करणाऱ्याचें शीर तोडण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें जीवंधराला वधस्तंभाकडे नेण्यांतहि आलें. पण यक्षाच्या साहाय्यानें जीवंधर जिवंत राहिला व चंद्रोदय पर्वतावर गेला. चंद्राभा नगरीचा राजा धनपति यानें आपली पुत्री पद्मा जीवंधराला दिली. कारण त्यानें तिला चावलेल्या सापाचे विष उतरून जीवदान दिलें होतें. तेथून जीवंधर क्षेमपुरी नगरीला गेले व ज्योतिष बरोबर जुळल्यामुळें तेथील राजानें आपली पुत्री क्षेमश्री जीवंधराला दिली. तेथून जीवंधर हे माभा नगरीला गेले. तेथील राजपुत्रांना त्यानें धनुर्विद्या शिकविल्यामुळें राजा दृढमित्रानें आपली कन्या कनकमाला जीवंधराला दिली. येथें गंधोत्कट शेटचे पुत्र नंदाढ्य व पद्मास्य त्याला भेटले. तेथून जीवंधर परत राजपुरीला आले. सागरदत्त शेठनें आपली मुलगी विमला त्यांना दिली. धरणीतिलका नगरीच्या राजानें लावलेल्या स्वयंवरांत चंद्रकयंत्राचें तीन वराह छेदून जीवंधरानें लक्ष्मणा राजकन्येशीं विवाह केला. शेवटीं काष्टांगाराचा खून करून जीवंधरानें वडिलोपार्जित राज्यहि परत मिळविलें. विजयाराणीला तापसाश्रमांतून आणण्यांत आलें. पण तिनें कांहीं दिवसांनंतर आर्यिकेची दीक्षा घेतली. जीवंधरहि एकदां आपल्या आठ राण्यांशीं क्रीडा करीत असतां वैराग्य उत्पन्न होऊन सत्यंधरावर राज्यकारभार सोंपवून महावीर तीर्थकरांच्या समवसरणांत आले व दीक्षा घेऊन महान तप केलें. आणि शेवटीं त्यांनीं मोक्षहि प्राप्त करून घेतला.

## प्रकरण दहावें.

# भगवान महावीर व महात्मा बुद्ध.

बौद्धधर्माचे प्रवर्तक म. गौतमबुद्ध हे भगवान महावीर तीर्थकरांचें समकालीन होत. त्यांचा काळ इ. स. पू. ६२३ ते इ. स. पू. ५४३ असा एकमतानें आतां ठरला आहे. भगवान महावीरांचा काल जुन्या मताप्रमाणें इ. स. पू. ५९९ ते इ. स. पू. ५२७ व आम्हीं मागील एका प्रकरणांत आधारपूर्वक सिद्ध केल्या-प्रमाणें इ. स. पू. ६१७ ते इ. स. पू. ५४५ ठरतो. कोणताहि काल धरला तरी म. बुद्ध भगवान महावीरांचे समकालीनच ठरतात. तेव्हां भगवान महावीर व म. बुद्ध या दोघांचा सर्व दृष्टीनें तुलनात्मक विचार करणें अवश्य आहे. या बाबतींत गैरसमज इतका माजलेला होता कीं, पाश्चिमात्य संशोधक दोन्ही विभूतींना एकच समजूं लागले होते; पण वैदिक ग्रंथांतून दोन्ही व्यक्तींचा व त्यांच्या उपदेशाचा स्वतंत्र उल्लेख असलेला पाहून पाश्चात्य विद्वान या दोन विभूति भिन्न आहेत असें मानूं लागले. पण जैनधर्म बौद्धधर्मांतून निघाला असें विपरीत मत प्रतिपादूं लागले. पौर्वात्य विद्वान वैदिकधर्मांतूनच बौद्ध व जैन धर्म फुटून निघाले असेंहि मानतात. जैनधर्माचें प्राचीनत्व आम्हीं प्रारंभाच्या प्रकरणांत सिद्ध केलेंच आहे. आतां जैनधर्माचा परिणाम बौद्धधर्मावर कितपत झाला आहे तें या प्रकरणांत दोन विभूतींची तुलना करतांना पाहूं.

बुद्धापूर्वी जैनधर्म होता याबद्दल वादच नाहीं; पण बुद्धाचें घराणें जैनधर्मी होतें असें आतां सिद्ध झालें आहे. ललितविस्तार नांवाच्या बौद्धग्रंथांत बुद्धाच्या गळ्यांत बालपणीं श्रीवत्स, स्वस्तिक व नंद्यावर्त हीं चिन्हें व वर्धमान हें नांव अडकविलें होतें असें लिहिलें आहे. पहिलीं तीन चिन्हें अनुक्रमें शीतलनाथ, सुपार्श्वनाथ व अर्हनाथ या तीर्थकरांचीं लक्षणें आहेत. चोवीसावे तीर्थकर अजून जन्मावयाचे असल्यामुळें त्यांचें लांछन गळ्यांत न बांधतां शुभनामच गळ्यांत बांधलें असलें पाहिजे हें उघड आहे. शिवाय स्वतः बुद्धांनींहि म्हटलें आहे कीं मी चोवीस बुद्ध पाहिले आहेत. बुद्धापूर्वी बौद्धधर्मच नसल्यामुळें वरीलप्रमाणें त्यांनीं तीर्थकरानांच उद्देशून म्हटलें असलें पाहिजे हें उघड आहे. तीर्थकर होण्यास पूर्वजन्मांतून ज्या षोडश भावना व्हाव्या लागतात त्या मागील एका

प्रकरणांत दिल्याच आहेत. बुद्ध होण्यासहि पूर्वजन्मांतून तीन पारिमिता पूर्ण कराव्या लागतात असें बौद्धग्रंथांतून म्हटलेलें आहे. मुख्य पारिमिता दहाच असून त्यांचे प्रत्येकीं तीन भेद आहेत. साधारण, उप व परमार्थ असे ते तीन भेद होत. पहिली दानपारिमिता. भौतिक वस्तूंचे, दान, देहावयवदान व प्राणदान अशीं तीन प्रकारचीं दानें केलीं असतां दानपारिमिता होते. शीलव्रतांचें पालन केल्यानें शील पारिमिता होते. विरक्तावस्थेचा अभ्यास केल्यानें नैसक्रमपारिमिता होते. बुद्धीचा विकास केल्यानें प्रज्ञापारिमिता होते. पौरुष प्रगट केल्यानें वीर्यपारिमिता होते. उत्कृष्ट प्रकारची सहनशीलता दाखविल्यानें क्षांतिपारिमिता प्राप्त होते. सत्यव्रत पाळल्यानें सत्तपारिमिता, अहिंसा किंवा दयाव्रत पाळल्यानें मैत्री पारिमिता; दृढ संकल्प तडीस नेल्यानें अदिष्ठान पारिमिता व शत्रुमित्रांचे ठायीं समभाव राखल्यानें उपेक्षापारिमिता प्राप्त होते. या पारिमिता प्राप्त करून घेण्यासाठीं बुद्धाच्या जीवाला पूर्वी अनेक जन्म घ्यावे लागले होते व देवगतींत त्यांनीं फारच थोडे जन्म घेतले असें बौद्ध ग्रंथांत वर्णन आहे. पण राजा शुद्धोदनाचे पोटीं बुद्धाचा जीव देवलोकांतूनच आला होता. यावरून पूर्वभव व त्यामधील तयारी या दोहोंचे बाबतींत जैनशास्त्राशीं बौद्धशास्त्राची कल्पना बरीच जुळते असें दिसून येतें. तीर्थंकराला जसे अतिशय असतात तसे बुद्धालाहि विशेष गुण असतात असें बौद्धशास्त्रांत मानलेलें आहे. मानुषभव, पुरुषलिंग, महापुण्य, बुद्धोपासना, विरक्तता, ध्यानीं, बुद्धपदावर विश्वास आणि बुद्ध होण्याचा निश्चय हे आठ गुण बुद्ध होणाऱ्या जीवाला अवश्य आहेत. जन्मापूर्वी बुद्धानें पंच–महाविलोकन केलें तें असें. शतायुषी मनुष्य, उत्तमक्षेत्र मगधदेश, जम्बुद्वीप, क्षात्रियवर्ण व महामायेची कुक्षी हे पंचमहाविलोकन बुद्धानें देवनगरींत केलें. ते तुसित विमानांत संतुतुसित नामकदेव होते व तेथें सत्तावन कोटी साटलाख वर्षें आयुष्य त्यानें व्यतीत केलें असें बौद्ध ग्रंथांतून वर्णन आहे. संतुतुसित देवाच्या जीवानेंच शुद्धोदन राजाची राणी महामाया हिच्या पोटीं बुद्ध म्हणून जन्म घेतला. शुद्धोदन राजाची राजधानी कपिलवस्तु होती, व हें शाक्य गणराज्य होते. बुद्धानें वैशाख शु. २ ला जन्म घेतला. बालकाचा जन्म झाल्याबरोबर महामायेनें प्राण सोडला. ज्योतिष वगैरे पाहिल्यावर मुलगा संन्यासी होईल, असें दिसून आलें, तेव्हां शुद्धोदन राजा फार खिन्न झाला. मुलाला वैराग्य

उत्पन्न होण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून त्यानें सर्व सुखसाधनसंपन्न असा खास महाल तयार करून त्यांत सिद्धार्थाला ठेवलें. इतर तरुण राजकुमारांबरोबर ते अनेक तऱ्हेची क्रीडा करीत. एकदां बुद्ध आपला चुलतभाऊ देवदत्त याच्यासह धनुर्विद्या शिकत असतां, एक बाण एक पक्ष्याला लागला व तो तडफडत झाडावरून खालीं पडला. तें दृश्य पाहून बुद्धाचें हृदय अतिशय कळवळलें. पुढें शुद्धोदन राजानें लवकरच पुत्राचा विवाह करून टाकला. अशा हेतूनें कीं, तो मायापाशांत इतका गुरफटला जावा कीं त्याला संन्यास घेण्याची बुद्धीच होऊं नये. यशोदा नांवाच्या राजकुमारीपासून बुद्धाला राहुल नांवाचा मुलगाहि झाला; पण एकदां पूर्वस्मरण होऊन बुद्ध महाल सोडून वनांत निघून गेले. एकदां ते सहल करण्यास रथांत बसून गेले असतां, एक शेतकरी कडक उन्हांत शेतांत राबतांना त्यांना दिसला. पोटासाठीं व देहपालनासाठीं इतके कष्ट करावे लागतात ही गोष्ट बुद्धाला असह्य झाली. पुढें एक रोगी त्यांना दिसला. त्याचे कष्ट पाहूनहि बुद्धाचें मन कळवळलें. नंतर एक अगदीं म्हातारा मनुष्य त्यांच्या नजरेस पडला. कर्मधर्मसंयोगानें त्याच वेळीं एक प्रेतयात्राहि त्यांच्या जवळून गेली. याप्रमाणें हीं चार दृश्यें पाहून बुद्धाचे मनांत खळबळ उडाली. आपणालाहि या स्थितींतून जावें लागणार आहे याची त्याला कल्पना आली व अशी दुःस्थिति पुन्हा न येईल असा प्रयत्न करण्याचा बुद्धानें निश्चय केला. घरीं परत आल्यावर त्यानें संसार सोडून वनांत जाण्याचा निश्चय केला. पण वडील व पत्नीला ही गोष्ट कळून उपयोगी नाहीं हें जाणून मध्यरात्रीं जाण्याचा बुद्धानें निश्चय केला. मध्यरात्रीं मुलगा व पत्नी गाढ निद्रावश झालेलीं पाहून, दोघांचें चुंबन घेऊन लवकर जंगल गांठतां यावें म्हणून रथ मागविला व त्यात बसून तो जंगलाच्या मार्गानें चालला. पहाट होईतोंपर्यंत रथ जोरानें हाकण्यांत आला व दाट जंगलांत पोहोंचल्यावर बुद्धानें सारथ्याला रथ परत घेऊन जाण्यास सांगितलें. सारथ्याला त्याचें आश्चर्य वाटलें. राजाला व छोट्या राणीला जाऊन काय सांगूं म्हणून तो विचारूं लागला. पण रथ घेऊन परत महालाकडे जाण्याची तुला माझी आज्ञा आहे यापलीकडे बुद्ध कांहींच सांगेना. तेव्हां निरुपायानें सारथी रथ घेऊन परत गेला. यशोदा राणीनें व शुद्धोदन राजानें फार शोक केला. बरींच वनें धुंडाळलीं; पण त्याला बुद्धाचा कांहीं शोध लागला नाहीं.

जन्म, कष्ट, रोग, जरा व मरण या दुःखांतून कायमचें सुटण्याचा मार्ग शोधून

काढण्यासाठीं म. बुद्ध जंगलांत गेले होते. असा मार्ग सांगणारा कोणी भेटल्यास त्याची सेवा करीत आपण राहूं व तो सांगेल ती खडतर तपश्चर्या करून आपण तो मार्ग प्राप्त करून घेऊं अशी म. बुद्धाला उमेद होती. खरोखर शुद्धोदन राजानें जर भलतेंच नियंत्रण बुद्धावर घातलें नसतें तर ज्या जैनधर्मांत त्यांचा जन्म झाला त्याच धर्माचे साधु योग्य वेळीं त्यांना भेटले असते व योग्य मार्ग त्यांना मिळाला असता; पण तसें होण्याइतकें त्यांचें पुण्यकर्म बलवत्तर नव्हतें असेंच म्हणावें लागतें व म्हणूनच ते भेटेल त्या साधूच्या नादीं लागत गेले व शेवटीं जैनसाधु भेटला तरी त्यानें सांगितलेल्या मार्गावर त्यांची श्रद्धा शेवटपर्यंत टिकली नाहीं व तो मार्ग अर्धवटच सोडून स्वकपोलकल्पित मार्गानें ते गेले व जी कांहीं प्राप्ति झाली त्यावरच संतोष मानून तोच मध्यम मार्ग म्हणून उपदेशावयास फिरून म. बुद्ध लोकवस्तींत आले. असो. पूर्वकर्म जसें होतें तसें झालें. रथांतून जंगलांत उतरल्यावर होते ते कपडे त्यांनीं फेंकून दिले व मार्ग दाखविणाऱ्या साधूच्या शोधांत निघाले. एक सांख्यमताच्या साधु जवळपास रहात आहे असें त्यांना कळल्यावर ते त्याच्याजवळ गेले. या आरादकालम साधूनें आपला मार्ग बुद्धाला सांगितला, पण आरादनें जें कांहीं सांगितलें आहे त्यानें मला हवा असलेला मार्ग मिळून माझ्या मनाची शांति होईल असें मला वाटत नाहीं असें म्हणून म० बुद्ध तेथून निघाले. पुढें ते उद्रराम नांवाच्या एका ऋषीच्या तपोवनांत गेले; पण तेथेंहि त्यांचें समाधान झालें नाहीं. सर्व तपोवनें धुंडून अनेक मतांच्या साधूंचा त्यांनीं समागम केला, पण त्यांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. हिंडतां हिंडतां ते गयेजवळच्या ' क्याची ' नामक तापसवनांत आले. तेथें त्यांना पांच निर्ग्रंथि साधु दिसले. त्यांचें म्हणणें बुद्धाना प्रमाण वाटलें व त्यांनीं सांगितलेली साधना ते करूं लागले. साधना करूं लागल्यावर थोडा अनुभवहि त्यांना आला. तेव्हां त्या पलाशग्राम किंवा वनग्राम नांवाच्या तापसवनांत राहून साधना पुरी करण्याचा त्यांनीं निश्चय केला. ज्या मुनिजवळ त्यांनीं दीक्षा घेतली त्याचें नांव पिहिताश्रव. फल ज्याप्रमाणें अचित होऊं शकतें तसें मांसहि होऊं शकतें व कषायवस्त्र असलें तरी दिगंबरत्वास बाध येत नाहीं असा मतभेद झाल्यामुळें पार्श्वनाथ तीर्थंकरांच्या परंपरेंतील संघांतून पिहिताश्रव फुटून निघाले होते. केशलोच, ध्यान, उपवास वगैरे इतर सर्व क्रिया ते पाळीत असत. म० बुद्धांनीं

दिगंबरजैन मतानुसारच सहा वर्षे तपश्चर्या केली हें स्पष्ट आहे. कारण जैनग्रंथ व बौद्ध ग्रंथांतूनहि तसें म्हटलें आहे. खुद्द म० बुद्धांचेंच एक वचन आहे कीं, 'मीं डोक्याचे व दाढीचे केस उपटण्याचे कष्टहि सहन केले आहेत!' अर्थात् हा केशलोच होय व हा जैन साधूचा एक आचार आहे. पण सहा वर्षे जैन पद्धतीनुसार तपश्चर्या केली, तरी त्यांचा स्वच्छंद कांहीं नाहींसा झाला नव्हता. असले कायक्लेश अधिक सोसण्याची जरूरी नाहीं असें त्यांनीं मात्र स्थितप्रज्ञता प्राप्त झाल्याबरोबर ठरविलें व मला हवा असलेला मध्यम मार्ग मिळाला असें म्हणून तपश्चर्या अर्धवट सोडून ते लोकवस्तींत गेलेहि. केवळ ज्ञान व मोक्षाची त्यांना फिकीरच नव्हती. पिहिताश्रव भिक्षूजवळ जी तपश्चर्या म. बुद्धांनीं केली तीहि स्वच्छंदानेंच. जो कांहीं स्वाध्याय त्यावेळीं केला तोहि पूर्णपणें गुरुगम्य व शास्त्रमर्यादा संभाळून केलेला नव्हता व म्हणूनच बुद्धाच्या उपदेशांत बरेच जैन पारिभाषिक शब्द आढळत असले तरी त्यांचे अर्थ विपरीत आहेत व अहिंसादि त्यांच्या उपदेशाशीं जैन तत्वज्ञानाचें साम्य दिसत असलें तरी दोहोंत जमीनअस्मानाचा फरक आहे. हा सर्व अर्धवट तपश्चर्येचा व स्वच्छंदाचा परिणाम होय. पण अशा जीवालाहि त्या काळीं एक महानस्थान नियत होतें व तें म० बुद्धांनीं सजविलें आणि इतिहासांत क्रांति केली यांत शंका नाहीं. असो.

'असले कायक्लेश सहन करीत अतर्क्य व उत्कृष्ट आर्यज्ञान प्राप्त करून घेण्याऐवजीं दुसरा एखादा मध्यम मार्ग नाहीं काय?' असा तर्क पिहिताश्रवानें सांगितलेली साधना कांहीं वर्षे केल्यावर म० बुद्धानां सुचला व त्यानीं तो मार्ग सोडून दिला. पिहिताश्रव मूळ जैनमार्गापासून बरेच दूर सरलेले आणि पिहिता-श्रवाच्या मार्गापासूनहि म० बुद्ध बरेच घसरलेले. तेव्हां जैनमार्ग व बौद्धमार्गांत थोडेंसें साम्य असलें तरी विलक्षण अंतर पडलें आहे तें स्वाभाविकच आहे. त्यांनीं कायक्लेश सोडून दिले, स्वच्छंदानें वागण्यास सुरवात केली, तरी पण पिहिताश्रवानें सांगितलेली तपश्चर्या केल्यामुळें त्यांना जी सुख-दुःखातीतता व आनंदमयता प्राप्त झाली होती ती कांहीं नाहींशी झाली नाहीं. एवढ्या स्वानु-भवावरून खडतर व सुसंबद्ध तपश्चर्येनंतर मिळणारें सुख साधारण मार्गानेंहि मिळूं शकेल अशी बुद्धानें कल्पना केली व मध्यम मार्ग उपदेशिला. त्यामुळें असंख्य जीव मात्र आडमार्गाला लागले. म. बुद्ध तथागत झाले,

ज्ञानी झाले असें म्हणण्यांत येतें तें त्यांनीं मनाची साम्यावस्था प्राप्त करून घेतली एवढ्यापुरतेंच होय. पण तीर्थंकराच्या केवल ज्ञानाच्या प्रासंगासहि तें पुरणार नाहीं. दोघांच्या उपदेशावरून ही गोष्ट कोणाच्याहि लक्षांत येण्याजोगी आहे. बोधिवृक्षाखालीं त्यांना झालेल्या या ज्ञानाचें बाबतींत मिलिंदपन्ह नांवाच्या बौद्ध ग्रंथांत खालीलप्रमाणें लिहिलें आहे. 'ही ज्ञानदृष्टी बुद्धाजवळ नेहमीं नसे. भगवानाची सर्वज्ञता विचारावर अवलंबून होती; आणि जें जाणण्याची त्यांना इच्छा होत असे तें विचार केल्यानंतर ते जाणत असत' बौद्धाचार्य म्हणाले. त्यावर राजा मिलिंद म्हणाला, 'विचार केल्यानंतरच जर ते जाणत होते तर ते सर्वज्ञ कसले ? ' तेव्हां बौद्धाचार्यांना हा आक्षेप कबूल करावा लागला व ते म्हणाले, 'तर मग हें सम्राट बुद्धाचें ज्ञान इतर बुद्धाच्या मानानें कमी असेल व त्याबद्दल सांगणें कठीण आहे." सर्वज्ञता सर्वव्यापी व सर्वकालीन असते; तशी ती म० बुद्धाला प्राप्त झाली नव्हती हें यावरून उघड आहे. म० बुद्धाला बोधिवृक्षाखालीं झालेल्या ज्ञानाचें बाबतींत थेरी गाथेच्या भूमिकेंत बौद्धाचार्य लिहितात, 'बोधिवृक्षाखालीं बुद्धाला ज्ञान झालें तेव्हां रात्रीच्या पहिल्या प्रहरांत त्यानें आपले सर्व पूर्वजन्म जाणले. मध्यरात्रीं त्याला दिव्यदृष्टि प्राप्त झाली व रात्रीच्या अंतिमप्रहरांत त्याला वस्तुजाताचा कार्यकारणभाव पूर्णपणें कळून आला' या वर्णनावरून म० बुद्धाचें ज्ञान अवधिज्ञानाहून अधिक दर्जाचें नाहीं हें स्पष्ट आहे. संबोधी प्राप्त झाल्यानंतरहि लोकांना बोध देण्याइतका विश्वास म० बुद्धाला प्राप्त झाला नव्हता. नंतर कांहीं काळ तसेच ते एकांतांत राहिले होते. उलट भगवान महावीरांना केवलज्ञान झाल्याबरोबर उपदेशवाणी आपोआप वाहूं लागली. असो.

शेवटीं म० बुद्धांना पूर्ण समाधान प्राप्त झाल्यावर ते पूर्वी ज्या ज्या साधूकडे गेले होते त्यांना सांगावें म्हणून त्यांचा शोध करूं लागले. पण सांख्यमुनि आरादकालाम स्वर्गवासी झाले होते. नंतर पूर्वी भेटलेल्या ऋषींची त्यांनीं भेट घेतली. बुद्धाच्या म्हणण्यावर त्यांचा विश्वास बसेना, पण एकाचा बसला व तो कौंडिण्यकुलपुत्रच म० बुद्धाचा पहिला शिष्य होय. काशीच्या यशनामक एका वणिक पुत्रासहि त्यांनीं शिष्य केलें. याप्रमाणें एकसष्ट शिष्य झाल्यावर त्यांना म० बुद्ध म्हणाले, 'हे भिक्षूंनो, मी ऐहिक व लोकोत्तर अशा सर्व बंधनापासून मुक्त झालों आहे. तुम्ही सुद्धां तसे झाला आहां. म्हणून आतां अधिक शिष्य

मिळविण्यासाठीं व लोककल्याणासाठीं तुम्ही विहार करा' असें म्हणून उपसंपदेचा म्हणजे बौद्धदीक्षा देण्याचा अधिकार त्यांना देऊन म० बुद्धानें या एकसष्ट शिष्यांना चोहोंकडे पाठविलें. भगवान महावीर शिष्य धुंडत गेले नाहींत. ज्ञानोपदेश करणें हा त्यांचा स्वभाव होता, म्हणून तें काम सतत चालू होतें. ज्यांना ज्ञानपिपासा होती ते त्यांच्या समवसरणाकडे गेले. म० बुद्धानें अर्हत नांव धारण केलें व शिष्य गोळा करून आपल्या मताचा प्रचार केला. तसें करण्याची महावीर भगवानांना जरूरच नव्हती. त्यांना ममत्व नव्हतें, आग्रह नव्हता. शुद्धज्ञान त्यांचे जवळ होतें व त्याचे जे अधिकारी होते ते त्यांचे जवळ गेले व त्यांनीं तें प्राप्त करून घेतलें. बुद्धानें मूळ सिद्धांतिक गोष्टीबद्दल मौनच पत्करलें व सामान्य नीतीचा व समतेचा पुरस्कार करून मतप्रसार केला. जी बाब अनुभवाची आहे त्या बाबतींत वादाविवाद करूं नये हें योग्य होय; पण सर्वथा मौन बाळगणें हेंहि अज्ञानच होय. म० बुद्धाला संसारी जीवाला सांसारिक क्लेश होऊं नयेत एवढेंच हवें होतें व तेवढ्यासाठीं त्यानीं दयाधर्माचा प्रचार केला. मोक्षप्राप्तीची त्यांनीं फिकीर केली नाहीं व त्या अगम्य गोष्टीचा विचारच करूं नये असा त्यांनीं भिक्षूंना उपदेश केला. त्यांनीं काशीक्षेत्रीं खालीलप्रमाणें घोषणा केली 'गृहत्यागी जनांनीं दोन अतिरेकांपासून दूर राहिलें पाहिजे. एक अतिरेक चैनींत आयुष्य घालविण्याचा व दुसरा अतिरेक खडतर तपश्चर्येचा. चैनीचें आयुष्य हानिकारक व हलक्या मनोवृत्तीचें आहे. खडतर तपश्चर्येचें जीवन कष्टकर आहे व विशेष लाभदायक नाहीं. हे दोन्ही अतिरेक टाळण्यामुळेंच तथागताला ( बुद्धाला ) मध्यम मार्गाचें ज्ञान झालें आहे. हा मध्यममार्ग बुद्धि, ज्ञान, शांति, संबोधि व निर्वाण प्राप्त करून देणारा आहे.' पहिल्या अतिरेकाचा त्याग करण्यांतच माफक सुखोपभोगाचा विहितपणा म. बुद्धानें प्रतिपादिला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्वच पुद्गलाचा संबंध सोडण्याचा महावीर तीर्थंकराचा उपदेश कोणीकडे व हा उपदेश कोणीकडे? ध्येयाच्या उच्चनीचतेमुळें हा फरक पडला आहे. दया-भावानें प्रेरित होऊन बुद्धानें जीवांना संसारांत सुखी राहण्याचा उपदेश केला आहे तर संसारांत सुख होवो किंवा दुःख होवो; शाश्वत सुखाचा मार्ग भगवान महावीरांनीं सांगितला आहे. खडतर तपश्चरण करून विदेहीपण प्राप्त करून घेण्याकडे स्वतः बुद्धाची दृष्टीच नव्हती तेव्हां तपश्चर्येचे कष्ट त्यानें त्याज्य ठरविले असल्यास त्यांत

कांहींच नवल नाहीं. एक ठिकाणीं खुद्द बुद्धानेंच म्हटलें आहे कीं, 'दुःख वाईट आहे, व त्यापासून दूर राहिलें पाहिजे. अतिरेकांत दुःख आहे. तपश्चरण हा एक प्रकारचा आतरक आहे व दुःखकारक आहे. तपश्चरणाचें कष्ट सहन करून कांहीं प्रत्यक्ष लाभहि होत नाहीं. म्हणून तो निरर्थक आहे' चार्वाक ऐहिक सुखासाठीं ऐहिक भोगोपभोग भोगण्याचाच मार्ग सांगत होते व म. बुद्ध त्याच हेतूनें पण मार्ग मात्र दुसरा म्हणजे संयमादिकाचा सांगत होते एवढाच फरक; पण चार्वाकाप्रमाणेंच या जन्मानंतरच्या जीवनाबद्दल म. बुद्धांनीं शिष्यांपुढें तरी चर्चा केलेली नाहीं; मग ते स्वतः त्याबद्दल कांहींहि समजलेले असोत. या जीवनोत्तर स्थितीबद्दल त्यांनीं कांहीं साधनें सांगितलेली नाहीं व स्वतःहि मध्येंच सोडून दिली. म्हणून ते केवलज्ञानी नव्हते हें उघड आहे. उच्च परमार्थाच्या दृष्टीनें त्यांच्या उपदेशास विशेष किंमत नसून लौकिक पण शुद्ध सुखाच्या दृष्टीनें महत्व आहे; उलट भगवान महावीरांच्या उपदेशास मुख्यतः या जीवनोत्तर जीवनाच्याच दृष्टीनें महत्त्व आहे. इहलोकींचें खरें सुख त्यांत अंगभूत असूं शकेल; पण मुख्य विचार शाश्वत सुखाचाच आहे. खुद्द म. बुद्धानांहि महावीर तीर्थकराच्या माहात्म्याची कल्पना पूर्णपणें होती असें त्यांनीं वेळोवेळीं काढलेल्या उद्गारावरून दिसतें. खरें सर्वज्ञ किती आहेत म्हणून एकानें त्यांना विचारलें असतां, संसारी लोकांच्या कल्पनेंतहि न येणारी ती गोष्ट आहे असें त्यांनीं उत्तर दिलें. मज्झिमनीकाय, अंगुतरनिकाय, न्यायबिन्दु वगैरे अनेक बौद्धग्रंथांतून भगवान महावीरांच्या सर्वज्ञतेची स्तुति करण्यांत आली आहे. मज्झिमनिकायांत एक वचन खालीलप्रमाणें आहे. 'भिक्षूंनो, असे कांहीं संन्यासी आहेत कीं, जे म्हणतात प्राणी जें सुखदुःख भोगतात किंवा समभाव राखूं शकतात तो त्यांच्या पूर्वकर्माप्रमाणें होय. निर्ग्रंथ म्हणतात कीं, आमचे गुरु नातपुत्र सर्वज्ञ आहेत. आपल्या विशेषज्ञानानें त्यांनीं असा उपदेश केला आहे कीं, उग्र तपश्चर्या करून तुम्ही पूर्वकर्मांचा क्षय करा व नवीं वाईट कर्मे करूं नका म्हणजे सर्व दुःखाचा नाश होईल. भिक्षूंनो, मी या विचाराशीं सहमत आहे तथापि त्यांनीं तपश्चर्येचा निषेध केला आहे. याचें कारण ज्यांना उच्च ध्येय नाहीं व तपश्चर्येचे कष्ट सहन होणार नाहींत अशा जीवांना निरर्थक होणाऱ्या त्रासाची त्यांना कींव आली हेंच होय.

भगवान् महावीरांनीं बारा वर्षें तपश्चर्या करून केवलज्ञान प्राप्त झाल्यावर

धर्मोपदेशास वयाच्या ४३ व्या वर्षी सुरवात केली. म.बुद्धांनीं सहा वर्षे तपश्चर्या करून वयाच्या ३५ व्या वर्षी धर्मोपदेशास प्रारंभ केला. बोधिवृक्षाखालीं ज्ञान झाल्यानंतर ते प्रथम काशीस आले हें वर सांगितलेंच आहे. नंतर क्रमानें ते उरूबेला, गयासिस, राजगृह, कपिलवस्तु, श्रावस्ती, फिरून राजगृह, नंतर श्रावस्ती, फिरून राजगृह, पुन्हां काशी, भद्दिय, पुन्हां राजगृह, पुन्हां काशी, अन्धकविंदु, पुन्हा राजगृह, पाटलिग्राम, कोटिग्राम, नातिका, आपन, कुस्तीनारा, आतूम, पुन्हा श्रावस्ती, फिरून राजगृह, दक्षिणागिरी, वैशाली, पुन्हां काशी, पुन्हां श्रावस्ती, चंपा, कोशांबी, पारिलेय्यक, पुन्हां श्रावस्ती, बालकालोंकगांव, बेलु व कुशीनारा वगैरे गांवी गेले होते. आसपास भिक्षु पाठवून त्यांनीं मतप्रचार केला होता. कालानुसार नव्या गोष्टी त्यांना ज्या वाटल्या त्या ते भिक्षुद्वारा प्रस्तुत करीत. त्यांचा धर्ममार्ग अष्टांगमार्ग म्हणून प्रसिद्ध आहे. सत्यदृष्टि, सत्य-उपदेश, सत्यवार्ता, सत्यआचरण, सत्य जीवन, सत्य एकाग्रता, सत्य प्रयास व सत्य ध्यान हे ते आठ मार्ग होत. पहिला मार्ग सम्यक्दर्शनाशीं जुळता आहे. पण दोहोंच्या दृष्टिबिंदूत महत्वाचा फरक आहेच. पुढील तीन मन, वचन, कायेचे तीन सम्यक् योग म्हणतां येतील. पांचवा मार्ग सम्यक्चारित्राचा एक भाग होय. सहावा मार्ग धर्मध्यानासारखा आहे. सातवा शुद्ध परिणामाबद्दलचा आहे व आठवा मार्ग शुक्लध्यानाशीं थोडा जुळेल. या अष्टांग मार्गाचा उपदेश भिक्षु व भिक्षुणींसाठीं आहे; गृहस्थासाठीं हा नव्हे. पण यांतील बहुतेक जैन श्रावकांसाठींच जैनग्रंथांतून सांगितलेला आहे. बौद्धशास्त्रांतून आठ शील सांगितले आहेत. ते जैनी बारा शीलव्रतांशीं बरेच जुळतात. अहिंसा अस्तेय, पापत्याग किंवा ब्रह्मचर्य, सत्य, मादक वस्तूंचा त्याग, रात्रीं भोजन व अनियमित भोजनत्याग, नर्तन, गायन वगैरे विलासांचा त्याग व भूमिशय्या हीं आठ व्रतें होत दीघनिकाय नांवाच्या बौद्धग्रंथांत पहिल्या चार शीलांची पाणातिपात, अदिन्नादान, अब्रह्मचर्य, मुसावादत्याग, अशींच नांवें दिलीं आहेत. चातुर्मासांत विहार बंद ठेवण्याची पद्धत जैनमुनींवरूनच घेतली आहे. आस्रव, संवर, हेहि शब्द बौद्ध ग्रंथांत आहेत. यावरून जैनतत्वज्ञानाचा बौद्धावर किती परिणाम झाला आहे तें स्पष्ट दिसून येतें. पण दुःखाची गोष्ट एवढीच कीं, सर्व त्यानी विकृत किंवा विपरीत करून टाकलें आहे. अति भोगोपभोग भोगूं नये व तपश्चरण करूं नये हा मध्यम मार्ग ज्यांनीं जाणला तें बौद्धाकडून अर्हत मानले जात.

याच जन्मांत जो सुख भोगतो तो अर्हत. अष्टांगमार्ग ज्यानें पूर्णपणें आचरिला त्याला आर्यज्ञान प्राप्त होऊन निर्वाणप्राप्ति होते असें बुद्धानें म्हटलें आहे. एकंदरींत भगवान् महावीरांचा आत्मप्राप्तीचा मार्ग व म० बुद्धाचा सुख-प्राप्तीचा मार्ग या दोहोंमध्यें महदंतर आहे. बौद्धांच्या धर्मग्रंथाची रचना पाली भाषेंत आजपासून सुमारें बावीसशें वर्षांपूर्वींच झाली. या ग्रंथांचे तीन विभाग आहेत. विनयपिटक, सुत्तपिटक व अभिधम्मपिटक. पहिल्या पिटकांत भिक्षूंच्या आचारनियमांचें वर्णन आहे. दुसऱ्यांत म० बुद्धाचे उपदेश व तिसऱ्यांत बौद्ध तत्वज्ञान आहे.

डॉ. विमलचरण लॉ. एम्. ए. बी. एल्. एफ्. आर. एस्. हे जैन व बौद्ध अशा दोन्ही धर्मांच्या वाङ्मयांत पारंगत आहेत. त्यांनीं दोन्ही वाङ्मयांत आढळणाऱ्या कांहीं पारिभाषिक शब्दांची चांगली तुलना केली आहे. कर्म हा शब्द बौद्ध–वाङ्मयांतहि सांपडतो; पण जैनशास्त्रांत त्याचें जितकें सूक्ष्म विवरण आहे तितकें बौद्धग्रंथांतून नाहीं. कर्म पुद्गलाणु आहेत अशी शास्त्रीय मीमांसा जैनांशिवाय इतर कोणत्याहि तत्त्वज्ञानानें केलेली नाहीं. बौद्ध-शास्त्रांत जीव व अजीव या शब्दांचे जिवंत व निर्जीव असे सामान्य अर्थ घेतले आहेत; पण जैनतत्त्वज्ञानांत आत्मतत्व व जडतत्व या अर्थी ते वापरलेले आहेत. कर्मामुळें या दोन तत्वांचा संयोग झाल्यावर जी वस्तु बनते तिला जिवंत म्हणतां येईल; पण जैनशास्त्रांतील हा सूक्ष्म भेद लक्षांत न घेतांच बौद्ध-शास्त्रकारांनीं ते शब्द वापरलेले आहेत. आस्रव या शब्दाचे बाबतींतहि बौद्धांनीं असाच घोटाळा केला आहे. कर्म म्हणजे वैषयिक सुख, भाव म्हणजे जन्म, दिठ्ठि म्हणजे खोटा विश्वास व अविज्जा म्हणजे अविद्या या चारीमुळें जीं पातकें होतात त्याला बौद्ध ग्रंथांतून आस्रव म्हटलेलें आहे. अर्थात् बौद्धशास्त्रा-प्रमाणें आस्रव म्हणजे पापच होय. पण जैन शास्त्राप्रमाणें पुण्यास्रवसुद्धां आहे. शुभाशुभ कर्माचें द्वार म्हणजे आस्रव. कायावाचामनेंकरून जीं बरीं वाईट कर्में घडतात तीं सर्वच आस्रव. संवर शब्दाचा अर्थ बौद्ध शास्त्रकारांनीं संयम म्हणूनच केला आहे. पण जैनशास्त्राप्रमाणें त्या शब्दाचा अर्थ तोच असला तरी सूक्ष्म म्हणजे ‘ आस्रवनिरोधलक्षणः संवरः ’ असा आहे. उलट बंध या शब्दाचा अर्थ बौद्धांनीं संयोजन किंवा संयम म्हणून केला आहे तो अगदींच विचित्र आहे. जैनश्रावक हा गृहस्थहि असूं शकतो; पण बौद्धश्रावक हा भिक्षूच असला पाहिजे.

दुःखसमुदाय, दुःखनिरोध व दुःखनिरोधगामिनिपतिपदा या चतुष्टयाचें ज्ञान नसणें म्हणजे बौद्धशास्त्रांत अज्ञान मानलें आहे. धर्मास्तिकाय जैनशास्त्रांशिवाय अन्यत्र कोणत्याहि शास्त्रांत नाहीं. याची कल्पना बौद्धांच्या पटिकसमुप्पाद यासंबंधींच्या कल्पनेशी जुळणारी आहे. निर्वाण व आकाशधातु याशिवाय इतर सर्व बौद्धशास्त्र अशाश्वत मानतें. नरकाच्या कल्पना जैन व बौद्ध शास्त्रांत सारख्याच आहेत. संख्या व नांवें मात्र निराळीं आहेत. बुद्ध व तीर्थंकरांची संख्याहि समान आहे. नरकाप्रमाणेंच स्वर्गलोकांचीहि कल्पना बौद्ध व जैनांची समान आहे. अर्थात् स्वर्गनरक बौद्ध मानीत नाहींत म्हणून त्यांना नास्तिक म्हणण्यांत येतें असें जे म्हणतात तें चुकीचें आहे. आत्म्याचें भावी अस्तित्व ते विचारांत घेत नाहींत म्हणून नास्तिक गणले जातात. श्रावकाला कांहीं धंदे निषिद्ध आहेत तसे बौद्ध भिक्षूंच्या अनुयायांनाहि प्राण्यांची विक्री, शस्त्रव्यापार, मत्स्यविक्रय, मांसविक्रय व मदिराविक्रय हे पांच धंदे निषिद्ध आहेत. याला पन्नकवाणिज्य म्हटलें आहे. सुखाचा मार्ग शोधून काढण्यासाठीं गेल्यावर दीक्षा घेण्यापासून ते परिनिव्वाणापर्यंत म० बुद्धावर जैन तत्वज्ञानाची छाप पडत गेल्यामुळें बौद्ध-शास्त्रांत जैनसिद्धान्त बरेच आढळतात; पण त्यांचे पूर्णपणें आकलन न केलें गेल्यामुळें ते विपर्यस्त स्वरूपांत आढळतात. नंतरच्या बौद्धाचार्यांनीं तर जैन-शास्त्राची नक्कलच केली पण तीहि विपर्यस्तच झाली. असो.

कोणत्याहि धर्मसाधनांची योजना भक्कम पायावर करावयाची असेल तर मूल-सिद्धांन्ताचे बाबतींत असंदिग्धपणा टेऊन चालणार नाहीं. म. बुद्धाची हीच चूक झाली. आत्मा म्हणजे काय ? हें विश्व काय आहे ? पुढें निर्णय कसा होईल ? चालू जन्मांतील खरें सुख एवढें जरी ध्येय मानले तरी सुखाची व त्याच्या मार्गाची कल्पना येण्यास मूलभूत सिद्धान्तांचें ज्ञान होणें अगदीं आव-श्यक आहे. म. बुद्धाला तें कांहीं अंशीं झालें होतें व म्हणुनच ते कांहीं अंशीं कां होईना; पण खऱ्या सुखाचा मार्ग उपदेशूं शकले. पण तात्विक ज्ञान तितकें खोल नसल्यामुळें त्या वादविवादांत आपण टिकूं शकणार नाहीं असे म. बुद्धाला वाटलें असलें पाहिजे; म्हणूनच खालील प्रश्नांचें उत्तर म. बुद्धांनीं दिलेलें नाहीं. ( १ ) लोक नित्य आहे काय ? ( २ ) लोक अनित्य आहे काय ? ( ३ ) लोक नियमित आहे काय ? ( ४ ) लोक अनंत आहे काय ? ( ५ ) शरीर व आत्मा एकच काय ? ( ६ ) शरीर व आत्मा भिन्न आहेत काय ?

(७) ज्यानें सत्य जाणलें तो मरणानंतर जिवंत असतो काय? (८) तसें नसेल तर त्याचें काय होतें? (९) किंवा जिवंत असतो व नसतोहि? (१०) किंवा तो जिवंत नसतो व जिवंत असतो असेंहि नव्हे? याप्रमाणें स्याद्वाद-शैलीची नक्कल करून प्रश्न विचारण्यांत आले; पण त्यावर म. बुद्धांचें एकच उत्तर कीं, हे पोत्थपाद, या विषयावर मी आपलें मत प्रगट केलेलें नाहीं. विषयसेवन कां अधिक सेवन करूं नका? तर दुःख होतें म्हणून. पण दुःख कां होत यांचें कारण दिलें गेलें नाहीं. विषयसेवनांत सुखहि आहे व दुःखहि आहे; पण दुःखविरहित सुखाचा मार्ग अंधुकपणेंच म. बुद्धांनीं दाखविला आहे. शिवाय असें कां होतें याला उत्तर नाहींच. निदान भरतभूमींत तरी तत्व-ज्ञानाचें बूड नसलेले धर्म टिकणें अशक्य आहे व म्हणूनच येथें बौद्धधर्म नामशेष झाला. म. बुद्धानंतरच्या भिक्षुनीं ही त्रुटि ओळखून तत्वज्ञान रचलें; पण म. बुद्धानें घातलेल्या पायावरच तें रचावें लागलें. वैदिक धर्मानें भारतीय तत्वज्ञान पुष्कळ आत्मसात करून घेतलें; पण यज्ञसंस्था, बहुदेवतापूजन वगैरे मूळ पाया कांहीं सोडला नाहीं. तसेंच बौद्धधर्माचे बाबतींतहि झालें. व असेंच होणें स्वाभाविक आहे. म्हणूनच मूळ धर्मसंस्थापकाचें महत्त्व विशेष मानलें जातें. प्रथम तीर्थंकर ऋषभदेवानींच भारतीयतत्वज्ञानाचा पाया असा सुंदर घालून दिला कीं तो कालत्रयीं बदलावा लागत नाहीं व परिपूर्ण आहे. स्वच्छंदानें ज्यांनीं तो पाया सोडून दुसरीं मतें प्रस्थापित केलीं तीं टिकूं शकत नाहींत; एक जैनशासन मात्र अव्याबाध व शुद्ध राहिले आहे. जैन तत्त्वज्ञानाची बालजीव टिंगल करूं शकतील; पण त्यांत कोणालाहि दोष काढतां येणार नाहीं. अवघड आहे म्हणतां येईल; पण ध्येयसाधनास अपुरें असें म्हणतां येणार नाहीं.

बुद्ध व महावीर या पुस्तकांत गुजराथविद्यापिठाचे रजिस्टार श्री. मश्रूवाला खालीलप्रमाणें लिहितात, " बुद्ध व महावीर हे आर्यांच्या दोन स्वभावाचे द्योतक आहेत. एक प्रवृत्तिपर स्वभाव व दुसरा निवृत्तिपर स्वभाव. या जन्मा-नंतर काय होणार आहे याची फिकीर न करतां चालू जन्मांत जास्तींत जास्ती खरें सुख कसें मिळेल याची चिंता म. बुद्धांनीं केली. जन्मच जर दुःखकारक असेल तर तो आतां झालाच आहे. पुढें पुन्हा जन्म असेल तर त्या जन्मांतील सुखें या जन्मांत केलेल्या सुकृत्यावरच अवलंबून आहेत. म्हणून या जन्मीं पुण्य करणें इह व परलोकीं सुखकारक आहे. असा विचार करूनच या जन्मां-

तलि दुःख निवारण व्हावें म्हणून म. बुद्धानें अष्टांग मार्ग सांगितला. महावीराची दृष्टी निराळी आहे. त्याची दृष्टी भावी गतीकडे अधिक होती. ती सुधारण्यासाठीं या जन्मीं ते वाटेल तितके कष्ट सहन करण्यास तयार होते व होण्यास सांगत. सुख–दुःखाचें कारण शोधूं जातां, तें आपण केलेल्या कर्मांतच सांपडतें म्हणून पूर्वजन्मीं आपण काय केलें व काय होतों आणि पुढील जन्मीं काय होऊं याचा विचार करावा लागतो. पूर्वजन्मीं जशीं कर्में आपण केलीं तशीं बरीवाईट फळें आपणांस या जन्मीं मिळत आहेत. घड्याळांतील लंबक जसा इकडून तिकडे हालत असतो तसा हा जीव जन्म व मरण यामध्यें येरझारा घालीत असतो. घड्याळाला चावी नसेल तर लंबक हालत नाहीं. त्याचप्रमाणें कर्माची चावी दिलेली नसेल तर जीवाला जन्म–मरणाचे फेरे फिरावे लागणार नाहींत हा फेरा सुखकारक नाहीं. क्वचित सुख होतें; पण तें क्षणभंगुर असतें. शिवाय या क्षणभंगुर सुखामुळें त्या फेऱ्यांना अधिक गतिहि मिळते. म्हणून परिणामतः हें क्षणभंगुर सुखहि दुःखकारकच आहे. कांहींहि करून या दुःखांतून सुटलें पाहिजे व त्यासाठीं कर्माच्या किल्लीचे फेरे कमी केले पाहिजेत. म्हणून हे फेरे कमी करण्यासाठीं प्रयत्न करण्याकडेच आर्यांची अधिक प्रवृत्ति आहे. कर्माची दिलेली किल्ली कशी तरी सोडविण्याचा ते प्रयत्न करतात. महावीरस्वामी या प्रयत्नाचेंच आदर्श होत. त्यांनीं कर्मक्षयासाठीं खडतर तपश्चरण केलें !" जर्मनींतलि एका पंडितानें महावीर व बुद्ध या नांवाचेंच पुस्तक लिहिलें आहे व त्यांतहि त्यानें वरील मत प्रगट केलें आहे. म. बुद्धाचा मार्ग ख्रिस्ताप्रमाणें इहलोकांतील प्रवृत्तिसाधक आहे व भगवान महावीराचा मार्ग निवृत्तिपर अतएव कांहीं तरी पारलौकिक ध्येयासिद्धीसाठीं आहे असें जें म्हटलें जातें तें खरें आहे. म. बुद्धाला ऐहिक खरें सुख मिळवावयाचें होतें व म. ख्रिस्ताला भांडखोर लोकांना गुण्यागोविंदानें नांदावयास शिकवावयाचें होतें. म्हणून अष्टांगमार्ग व सामान्य नीति आणि 'Sermon on the mount' सांगून या जगांत सुख–दुःख भोगण्यास यावेंच लागूं नये असा मार्ग त्यांना सांगावयाचा होता. बुद्धादिकांना विषारी वृक्षाला निर्विष करावयाचें होतें. भगवान महावीरांना त्याचें मूळच्छेदन करावयाचें होतें. या ध्येयभिन्नतेमुळें दोघांचे मार्गहि भिन्न झाले.

भगवान् महावीरांचा काल इ. स. पू. ६१७ ते इ. स. पू. ५४५ आणि म बुद्धाचा काल इ. स. पू. ६२३ ते इ. स. पू. ५४३ आहे. त्यावरून भगवान

महावीरांचा जेव्हां जन्म झाला तेव्हां म. बुद्ध सहा वर्षांचे होते. महावीरस्वामींनीं जेव्हां दीक्षा घेतली तेव्हां म. बुद्ध छत्तीस वर्षांचे होते व धर्मप्रचार करूं लागले होते महावीर भगवानांना केवलज्ञानप्राप्ती होऊन तेहि जेव्हां धर्मप्रभावना करूं लागले तेव्हांपासून अर्थातच म. बुद्धाचा प्रभाव कमी झाला व म्हणून इ. स. पू. ५०३ ते इ. स. ५५३ पर्यंतची गौतमबुद्धाच्या जीवनाची हकीगत बौद्धग्रंथांतून मुळींच मिळत नाहीं. नंतर कांहीं जैनराजे म. बुद्धाला मिळाल्यामुळें भगवान् महावीरांची धर्मप्रभावना चालू असूनही फिरून म. बुद्धाचा प्रभाव पडूं लागला व त्यानंतर दहा वर्षांनीं महावीर तीर्थंकर निर्वाणाला गेल्यामुळें म. बुद्धाच्या आयुष्याची शेवटचीं दहा वर्षें भरभराटींत गेलीं. महावीरनिर्वाणाचे वेळीं म. बुद्ध हयांत होते व त्यांनीं निर्वाणवार्ता ऐकून एक प्रवचन भिक्षूंना दिलें होतें. याप्रमाणें या दोन सम-कालीन थोर पुरुषांचा जीवनक्रम आहे. म. बुद्धाचा उपदेश ख्रिस्ताच्या शिकवणीशीं बराच जुळत असल्यामुळें पाश्चिमात्य विद्वानांचे बौद्ध इतिहासाकडे बरेंच लक्ष वेधलें. ब्रह्मदेश व सिलोनमधील बौद्ध भिक्षूंनींहि प्राचीन बौद्धवाङ्मयाची बरीच सेवा केली असल्यामुळें बौद्धग्रंथ मुबलक मिळण्याची सोय झाली आहे. महावीरचरित्राचे बाबतींत व जैनवाङ्मयाचे बाबतींत जैनांनीं विशेष प्रयत्न केले नाहींत. शिवाय हीं दोन्ही अलौकिक असल्यामुळें सामान्य मानवी बुद्धीला आकर्षकहि वाटत नाहींत. त्यामुळें महावीरचरित्राबद्दल व इतर जैन वाङ्मयाबद्दल इतर लोकांनींहि सायास केले नाहींत, तथापि अलिकडे जैन विद्वानांचें लक्ष या कार्याकडे वेधलें असल्यामुळें इतर संशोधकांचेंहि वेधेल व सत्य इतिहास मिळूं लागेल अशी आशा वाटते. महावीर तीर्थंकर हे ऐतिहासिक पुरुष होते, व त्यांच्या जीवनाचा आणि तत्वज्ञानाचा बराच प्रभाव म. बुद्ध व त्यांच्या तत्वज्ञानावर झाला आहे यांत मुळींच शंका नाहीं. या दोहोंपैकीं श्रेष्ठ कोणते व प्राचीन कोणते ते आतां सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट झालेलें आहे.

## प्रकरण अकरावें.

# महावीर निर्वाणकल्याणक.

केवलज्ञान प्राप्त झाल्यानंतर इंद्रादि देवतांनीं समवसरणाची रचना केली व तीर्थंकराचे सर्व अतिशय महावीरस्वामींना प्राप्त झाले. भव्य जीवांना उपदेश देणें हा तीर्थंकराचा स्वभाव आहे. त्याला अनुसरून जिनवाणी सुरू झाली. सर्व गतींतील भव्य जीवांना ती वाणी समजूं लागली. भगवानानीं नंतर तीस वर्षे विहार करून धर्मप्रभावना केली. चातुर्मासांत ते एक ठिकाणीं रहात असत. चार चातुर्मास त्यांनीं वैशाली आणि वणिक्ग्रामांत केले. चौदा राजगृह व नालन्द नगरीच्या आसपास केले. सहा मिथिला नगरींत केले. दोन भद्रिकापुरींत, एक अलभीक नगरींत, एक प्रान्थिभूमींत, एक श्रावस्वती नगरींत सर्व शेवटचा पावापुरींत त्यांनीं केला. मागलि एका प्रकरणांत जें वीरशासन दिलें आहे तोच त्यांचा उपदेश होय. वीरवाणी काय आहे, तें त्यावरून कळून येईलच; पण तिचें विशेषत्व काय आहे तें आतां पाहूं. कोणत्याहि उपदेशांचें महत्त्व ते उपदेश करणारावर बरेंच अवलंबून असतें. उपदेशकर्त्यांची जशी ताकद व जसा दृष्टिकोन असेल त्याचप्रमाणें तो उपदेश वठतो. म. बुद्धांनीं अहिंसा, निर्वाण वगैरे बडी बडीं नांवें घेतलीं; पण त्यांचीं अहिंसा म्हणजे सामान्य भूतदया व निर्वाण जिवंतपणीं साम्यावस्थेमुळें प्राप्त झालेली सुखावस्था. व्यास महर्षींच्या गीतेंतलि उपदेशाचें जें सार तेंच म. बुद्धाच्या उपदेशाचें सार. पण अहिंसा व निर्वाण यांचें खरें महत्त्व व मर्म वीरानुशासनांत आपणास पाहावयास मिळतें. अहिंसा म्हणजे केवळ दया नसून त्रस व स्थावर कोणत्याहि पदार्थांना प्रमाद–पूर्वक उपसर्ग न पोहोंचविणें म्हणजे अहिंसा होय. निर्वाणावस्था ही शाश्वत सुखावस्था आहे. ती सर्व कर्मांचा क्षय झाल्यानंतरच प्राप्त होते. याप्रमाणें एकाच शब्दांत केलेल्या उपदेशाच्या मर्मांत जें महदंतर पडलें,त्याला कारण उपदेशकाची योग्यता व दृष्टिबिंदू आहे. महावीर स्वामींची योग्यता विशेष होती. म. बुद्धाच्या दृष्टीनें त्यांची योग्यता किती अधिक होती तें मागील प्रकरणांत दाखविलेंच आहे. वैदिक लोक ज्यांना अवतार म्हणताल त्या सर्वांच्या लायकीहून भगवान महावीरांची लायकी अधिक होती. अवता-

रांना विकार होते व म्हणूनच ते अवतार घेऊन शत्रूंचे निर्दलन व भक्तांचें संरक्षण करूं शकले. भगवान महावीर पूर्णपणें वीतरागी होते. अवतारहि आत्मबलशाली होते; पण त्यांच्या बलाचा उपयोग लौकिक हेतूसाठींच झाला. महावीरस्वामींनीं आपल्या आत्मबलाचा उपयोग सर्व पूर्व कर्मांचें छेदन करून फिरून कर्मे घडूंच नयेत अशी अवस्था प्राप्त करून घेण्याकडे केला. तशी निरुपाधिक व वीतरागावस्था त्यांनीं प्राप्त करून घेतली असल्यामुळेंच अवतार व म. बुद्धासारख्या पेक्षां ते अधिक श्रेष्ठ प्रतीचे आप्त ठरतात. धर्मशास्त्रांत ज्या आप्तवचनाला महत्त्व आहे तें आप्तवचन वीतराग व निरुपाधिक शुद्धात्म्यांचें होय. सहेतुक कार्य करणाऱ्या अवतारांचें नव्हे. म्हणून रामकृष्णादि अवतारांचें उपदेश भगवान महावीराच्या उपदेशापुढें म. बुद्धाच्या उपदेशाप्रमाणेंच फिके पडतात. कारण महावीरासारख्यांची ताकद व दृष्टिकोनच निराळा असतो. जी गत अवतारांची तीच आचार्यांची. मनःशुद्धी करून घेऊन व त्यागी बनून हे आचार्य उपदेश करूं लागतात; पण त्यांना पूर्ण अनुभव झालेला नसल्यामुळें व केवलज्ञानहि प्राप्त झालेलें नसल्यामुळें त्यांना स्वमताचा कदाग्रह हा असतोच आणि म्हणूनच आचार्यांचीं तत्त्वज्ञानें भिन्न आहेत व एकेकाचा हट्ट धरून एकेका आचार्यांनीं तीं प्रसृत केलीं आहेत. हीं सर्व एकांतिक मतें असून सार्वगिक उपदेश एक सर्वज्ञ तीर्थंकर व सिद्धाचाच आहे.

तीर्थंकरांच्या सार्वगिक ज्ञानापुढें इतर सर्व मतप्रवर्तकांचें ज्ञान कोतें ठरतें. प्रत्येक मतप्रवर्तकानें आपल्या कोत्या बुद्धीनुसार निर्गुण किंवा सगुण उपासना, ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग, किंवा कर्ममार्ग यापैकीं एखाद्या मार्गाचा अट्टाहासानें उपदेश केलेला आहे. कांहीं जीवांना मार्ग सांगतांना इतर जीवांची त्यांनीं अगदीं उपेक्षा केली आहे. कित्येकांनीं तर इतर जीवांचा उच्छेद करणें हाहि धर्ममार्ग म्हणून सांगितला आहे. अशा धर्मोपदेशकांची जेवढी कींव करावी तेवढी थोडीच. तीर्थंकरांच्या उपदेशांत असा एकांगीपणा व कदाग्रह नाहीं. शिवाय त्यांचा उपदेश सर्व प्रकारच्या जीवांना आपल्या कुवतीनुसार पाळतां येण्याजोगा आहे. महावीरांच्या उपदेशानुसार कोणी धर्मसाधन करूं लागला तर तें साधन दुसऱ्या जीवाला उपसर्गकारक होईल असें कधींहि घडणार नाहीं. नाहींतर यज्ञमार्गी किंवा अर्जुनासारख्या कर्मयोग्यांचें पाहा! लाखो जीवांची हत्या करावी तेव्हां त्यांचें धर्मसाधन व्हावयाचें! हा धर्म उपदेशिणाऱ्यांनीं त्या

मार्गामुळें ज्यांना अडथळा येईल त्यांनांहि धर्मबिर्म कांहीं आहे याचा विचारहि केलेला नाहींसें दिसतें. तो केला असता तर त्यांनीं असा मार्ग उपदेशिला नसता. महावीरांचा उपदेश इतर जीवांच्या धर्मसाधनाचे आड कधींहि येणार नाहीं व म्हणूनच त्यांचाच मार्ग काय तो खरा अहिंसक आहे असें म्हटलें जातें. त्यांनीं एकांतिक कर्म, भक्ति, ज्ञान किंवा इतर साधनांचा हट्टानें उपदेश केला नाहीं. ज्ञानहीन कर्मानें, आंधळ्या भक्तीनें, लुल्या ज्ञानानें, श्रद्धाहीन क्रियेनें किंवा वांझ उपासनेनें मुळींच आत्मप्राप्ती होणार नाहीं हें त्यांनीं बरोबर जाणलें होतें व म्हणूनच सम्यक्ज्ञान, सम्यक्दर्शन व सम्यक्चरित्र या रत्नत्रयीच्या एकदम व पूर्ण आराधनानेंच मोक्षमार्ग लाधेल; एकांतिक मार्गानें मोक्षप्राप्ति होणार नाहीं असें निक्षून सांगितलें आहे. निर्गुण किंवा सगुण उपासनेचाहि त्यांनीं हट्ट धरलेला नाहीं किंवा अमुकच एखाद्या साधनाचा हट्ट नाहीं. ज्याच्या त्याच्या कर्मानुसार ज्या जीवाला जें साधन अनुकूल असेल तें त्यानें करावें; पण ज्ञान, दर्शन व चारित्र्याचा समन्वय मात्र करावा यावर त्यांचा विशेष कटाक्ष आहे. कारण पूर्ण विश्वास पैदा झाल्याशिवाय शुद्ध ज्ञान होत नाहीं व शुद्ध-ज्ञानाशिवाय खरें चारित्र पाळलें जात नाहीं आणि निर्मळ चारित्र्याशिवाय मोक्ष-प्राप्ति दुर्लभ हें सर्वज्ञ तीर्थंकराइतकें दुसऱ्या कोणीहि मतप्रसारकानें जाणलें नाहीं.

विश्वाचें कोडें उलगडण्यांच्या बाबतींत तीर्थंकर जितके यशस्वी झाले आहेत तितके दुसरे कोणतेहि मतप्रवर्तक झालेले नाहींत. एक म्हणतो ईश्वरानें सहा दिवसांत सृष्टि निर्माण केली व सातवे दिवशीं विश्रांति घेतली. दुसरा म्हणतो अल्लानें सर्व सृष्टि पैदा केली. तिसरा म्हणतो परमात्म्यानें ब्रह्मदेवाकडून सृष्टि घडविली. कोणी म्हणतात ही सर्व सृष्टि दिसते ती नाहींच मुळीं; मग तिच्या उत्पत्तिस्थितीलयाचा प्रश्नच कोठें राहिला? कोणी म्हणतात, ती मूळ पुरुषानें प्रकृतीपासून निर्माण केली. कोणी म्हणतात, हिच्या मुळाशीं पंचभूतें आहेत किंवा कांहीं ठराविक तत्त्वें आहेत. याप्रमाणें हा ब्रह्मघोटाळा आहे. एक तीर्थं-करांनींच विश्वाचा समाधानकारकपणें उलगडा केला आहे. जीव, अजीव, धर्म, अधर्म, आकाश व काल या षट्द्रव्यांच्या घडामोडींमुळें हें विश्व चाललें आहे. तें अनादि अनंत आहे. त्याची उत्पत्ति किंवा प्रलय होत नसून नेहमीं रूपांतर होत असतें. जीव एक नसून अनंत आहेत. तो मूलत: अशुद्ध आहे; पण शुद्ध

होण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे. सात तत्वांमुळें किंवा नऊ पदार्थांमुळें जीव शाश्वत मोक्ष मिळवूं शकतो. सार्वगिक साधनहि मोक्षासाठीं सांगितलेलें आहे. विश्वाचें कोडें उलगडण्याचा प्रश्न बुद्धिग्राह्य नसल्यामुळें निश्चयपूर्वक सर्वच कांहीं सांगतां येणार नाहीं व पटवून तर देतां येणार नाहींच व म्हणूनच वरवरहि मूर्खपणाचीं दिसणारीं मतें सृष्टीच्या घडामोडीचे बाबतींत प्रचलित आहेत. पण त्या सर्वांत तीर्थंकर प्रतिपादित मत जितकें शुद्ध व ग्राह्य वाटतें तितकें दुसरें कोणतेंच वाटत नाहीं. विश्वाच्या मूळ कोड्याच्या बाबतींत व धर्ममार्गाचे बाबतींत इतके शुद्ध व समर्पक विचार प्रदर्शित करण्याची पात्रता तीर्थंकराशिवाय इतरांत नाहीं व तीर्थंकर आणि सिद्धांतहि ती सर्वज्ञतेमुळें आली, अनंतदर्शनामुळें आली व शुद्ध चारित्राचें फळ म्हणून प्राप्त झालेल्या वीतरागता व निरूपाधिकत्वामुळें मिळालेल्या अनंतवीर्य व अनंतसुखामुळें आली. हे अनंत चतुष्टय तीर्थंकर व सिद्धांशिवाय इतरांना नाहीं व म्हणूनच त्यांचें अभिप्रायहि एकांतिक आहेत. तीर्थंकर सर्वज्ञ होते हें त्यांचे ज्ञानच सांगते. अनंतदर्शनाशिवाय असलें ज्ञान प्राप्त होणार नाहीं. अनंतसुख व अनंतवीर्य तीर्थंकरांना असतें व म्हणूनच सामान्य जीवांना जें असह्य कष्ट होत असतात ते त्यांना होत नाहींत. त्यांना अशक्य असें कांहीं नाहीं व दुःख कशापासूनहि होत नाहीं. सर्व तीर्थंकरांच्या चारित्रावरूनहि हीच गोष्ट दिसून येते. या अनंतचतुष्टयाची पूर्ण कल्पना सामान्य जीवांना येणें अशक्य आहे. कांहीं जीवांना त्याची अंधुक कल्पना येऊं शकेल व असे धर्मात्मे जीवहि फारच थोडे असतात. हे अनंत चतुष्टय हा तीर्थंकर व सिद्धांचा विशेष होय आणि म्हणूनच ते सार्वगिक व सर्वग्राह्य असा उपदेश देऊं शकले.

एकंदरींत प्रत्यक्ष अनुभव घेऊन तीर्थंकर व सिद्धांनीं उपदेश केला असल्यामुळें त्यांचा उपदेश सर्वग्राह्य व त्रिकालाबाधित आहे व तो उपदेश सर्वांना लागू पडणारा असूनहि परस्परविरोधी नाहीं, आणि म्हणूनच तो त्रिकालाबाधित व सार्वगिक आहे. जैन सिध्दान्ताची स्याद्वाद–शैली तर अप्रतिम आहे. डॉ. भांडारकरांनीं त्यावर अभिप्राय देतांना खालील उद्गार काढले आहेत. ' कोणत्याही विषयासंबंधीं विचार करण्याचे दोन मार्ग आहेत. एक द्रव्यार्थिकनय व दुसरा पर्यायार्थिकनय. मूळ पदार्थाचें बाह्य स्वरूप पालटलें म्हणजे त्याचा आपण पर्यायार्थिकनयानें विचार करतो त्या पदार्थाच्या मूळ स्वरू-

याचा जेव्हां विचार करतो तेव्हां द्रव्यार्थिकनयानें विचार करतो-आत्मा जेव्हां त्याच्या पापपुण्यानुसार देव, मनुष्य, तिर्यंच व नरक गतींत असतो तेव्हां पर्यायार्थिक नयानें त्याला देव, मनुष्य, तिर्यंच किंवा नारक म्हणतां येईल; पण द्रव्यार्थिकनयानें त्याला आत्माच म्हणावें लागेल. एखाद्या वस्तूला एकाच वेळीं ती अमुक वस्तू आहे असें जसें तुम्ही म्हणूं शकाल, तसें ती अमुक वस्तु नाहीं असेंहि म्हणूं शकाल. याप्रमाणें सप्तभंगीनयानें किंवा सात प्रकारानें वस्तूचें स्वरूप सांगण्याची पद्धत आहे. घटाची उत्पत्ति म्हणजे पूर्वी नसलेल्या पदार्थाची उत्पत्ति असें पर्यायार्थिक नयानें म्हणतां येईल. पण पूर्वी जिचें अस्तित्वहि नव्हतें अशा वस्तूपासून कांहीं घट बनला नाहीं. मृत्तिका पूर्वी होतीच म्हणून द्रव्यार्थिकनयानें घटाला मृत्तिका म्हणतां येईल. या रीतीनें एका अपेक्षेनें तुम्ही पदार्थाचें अस्तित्व कबूल कराल. दुसऱ्या अपेक्षेनें अस्तित्व नाकारू शकाल; पण निरनिराळ्या वेळींच एखाद्या पदार्थाचें अस्तित्व व नास्तित्व दोन्ही तुम्ही दाखवूं शकाल. एकाच वेळीं मात्र एखाद्या पदार्थाचें अस्तित्व व नास्तित्व एकाच अपेक्षेनें सांगणें अशक्य आहे. याचप्रमाणें एका अपेक्षेनें एखाद्या वस्तूचें अस्तित्व सांगणें अशक्य होईल. नास्तित्व सांगणें अशक्य होईल, व अस्तित्व नास्तित्व दोन्ही सांगणें अशक्य होईल. म्हणून अनेकांतवादाचा किंवा सप्तभंगी न्यायाचा निष्कर्ष हा कीं, एखादी वस्तु सर्व दृष्टीनें, सर्व काळीं व सर्व प्रकारें असते, असें मानतां येणार नाहीं. एखादी वस्तू एका ठिकाणीं असेल तर दुसऱ्या ठिकाणीं नसेल. एका वेळीं असेल, तर दुसऱ्या वेळीं नसेल; एखाद्या रूपांत असेल व दुसऱ्या स्वरूपानें नसेल. यावरून कोणत्याहि वस्तूच्या स्वरूपाचा निश्चय करतां येणार नाहीं' असें जें कांहीं विद्वान म्हणतात तें मात्र खोटें आहे. उलट या उपाया-मुळेंच खरा व शुद्ध निश्चय होईल. प्रत्येक निर्णय सापेक्षपणानें करावा. हाच सप्तभंगीन्यायाचा उद्देश आहे. शंकराचार्यांनीं 'नैकस्मिन्संभवात्' म्हणजे एकाच वेळीं अस्तित्व व नास्तित्व कसें सांगता येईल, असा आक्षेप स्याद्वादाचे बाबतींत आणला आहे. पण तो भ्रामक आहे हें डॉ. भांडार-करांनींहि म्हटलेंच आहे. उलट शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धान्तच भ्रामक आहे ही गोष्ट अबालवृद्धांच्या परिचयाची आहे. एखाद्या पुरुषाला तो सर्वांचा सर्व काळीं बाप आहे हें म्हणणें जसें भ्रामक, तसेंच एक ब्रह्मच सर्वत्र, सर्वकाळीं

भरलें आहे हें ह्मणणें भ्रामक होय. तो पुरुष पुत्रापेक्षेनें बाप असेल; पण पित्रापेक्षेनें पुत्रहि आहे हेंच स्याद्वादांतील मर्म आहे. हें मर्म न ओळखल्या-मुळेंच इतर मतें एकांतिक बनलीं आहेत; पण जैनमत सार्वगिक व परिपूर्ण आहे.

महावीर तीर्थकरांच्या उपदेशाचें सार थोडक्यांत खालीलप्रमाणें आहे. ( १ ) हें विश्व अनाद्यनंत व स्वयंभू आहे. त्यांत जीव, अजीव, धर्म, अधर्म, आकाश व काल हीं सहा द्रव्यें अनाद्यनंत व स्वयंभूच आहेत. जीव भिन्न व अनंत आहेत. ( २ ) स्वभावतः हीं द्रव्यें नित्य असलीं तरी पर्यायांत-रामुळें व त्या दृष्टीनें अनित्यहि आहेत. ( ३ ) संसारी जीव अनादि-कालापासून जड व पापपुण्यमय कर्मपुद्गलांच्या संयोगामुळें अशुद्ध आहे. ( ४ ) कषायजन्य मनवचनकाययोगामुळें जीवाला कर्मबंध होतो. व त्याच तीन शुद्ध योगामुळें तो कर्मबंधनांतून विमुक्तहि होतो. ( ५ ) कर्माचा फलदाता कोणी ईश्वर नसून पापपुण्यानुसार जीव सद्भाव व असद्भाव देऊन सुख-दुःख भोगावयास लावतो. ( ६ ) मुक्त जीवहि संसारी जीवाप्रमाणें अनंत व भिन्न आहेत. ते फिरून संसारी होत नाहींत. ( ७ ) मुक्तात्मे तीर्थंकर व सिद्धांची उपासना केल्यानें ते प्रसन्न होऊन मुक्ति देत नाहींत; पण उपासकाचे भाव या भक्तीमुळें शुद्ध होऊन त्याला मोक्षफल मिळतें. ( ८ ) क्रोध, मान, माया व लोभ या चार कषायमुळें कर्मबंध होतो. कषायवृत्ति सोडून वीतरागमय आत्मा समाधिस्थ केल्यानें कर्मबंधाचा नाश होतो. म्हणून मुक्तीचें साधन जीवा-चेच हातीं आहे. ( ९ ) अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे परम धर्म होत. निर्ग्रंथमुनि हे धर्म पूर्णपणें पाळतात. गृहस्थीजनानीं आपापल्या कुवतीनुसार पाळावेत. ( १० ) मुनि व गृहस्थाचीं नित्य षट्कर्मे अनुक्रमें खाली-लप्रमाणें आहेत. सामायिक, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान, मुक्तात्मस्तुति, मुक्तात्मवंदन व कार्योत्सर्ग, आणि सद्देवपूजा, सद्गुरुभक्ति, सच्छास्त्रपठण, संयम, तप व दान. ( ११ ) मुनि निर्ग्रंथ असतात. ते आरंभ व परिग्रहाचा त्याग केलेले असतात. ( १२ ) गृहस्थाचे खालील आठ मूलगुण आहेत. तप, मांस व मदि-रेचा त्याग, आणि पंचाणुव्रतांचें पालन. ( १३ ) जीव, अजीव, पुण्य, पाप, आस्रव, संवर, बंध, निर्जरा व मोक्ष हे नऊ पदार्थ अनाद्यनंत आहेत. ( १४ ) ईश्वर म्हणजे स्वयंभू, अकलंक, वीतराग, उपाधिरहित व चैतन्यमय शुद्धात्मा होय. असे ईश्वर अनंत आहेत. ( १५ ) आत्मतत्त्व व जडतत्त्व हीं अगदीं भिन्न

आहेत. त्यांचा संयोग होतो; पण ती कधींहि एक होणार नाहींत. (१६) सम्यक्दर्शन, सम्यक्ज्ञान व सम्यक्चरित्र या रत्नत्रयीच्या एकसमयावच्छेदें उपयोग करूनच संसारी जीव मुक्तात्मा होऊं शकतो. (१७) भव्यात्म्याशिवाय इतर जीवांना मुक्ति मिळत नाहीं व मानुषभवाशिवाय इतर भवांतून जीव मुक्तीला जात नाहीं. याशिवाय इतरहि अनेक विशेष उपदेश आहेत; पण आत्मोन्नतीच्या बाबतींत पूर्णश्रद्धा, जीवाजीवांचें पूर्ण ज्ञान व स्वावलंबनाचे जोरादर अजीवाचे संयोगापासून सुटण्याचे प्रयत्न या तीन गोष्टी संसारी जीवानें केल्या पाहिजेत हेंच महावीर तीर्थकरांच्या उपदेशाचें मुख्य सार आहे. या बाबतींत अश्रद्धा नुकसानकारक ठरते. अपुरें ज्ञान घातुक होतें व परावलंबन विपरीत परिणाम करतें. स्वच्छंद हा केव्हांहि वाईटच. पण सम्यक् आलंबन घेणेंहि महत्त्वाचें आहे. स्वच्छंद व वाईट आलंबन हीं दोन्ही त्याज्यच होत.

पावापुरीचा हस्तिपाल राजा तीर्थंकर संघाची सेवा करण्याची आशा फार दिवसापासून करीत होता व शेवटीं ती एकदां फळीभूत झाली. मनोहर नांवाच्या बागेंत तीर्थंकरसंघ उतरला होता. नांवाप्रमाणेंच तो बगिचाहि अतिशय मनोहर होता. पावापुरीच्या लोकांनीं गुढ्यातोरणें उभारून, सडासंमार्जन करून व रांगोळ्या घालून पुरी शृंगारली होती. सर्व नरनारी व बाल उच्च वस्त्रें परिधान करून व अलंकार धारण करून भगवानाला वंदन करण्यास गेले. मनोहर बगीच्यांतील एका तलावांत लहानशी बाग बनविण्यात आली होती. त्यांत भगवान महावीर बसले होते. निर्वाणकाल समीप आल्यामुळें समवसरण आतां विघटित झाले होते. तीर्थंकराच्या तीस वर्षांच्या उपदेशानें सर्वत्र इतका समभाव पसरला होता कीं, सिंहगज, मृगव्याघ्र, मार्जारमूषक वगैरे प्राणीहि आपलें नैसर्गिक वैर विसरून गेले होते. मग मनुष्यप्राण्यावर भगवानाच्या उपदेशाचा परिणाम झाला असल्यास त्यांत काय नवल! असा समताभाव सर्वत्र उत्पन्न झाल्यामुळें सुखशांति नांदत होती. सर्व वनस्पतीहि प्रफुल्लित दिसत होत्या. समवसरण विघटित झालेले पाहून तीर्थंकराचा निर्वाणकाल जवळ आला असें इंद्रादि देवानीं जाणले. कार्तिक व० १४ चे रात्रीं चंद्र स्वाति नक्षत्राला असतांना सन्मति भगवानानीं षष्ठोपवास धारण करून योगनिरोध करून, कायोत्सर्ग करून, सर्व कर्मांचा नाश केल्यावर महावीर तीर्थंकराचा आत्मा मोक्षशिलेला गेला. लगेच इंद्रादि देवानीं तीर्थंकर शरीराला निर्वाणकल्याणक केले. ज्या

वेळेस महावीरांचा आत्मा मोक्षशिलेकडे चालला त्या वेळीं कृष्णपक्ष असूनहि चंद्रप्रकाशाहून अधिक तेजस्वी प्रकाश सर्वत्र फाकला होता. त्यामुळें सर्व ठिकाणच्या प्राणीमात्रांना महावीरनिर्वाणाची खबर कळली. समुद्र गर्जू लागला होता. पृथ्वी कंपायमान होत होती. देवलोकांतील घंटा आपोआप वाजूं लागल्या होत्या. याप्रमाणें पावापुरींत महावीर तीर्थंकरांचें निर्वाणकल्याणक झालें. पावापूरीचें वर्णन बॅ. जुगमंदरलाल जैनी. एम्. ए. यांनीं खालीलप्रमाणें केले आहे. ' पावापुरींत मातीचींच घरें आहेत. व तें लहानसेंच गांव आहे; पण ते अंतिम तीर्थंकरांचें मोक्षस्थान असल्यामूळें पावापुरीला विशेष महत्व आहे. यात्रेकरूंसाठीं कित्येक टोलेजंग धर्मशाळा आतां तेथें झाल्या आहेत. पांच सहा मंदिरेंहि बांधलीं गेलीं आहेत. महावीरनिर्वाण तिर्थाला तेथें मोठी यात्रा जमते. नेहमीं यात्रेकरू येत असतातच; पण निर्वाण तिर्थापासून कांहीं महिनेपर्यंत यात्रेकरू बरेच येतात. ज्या तलावांतील बागिच्यांत महावीरस्वामी मोक्षाला गेले तो तलाव हल्लींहि आहे. त्यांत बगिचा केलेला असून त्यामध्यें महावीरस्वामींचें चरणयुगुल आहे. तलावामुळें त्या तीर्थाला फारच शोभा आली आहे. पाण्यांत मासे भरपूर आहेत. कमलहि ऋतुकालानुसार तलावांत असतात. भगवानांच्या चरण युगलापर्यंत तलावांत पूल बांधलेला आहे. त्यामुळें दर्शनेच्छु लोक सूलभपणें जाऊं शकतात. चरणयुगलाच्या दोन्ही बाजूस गौतर गणधर व सूधर्माचार्य गणधर यांचींहि पावलें आहेत. या तीर्थाचें दर्शन केल्यामुळें विशेष पवित्र भावना यात्रेकरूंच्या मनांत आल्याशिवाय रहात नाहींत " असो.

वीरनिर्वाणाच्या दुसरे दिवशीं ठिकठिकाणचे राजे व इतर श्रावक, श्राविका व साधु, साध्वी महावीर तीर्थंकारांच्या अवशेषाचें दर्शन घेण्यास आले होते. त्या दिवशीं रात्रीं सर्वत्र दीपोत्सव करण्यांत आला होता. " महावीरस्वामींचा आत्मा मोक्षाला गेला ही आनंदवार्ताच होती. त्याबद्दल दुःख करणें हें अज्ञान होय. एवढेंच अज्ञान गौतम गणधरांना होतें व इतर दृष्टीनें तें महाज्ञानी व चारित्रसंपन्न असूनहि त्यांना केवलज्ञान होत नव्हतें. पण महावीरस्वामींच्या निर्वाणानंतर केलेल्या दुःखाचा विचार करून तसें करणें अयोग्य होतें असें जाणल्याबरोबर गौतमगणधरांनाहि केवलज्ञान झालें व नंतर सत्तर वर्षांनीं तेहि मोक्षाला गेले." असा उल्लेख श्वेतांबर शास्त्रांतून पाहावयास मिळतो. व दिगंबरांत महावीरस्वामींच्या निर्वाणानंतर गौतमस्वामींना केवलज्ञान झालें व त्यांनीं बारा वर्षें विहार

करून नंतर मोक्षप्राप्ती करून घेतली आणि हेंच सत्य आहे. महावीरस्वामींच्या निर्वाणानंतर करण्यांत आलेल्या दीपोत्सवाची परंपरा अजून चालू आहे व तिलाच आपण दीपावलीचा सण म्हणतों. या सणाला वाटेल तीं कल्पित कारणें अनेकांकडून सांगितलीं जातात. पण खरें कारण वीरनिर्वाणमहोत्सवाचेंच आहे. आणि दुसरे दिवशीं वीरसंवतचें नवें वर्षहि सुरू होतें. असो. बगिचांतील त्या निर्वाणस्थानावर एक स्तूप उभारण्यांत आला होता म्हणतात; पण आज तर त्याचें अस्तित्व नाहीं. याप्रमाणें महावीर तीर्थंकरांचें दिव्य आयुष्य पूर्ण झालें. ते स्वतः अव्याबाध सुख भोगण्यास गेले व इतर जीवांनाहि त्या मोक्ष-शिलेंत येण्याचा मार्ग दाखवून गेले आहेत. त्या मार्गाला अनुसरणें हें ज्याच्या त्याच्या हातचें काम आहे. कर्मग्रंथि जितक्या कमी बनतील तितक्या लवकर मोक्ष पदवी प्राप्त होईल. सर्व भव्यजीवांना केव्हांना केव्हां तरी त्या स्वाभाविक स्थितीस एकदां पोहोंचावयाचें आहेच. पण जितकें लवकर तें स्थान गांठतां येईल तितकें चांगलें. कालाचेंहि बंधन असल्यामुळें विशिष्ट कालांत मोक्षप्राप्तीचें प्रयत्नहि होणें शक्य नसेल; पण जन्म-मरण शक्य तितकें कमी करणें केव्हांहि अशक्य नाहीं. शक्य तितके कमी भव करण्यांतच सुख आहे. जेवढे भव होतील तेवढ्यामधूनहि सम्यक्त्वापासून आत्मा कधींहि ढळणार नाहीं असा प्रयत्न जीवानें आदरवा म्हणजे त्यांतल्या त्यांत अधिक सुखी व कल्याणप्रद जीवन होईल. महावीरस्वामीचें तीर्थंकरत्व सर्व जीवांना प्राप्त होणें शक्य नाहीं; पण सिद्ध पदवी सर्व जीवांना प्राप्त होणारी आहे म्हणून महावीरस्वामींचा आदर्श नेहमीं डोळ्यांपुढें ठेवणें जरूर आहे. महावीर तीर्थंकरांचें चरित्र व त्यांचा उपदेश भव्यजीवांना मोक्षाची वाट दाखविण्यास खास उपयोगी पडेल.

## प्रकरण बारावें.

# महावीर पश्चात्काल.

—:–०—०–:—

वीरनिर्वाणानंतर मुख्य गणधर इंद्रभूति गौतम हे लगेच बारा वर्षीनीं मोक्षाला गेले व नंतर सुधर्माचार्य गणधरांनीं बरीच धर्मप्रभावना केली. प्रख्यात जंबुस्वामी त्यांचेच शिष्य होत. मथुरेजवळ चौरासी गांवांतून ते मोक्षाला गेले; वीरनिर्वाणानंतर बासष्ट वर्षेपर्यंत गौतम गणधर, सुधर्माचार्य व जंबुस्वामी यांनीं धर्मप्रभावना केली. त्यानंतर शंभर वर्षेपर्यंत कोणी प्रभावी मुनि झाले नाहींत; तथापि अविच्छन्नपणें वीरशासनाची उपदेशपरंपरा चालू होती. त्यानंतर त्यामध्यें प्रोष्ठलाचार्य, क्षत्रयाचार्य, जयाचार्य, नागसेन, सिद्धार्थ, धृतसेन, विजय, बुधल, गंगसेन व सुधर्म हे मुनि प्रमुख होते. त्यांच्या नंतर २२० वर्षेपर्यंत एकादशांगांचे तज्ज्ञ—मुनि धर्मप्रचार करीत होते. त्यामध्यें नक्षत्राचार्य, जयपाल, पांडु, ध्रुवसेन व कुंसाचार्य हे प्रमुख होत. नंतर एकांग पाठीच राहिले व त्यांनीं धर्मप्रचार केला. त्यांपैकीं सुभद्र, यशोभद्र, यशोबाहु व लोहाचार्य हे प्रमूख होत. शेवटल्या अंगाचे थोडें ज्ञान असलेले विनयधर, श्रीदत्त, शिवदत्त व अर्हद्दत्त या चार अरातीय मुनींनीं धर्मप्रचार केला. नंतर पूर्वदेशांत अर्हद्बलिमुनि झाले. तेहि अंगांतील कांहीं भागाचे ज्ञाते होते. त्याच्यानंतर माघनंदी वगैरे मुनि झाले. यावेळीं पूर्व, अंग वगैरे आगमज्ञान लुप्त झाले व आतां जे ग्रंथ आहेत ते कुंदकुंदाचार्य, उमास्वाति, समन्तभद्राचार्य वगैरे आचार्यांनीं लिहिलेले आहेत. वीर निर्वाणानंतर ८५ वर्षांचा एक शिलालेख मिळाला आहे. व तो अजमीरच्या पदार्थसंग्रहालयांत ठेवलेला आहे. तो समग्र मिळाला नाहीं; पण जेवढा तुकडा मिळाला आहे त्यावर खालील वाक्यें आहेत. ‘ वीराय भगवत । चतुरासी निवस्से । साला मालिणीये । रंणि विद्रमिज्झमिकेमि । ’ज्झमिका म्हणजे माध्यमिका नगरी. ही नगरी मेवाडांत आहे. सर्व शब्दांचा अर्थ लागत नाहीं; पण वर्णन राजा-मिलिंदासंबंधीं असावे असा अंदाज आहे. बौद्धग्रंथांत सुद्धां राजा मिलिंद जैन होता असें म्हटलेलें आहे. तत्कालीन जी जुनी नाणीं मिळतात त्यावर तीर्थ-करांची लांछनें व जैनधर्माची तात्विक चिन्हें दिसून येतात. नाक्यावर चौकोन

असून त्याच्या दुसऱ्या बाजूस वृषभ व सूर्य आहे. दुसऱ्या एका नाण्यावर तक्षशिला आहे. त्याच्या एका बाजूस हत्ती असून त्याच्यावर चैत्यालय आहे. दुसऱ्या बाजूस सिंह असून त्याच्यावर स्वस्तिक व चैत्यालय आहे. हीं चिन्हें आदिनाथ व महावीरस्वामींची आहेत हें उघड आहे.

याप्रमाणें मुनींनीं धर्मप्रचार चालू ठेवल्यामुळें व श्रेणिकासारख्या राजांची जैनपरंपरा पुढील राजांनीं चालू राखल्यामुळें जैनधर्माचा प्रचार सर्व देशभर व परदेशींहि झाला. अजातशत्रु, चंद्रगुप्त, अशोक, संप्रति, खारवेल, अमोघवर्ष, कुमारपाल, या सम्राटांनीं व दक्षिणेंतील अनेक राजांनीं जैनधर्म स्वीकारला म्हणूनच तो जनसमुदायांत राहिला. चंद्रगुप्त व अशोकाच्या कारकीर्दींत जैनधर्माचा प्रसार रोम, नॉर्वे वगैरे दूरच्या व इराण, अफगाणिस्तान वगैरे जवळच्या देशांतहि झाला. चंद्रगुप्ताचे कालांतच शिकंदर आला होता व त्यानें आपल्याबरोबर नेलेल्या इतर अनेक महत्त्वाच्या बाबींत निर्ग्रंथमुनिहि एक होते. इ. स. पू. चवथ्या शतकांत ग्रीक यात्रेकरू पिन्हो येथें आला होता व त्यानें त्यावेळच्या परिस्थितीचें बरेंच वर्णन करून ठेविलें आहे. मध्य आशियांत व रशियांतहि म्हणजे कास्पिया, समरकंद, रूमानिया वगैरे भागांतहि जैनधर्माचा प्रसार झाला होता. अरबस्तानांतहि जैनधर्माचा प्रसार झाला होता. काबा दगडाला अजूनहि मुसलमान लोक नग्नपणें प्रदक्षिणा घालतात; निदान तशी घालावी अशी परंपरा आहे. चंद्रगुप्त जैन नव्हता असें कित्येक म्हणतात. पण तो जैन होता ही गोष्ट मि. स्मिथ यांनीं अनेक आधार देऊन सिद्ध केली आहे. ते लिहितात, " राजा बिंबिसार किंवा श्रेणिकाप्रमाणेंच चंद्रगुप्त जैन होता. मगध देशांत शैसुंग, नंद व मौर्यवंश राज्य करीत असतांना जैन धर्माचा प्रचार बराच होता. मुद्राराक्षस नाटकांत चाणाक्य ब्राह्मणाचा मित्र राक्षस हा जैन होता म्हणून लिहिलें आहे. शेवटींच चंद्रगुप्त साधू होऊन दक्षिण देशांत गेला होता. तों भद्रबाहु स्वर्गवासी झाल्यानंतर बारा वर्षांनीं चंद्रगुप्त स्वर्गाला गेला. या गोष्टींचा पुरावा श्रमणबेळगोळला आहे व इ. स. सातव्या व दाहव्या शतकांतील शिलालेखहि या गोष्टींचें वर्णन करतात. इ. स. पू. ३२२ मध्यें जेव्हां चंद्रगुप्त राज्यारूढ झाला तेव्हां तो तरुण होता. चोविस वर्षेंच त्यानें राज्य केलें. तेव्हां तो पन्नास वर्षांचा तरी होता, यावेळीं त्यानें संन्यास घेणें स्वाभाविक आहे. अशोकसम्राटाचे बाबतींतहि द्विधामत आहे. पण प्रारंभीं

तो जैन होता, याबद्दल मुळींच शंका नाहीं. एकुणतीस वर्षे राज्य केल्यावर तो बौद्ध झाला. डॉ. कर्नल साहेबांनीं अशोकाच्या शिलालेखावरून तो जैनच असला पाहिजे असा निष्कर्ष काढला आहे व तो यथार्थ आहे. ओरिसा प्रांतांत खारवेल नांवाचा जैनसम्राट इ. स. पू. दुसऱ्या शतकांत होऊन गेला. कटकपासून चारपांच मैलावर हार्थीगुंफा आहे. अशोकाच्या मरणानंतर चाळीस वर्षांनीं खारवेल जन्मला. याच्या बापाचें नांव चेतराज. वयाच्या पंचवीसाव्या वर्षी तो गादीवर आला. त्यावेळीं मगध देशांत नंद घराणें राज्य करीत होतें. ऋषभदेवांची एक मूर्ति मगधाधिप घेऊन गेला होता. ती खारवेलानें युद्ध करून परत आणली. त्याला क्षेमराज, वर्द्धराज, भिक्षुराज, धर्मराज, वगैरे ब्रीदावली होत्या. याप्रमाणें इ. स. पू. पहिल्या शतकापर्यंत जैनसम्राट व जैनमुनींनीं जैनधर्माचा प्रसार अविच्छिन्नपणें चालू राखून बौद्धांचें कांहीं चालूं दिलें नाहीं व यज्ञमार्गी आणि आजीवक वगैरे पंथांचें नामनिशाणहि राहूं दिलें नाहीं असें इतिहासावरून सिद्ध होतें. अशोकानें कांहीं वर्षे बौद्धभिक्षूंना आश्रय दिला. पण तेवढ्यामुळें जैन-धर्माचा प्रभाव कांहीं कमी झाला नाहीं. चंद्रगुप्त, खारवेल वगैरे सम्राटांनीं तर तो अधिकच वाढविला.

पण चंद्रगुप्त राज्य सोडून दक्षिणेंत गेल्यानंतर पारडें बदललें असें इतिहासावरून दिसतें. नंतर बौद्धधर्माची कमान चढती दिसूं लागली. कारण राजाश्रय गेला व जैनपरंपरेंतहि मतभेद उत्पन्न झाला. मूळ तत्त्वज्ञानांत व साधूंतच मतभेद पडल्यावर वैश्य, ब्राह्मण व शूद्रादि वर्णांचे लोक जैनमतावर विश्वास ठेविनासे झाले व क्षत्रियांनींहि अनेक कारणांमुळें बौद्धमतासच उचलून धरण्यास सुरवात केली. जैनइतिहासांत क्रांति करणाऱ्या म्हणजे श्वेताम्बरमताच्या उत्पत्तीचा इतिहास येथें देणें उचित होय. श्वेतांबरमताच्या उत्पत्तीबद्दल बाबूकामताप्रसादजींनीं आपल्या महावीरचरित्रांत खालीलप्रमाणें लिहिलेलें आहे. "जैनतत्त्वज्ञान अगदीं शास्त्रशुद्ध असल्यामुळें त्यांत वैदिक किंवा इतर धर्मांप्रमाणें सुधारणेस जागाच नाहीं. आद्य तीर्थंकर ऋषभदेवांनीं ते जसें सांगितलें तसेंच नंतरच्या तीर्थंकरांनीं, सिद्धांनीं, आचार्यउपाध्यायांनीं व सर्व निर्ग्रंथ मुनींनीं सांगितलें आहे. तथापि सारा समाज कांहीं सारखा नसतो. समाजांत स्वच्छंदी व शिथिलाचारी लोकहि असतातच. अशा लोकांमुळें जैनपरंपरेंत वेळोवेळीं बदल होऊन मिथ्यात्व मातलें यांत मुळींच शंका नाहीं. ऋषभ

देवाचे नातु मरीचि यांनींच मिथ्यात्व माजविण्यास सुरवात केली. प्रत्येक तीर्थं-
कराच्या पूर्वी, समकाली व नंतर जसे मिथ्यात्व होते तसे महावीरस्वामींच्या
पूर्वी, समकाली व नंतरहि होतेच. आजीविक वगैरे सांप्रदाय अशा मिथ्यात्वी
वर्गांपैकींच होत. या बाबतींत पं. नाथूराम प्रेमी म्हणतात, ' गेल्या अडीच
हजार वर्षांत जैनधर्मावर किती आपत्ति आल्या, जैनसमाजाला किती दुःख
सहन करावें लागलें व त्या सर्व संकटांना तोंड देऊन जैनशासन आजवर टिकून
राहिलें याचा विचार करतां जैनसमाजानें वेळोवेळीं मिथ्यात्वी कल्पनांचाहि
स्वीकार आत्मरक्षणार्थ केला असला पाहिजे हें उघड आहे. हल्लीं जैनसमाजांत
मानलेलें क्रियाकांड, यक्षयक्षिणी, क्षेत्रपाल, पद्मावती वगैरे देवता
पूजन, अग्निहोम, संध्या, तर्पण, आचमन वगैरेंचा शिरकाव त्यामुळेंच झाला
असला पाहिजे. ' विद्यावारिधि बॅ. चंपतराय जैनी म्हणतात ' जैनतत्त्वज्ञानांत
कांहीं फरक पडलेला नाहीं; कारण तें शास्त्रसिद्ध आहे. विविध आचारामध्यें
मात्र भेद पडणें स्वाभाविक आहे. कारण कालानुसार आचार बदलतात.
म्हणून आचारधर्मांत फरक दिसून येतो; पण मूळ सिध्दांतांत कोठेंहि फरक
नाहीं. महावीरस्वामींच्या कालापर्यंत दिगंबरत्व जैनेतर साधूंतहि विशेष प्रमा-
णांत होते व जैनसाधु तर दिगंबरच असत, याबद्दल मुळींच वाद नाहीं.
महावीरस्वामींच्या नंतरच्या बौद्धग्रंथांतहि जैनसाधूबद्दल नग्न हाच शब्द वाप-
रण्यांत आला आहे. कारण श्रमण, निर्ग्रंथ, भिक्षू , साधू हे शब्द बौद्धभिक्षूंना
लावण्यांत येत होते. जैनमुनींला जे बावीस परिषह सहन करावयाचे अस-
तात त्यांत नग्नत्व हा एक परिषह आहे. श्वेताम्बरग्रंथापैकीं प्रवचन सारोद्धार
पान २६५ व आचारांगसूत्र पान ९७ मध्यें जैनमुनीनें नग्न राहिलें पाहिजे
असें म्हटलें आहे. तेव्हां दिगंबरत्व श्रेष्ठ असून ते प्राचीन आहे याबद्दल वाद
नाहीं. जैनसाधु श्वेतांबरधारी केव्हांपासून झाले तवढेंच आतां पाहावयाचें.

श्वेतांबरग्रंथांतून ' महावीरस्वामी नग्न असत, पण लोकांना ते वस्त्राधारी
दिसत. त्यांनीं देवदूष्य वस्त्र परिधान केलें होतें, वगैरे जे उल्लेख आहेत ते
कदाग्रहाचे आहेत हें स्पष्ट आहे. बौध्दग्रंथावरून असें दिसून येतें कीं, व्रत-
धारी श्रावक मात्र हल्लींच्या श्वेतांबरसाधूप्रमाणें वेष धारण करीत. देवसेना-
चार्यांच्या दर्शनासार ग्रंथांत खालीलप्रमाणें उल्लेख आहे. ' विक्रमादित्याच्या
मृत्यूनंतर सौराष्ट्रदेशांतील वल्लभिपुरांत श्वेतांबरमुनिसंघ उत्पन्न झाला. भद्रबाहु

गणींना शान्त्याचार्य म्हणून एक शिष्य होते. त्यांचा जिनचंद्र नांवाचा शिष्य शिथिलाचारी झाला. स्त्रीजन्मांत जीवांना मोक्षप्राप्ती होऊं शकते, असे तो प्रतिपादूं लागला. ' केवलज्ञान्यांनाहि आहार घ्यावा लागतो. व म्हणून त्यांना रोगही होतात. वस्त्रधारण करणारे मुनिहि मोक्षाला जातात. महावीरस्वामींच्या गर्भाचें अपहरण झालें होतें. प्रासुक आहार कोठेंहि घेतां येतो, वगैरे आगम विरुद्ध मिथ्यात्वाचा फैलाव करून तो पहिल्या नरकाला गेला. ' देवसेन सूरि-कृत भावसंग्रह नांवाच्या ग्रंथांत खालीलप्रमाणें माहिती आहे. ' विक्रमराजाच्या मृत्यूनंतर १३६ वर्षांनीं सोरठ देशांतील वल्लभी नगरांत श्वेताम्बरसंघ निघाला. उज्जयिनी नगरींत भद्रबाहु म्हणून एक आचार्य होते. ते निमित्तज्ञानी होते. बारा वर्षेंपर्यंत चालणारा एक मोठा दुष्काळ पडणार आहे असें त्यांनीं मुनिसंघाला सांगितलें. म्हणून तो देश सोडून मुनि अन्यत्र विहार करूं लागले. त्यांपैकीं शान्त्याचार्य सोरठ देशाला गेले. पण ते तेथें गेल्यानंतर त्या देशांतहि दुष्काळ पडला. भुकेले लोक दुसऱ्याचीं पोटें फाडून अन्न खावूं लागले. अशी स्थिति पाहून पांढरे कांबळे, दंडा, तुंबा, पात्र, आवरण, व सफेत कपडा त्यांनीं धारण केला व भिक्षा गोळा करून ते उपजीविका करूं लागले. निर्ग्रंथ मुनींची वृत्ति सोडून दिली व स्वच्छंदानें याचना करून, बसून ते खाऊं लागले. दुर्भिक्ष नाहींसे झाल्यावर शांत्याचार्यांनीं शिष्यसंघाला बोलावून फिरून नग्न बनण्याची आज्ञा केली; पण चटावलेले शिष्य थोडेंच ऐकतात ! ते म्हणाले दिग-म्बरव्रतांत किती कष्ट आहेत. नग्न राहावे लागतें. उपवास करावे लागतात. एकेक दिवस भोजन मिळत नाहीं, कारण अभिग्रह जुळत नाहीं. मनाला वाटेल ते खावयाला मिळत नाहीं, वाटेल तेथें जातां येत नाहीं. मौन पाळावें लागतें. इमारतींत राहतां येत नाहीं. भूमिशय्या व केशलोच करावा लागतो. या दूषम कालांत हा दिगंबर वेष आवश्यक नाहीं व योग्यहि नाहीं. शिष्यांचें हे म्हणणें शान्त्याचार्यांना रुचेना. तसें केल्यास परंपरेचा उच्छेद होईल, जिनाज्ञेचा भंग होईल व मिथ्यात्व वाढेल असें त्यांनीं म्हटल्याबरोबर शिष्यांनीं त्यांना मारून टाकलें व शान्त्याचार्य मरून व्यंतरदेव झाले. नंतर त्या शिष्यसंघानें श्वेतांबरत्वाला अनुकूल अशी शास्त्र रचना केली व तसा उपदेश जैनसंघाला करण्यास सुरवात केली एवढेंच नव्हे तर दिगंबरमताची निंदा करूं लागले. शान्त्याचार्यांचा व्यंतरदेव या शिष्यांना पीडा देऊं लागला तेव्हां त्या व्यंतर

देवाची पूजा सुरू झाली व श्वेताम्बर लोक आजतागायत ती करीत आहेत. त्या व्यंतरदेवाच्या नांवानेंच पहिली बलिपूजा श्वेताम्बर करतात. भावसंग्रह हा ग्रंथ दहाव्या शतकांतील आहे. भट्टारक रत्ननंदींनीं वरीलपेक्षां अधिक माहिती याप्रमाणें दिली आहे. ' भद्रबाहुस्वामींनीं भविष्य कथन केल्यावर बारा हजार साधु त्यांच्या बरोबर दक्षिणेंत गेले; पण रामल्य, स्थूलाचार्य व स्थूलभद्र हे साधु आपापल्या संघासह उज्जयिनींतच राहिले. दुष्काळ सुरू झाल्यावर ते शिथिलाचारी झाले. भद्रबाहुस्वामी स्वर्गाला गेल्यानंतर दक्षिणेंतील दिगंबर-साधु परत उज्जयिनीला आले. तेव्हां शिथिलाचार सोडण्याबद्दल तेथील मुनि संघाला सांगण्यांत आलें. स्थूलाचार्य असें सांगतात म्हणून शिष्यांनीं त्यांना मारून टाकलें तेव्हां ते व्यंतर देव झाले. तेव्हांपासून त्यांना श्वेताम्बर कुलदेव म्हणून पुजित आहेत. या शिथिलाचाऱ्यांनीं अर्धफालक नांवांचा सांप्रदाय काढला त्यानंतर बऱ्याच काळानें उज्जयिनींत कीर्तिराजा झाला. त्याची कन्या वल्लभीपूरच्या राजाला दिली होती. राजकन्या चंद्रलेखा अर्ध-फालक साधूंची भक्त होती. ती सांप्रदायाच्या मुनींना राजवाड्यांत बोला-वीत असे. अर्धफालक साधू नग्नच असत; पण अंगावर एक वस्त्र नुसतें टाकीत. राजाला हें रुचलें नाहीं. त्यानें त्या साधूंना वस्त्रें दिलीं व तीं त्यांनीं परि-धानहि केलीं. या साधूंचा मुख्य जिनचंद्र होता.' यावर पं. नाथूराम प्रेमी म्हणतात. 'देवसेनसूरि व रत्ननंदी यांच्यावर दिलेल्या वर्णनांत बराच फरक आहे भद्रबाहुस्वामींना देवसेनसूरि निमित्तज्ञानी म्हणतात व रत्ननंदी पंचमश्रुतकेवली म्हणतात. दिगंबरग्रंथावरून भद्रबाहुस्वामी वीरसंवत् १६२ व श्वेताम्बरग्रंथा-प्रमाणें वीर सं. ६०३ मध्यें निर्वाणाला गेलें असें मानलें जातें. या कालांत साडेचारशे वर्षाचें अंतर आहे. रत्ननंदीनें भद्रबाहुकालीन मताला अर्धफालक नांव दिलें व नंतरच्या मताला श्वेताम्बर म्हटलें दोन्ही ग्रंथांच्या उत्पत्तिस्था-नांतहि फरक दाखविण्यांत आला. प्रवर्तकांची नांवेंहि निराळीं देण्यांत आलीं. दिगंबरसांप्रदायांत कुंदकुंदाचार्य जितके मानले जातात, तितकेच श्वेताम्बरांत स्थूलभद्र मानले जातात, अर्धफालक नांवाचा सांप्रदाय निघाल्याचें वर्णन इतर कोणत्याहि ग्रंथांत नाहीं. म्हणून रत्ननंदींचें वर्णन बनावट आहे.' पं. नाथू-रामजींनीं आपल्या म्हणण्याला अधिक आधार दिलेले नाहींत. म्हणून रत्न-नंदींचें वर्णन बनावट म्हणतां येत नाहीं. पं. नाथूरामप्रेमींचा वरील अभिप्राय बाबू कामताप्रसादजींना मान्य नाहीं.

श्वेतांबरसांप्रदायांत या बाबतींत खालील गाथा प्रमाण मानली जाते. छव्वाससहस्सेहिं नवुजरेहिं गयस्स वीरस्स । तो बोडियाण दिट्ठी रहवीरपुरे समुप्पन्ना ॥ प्रमालक्षण नामक ग्रंथांत जिनेश्वरसूरींनीं दिगम्बरांचें म्हणणें म्हणून अशी गाथा दिली आहे. छव्वास सएहिं न उत्तरैहिं तइयासिद्धिं गयस्य वीरस्स । कंबलियाणं दिट्ठी बलही पुरिए समुप्पण्णा ॥ याप्रमाणें श्वेतांबरमताच्याच दोन ग्रंथांत एकाच वेळीं दिगंबर व श्वेतांबरमताची उत्पत्ति झाली असा उल्लेख आढळतो. वरील दोन्ही गाथा बहुतेक सारख्याच आहेत. पण दिगंबरमत फार पूर्वीपासून होतें ही गोष्ट इतर धर्मांच्या ग्रंथावरूनहि सिद्ध होत असल्यामुळें वरील गाथांतून दिलेल्या काळीं श्वेतांबर मतच उत्पन्न झालें असलें पाहिजे हें स्पष्ट आहे. डॉ. स्टीव्हन्सनसाहेब या बाबतींत कल्पसूत्राच्या प्रस्तावनेंत लिहितात कीं, ' इ. स. पूर्वी पहिल्या शतकांत श्वेतांबर मत निघालें असलें पाहिजे. दिगंबर नव्हे. ' डॉ. हॉर्नेलसाहेब या बाबतींत लिहितात ' इ. स. पूर्वी ३१० चे सुमारास मगधदेशांत बारा वर्षांचा दुष्काळ पडला. त्या वेळीं मौर्य चंद्रगुप्त राज्य करीत होते. भद्रबाहु त्यावेळीं जैनसंघाचे आचार्य होते. दुष्काळामुळें कांहीं शिष्यासह भद्रबाहु कर्नाटकांत गेले. मगध देशांत जे राहिले होते त्यांचे आचार्य स्थूलभद्र होते. दुर्भिक्ष संपल्यावर पाटलीपुत्रांत एक जैनसंमेलन करण्यांत आलें. त्यावेळीं अकरा अंग व चौदा पूर्व ग्रंथ लिपिबद्ध करण्यांत आले. दुष्काळांत जैनसाधूंच्या आचरणांत फरक पडला. सामान्य साधु कांहीं वस्त्र धारण करूं शकतात. पण अंतिम दर्जाच्या साधूंनीं नग्नच राहिले पाहिजे असा आजवर नियम होता. पण दुष्काळांत आहार मिळेना म्हणून नग्न साधूंनीं श्वेतवस्त्र धारण करून भिक्षा गोळा करण्यास सुरवात केली पण दक्षिणेंत गेलेल्या मुनींनीं मात्र दिगम्बरत्व सोडलें नाहीं. ते मुनि मगध देशांत परत आले तेव्हां श्वेतांबरत्व जैन–साधूंचे बाबतींत अगदीं रूढ होऊन गेले होते. त्यामुळें मुनिसंघांत भेद पडला. ' महावीरस्वामींच्या निर्वाणानंतर जैनसंघांत मतभेद झाला असा मोघम उल्लेख बौद्ध ग्रंथांतून आहे. तेवढ्यावरून हा मतभेद भद्रबाहुस्वामींच्या पूर्वींहि होता; पण त्यांच्यानंतर दुष्काळामुळें तो मोठ्या प्रमाणांत दृग्गोचर झाला असे. प्रो. जेकोबी व कांहीं पौर्वात्य विद्वानहि म्हणतात. पण वरील विवरणच अधिक ग्राह्य वाटतें.

## महावीर पश्चात्काल.

याप्रमाणें इ. स. पू. पहिल्या शतकापर्यंत जैनशासनाचें वर्धन अविच्छिन्नपणें निर्ग्रंथ मुनिगण व अनेक सम्राटांनीं केलें; पण त्यानंतर मुनिसंघांत वरीलप्रमाणें मतभेद माजला. व साम्राज्यहि लयाला गेलें. अनेक राजे स्वच्छंदानें राज्य करूं लागले व मुनिगणहि स्वच्छंदानें मतप्रसार करूं लागला. इतर मतांना पुढें येण्यास हा काळ अनुकूल ठरला. बौद्धमतच काय तें इ. स. सातव्या शतकापर्यंत जैनमताच्या बरोबरीनें वाढीस लागलें. या काळांत जैन व बौद्ध हे दोघे समसमान होते असें म्हणावयास हरकत नाहीं. एक राजा जैन असे तर दुसरा बौद्ध होई व आपल्या प्रजेलाहि बौद्ध बनवी. पुढें पुन्हां तोच जैन बने व प्रजेलाहि जैन बनवी असाच फेरबदल या पांचसहा शतकांत चालला होता. स्वतः बुद्धाच्या काळींहि जो धर्म टिकूं शकला नाहीं. त्यानें भारतवर्षातील प्रमुख धर्माला सामना देण्याइतकें बळ मिळवावें असें कसें झालें ? असें होण्याचें कारण नंतरच्या बौद्धाचार्यांनीं बौद्धमतांत केलेली सुधारणाच होय. बुद्धकालीं सामान्य नीतीला प्राधान्य होतें व तत्त्वज्ञान नकारात्मकच होतें. नंतरच्या बौद्धाचार्यांनीं तत्त्वज्ञान रचलें व तात्त्विक दृष्ट्या इतर दर्शनांचें खंडण करून स्वमताचें समर्थन करण्यास प्रारंभ केला. याप्रमाणें बुद्धिमानावर जेव्हांपासून बौद्धाचार्य विजय मिळवूं लागले तेव्हांपासून त्यांच्या मताची सरशी होऊं लागली. त्याचा स्वीकार राजे व इतर प्रजाहि करूं लागली. पण पुढें बुद्धिबलावरच सर्व कसरत होऊं लागल्यामुळें आणि राजाच्या पाठबळावरच सर्व करामत बौद्धाचार्य करूं लागल्यामुळें सामान्य नीतीवरचेंहि त्यांचें अवधान सुटलें व भिक्षुभिक्षुणींतच अनाचार माजला व त्याचा परिणाम समाजावरहि होऊं लागला. तेव्हां फिरून जैनाचार्यांची सरशी होऊं लागली. या काळांतील जैनग्रंथ पाहिल्यास त्यांतील निम्मा अधिक भाग बौद्धांचें खंडन करण्यांतच खर्ची पडला आहे असें दिसून येईल. यावरुन जैनाचार्यांनींच शेवटीं बौद्धमताचें पारिपत्य केलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

भगवान महावीर व म. बुद्धांनीं हिंसात्मक कर्मकांडाचें जें एकदां पेकाट मोडलें तें कायमचेंच होय. हिंसात्मक यज्ञांनीं फिरून डोकें वर काढले नाहीं इतका जबरदस्त टोला या दोन महात्म्यांनीं त्या हिडिस संस्थेला दिला. ब्राह्मणांचें बंडहि या दोन महापुरुषांनीं कमी केलें व म्हणूनच या दोघांना अलीकडलि वेदमतानुयायी आपल्यांतील मोठे बंडखोर समजतात. श्रीरामस्वामी आयंगार आपल्या ' दाक्षिणेंतील जैनधर्म ' या पुस्तकांत म्हणतात, ' कांहीं विद्वान जैनधर्माला हिंदू-

मधील बंडखोर व वर्णव्यवस्थेचा उच्छेद करणारा आहे असें म्हणतात. पण ते सर्वस्वीं खोटें आहे. महावीर कालापर्यंत ब्राह्मणांनीं इतर वर्णांशीं हलकेपणानें वागण्याचा जो प्रघात पाडला होता तो बंद पाडून क्षत्रिय वर्णाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें व इतर वर्गांनाहि त्यांनीं बरोबरीनें वागविलें हें खरें; पण याचा अर्थ वर्णव्यवस्थेचा उच्छेद केला असा होत नाहीं. जैनसमाजांतहि वर्णव्यवस्था आहे; पण त्यांतील उच्चनीच कल्पना नाहीं." तेव्हां हिंसात्मक यज्ञांचें बंड व वर्ण व्यवस्थेतील उच्चनीचपणा या दोहोंचा नायनाट भगवान महावीर व म. बुद्धांनीं केला हें उघड आहे. त्याबरोबरच इंद्रवरुणादि देवतांचें खरें स्वरूप काय आहे तेंहि महावीर तीर्थंकरांनीं दाखवून दिलें. मनुष्यगतीप्रमाणेंच या देवतांची एक गति आहे. ते मुक्त झालेले पूजनीय देव नव्हत. अर्थात्‌च त्यांचें पूजन करण्याची जरूरी नाहीं. व त्यासाठीं हिंसात्मक यज्ञ करण्याची तर मुळींच आवश्यकता नाहीं. असें त्यांनीं दाखवून दिलें. म. बुद्धानें तर या जन्मानंतरच्या जीवनाची पंचाईत करण्याचेंच टाळलें; मग त्या भावी जीवनांतील सुखासाठीं यज्ञांचा एवढा खटाटोप कशाला हवा ? भगवानमहावीर व म. बुद्धांच्या या उपदेशाचा परिणाम सर्व समाजावर चांगला होऊन असंख्य लोक जैन व बौद्ध झाले आणि जे राहिले त्यांनींहि आपला उपासनामार्ग बदलला. वेदांतूनच नवीन शिव किंवा रुद्र, शक्ति, विष्णु, गणपति वगैरे देवांना शोधून काढण्यांत आले व त्यांची उपासना सुरूं झाली. राम, कृष्ण वगैरे क्षात्रवीर कीं, ज्यांचा महिमा त्या काळींहि लोक गात होते त्यांना या देवांचे अवतार ठरविण्यांत आले व अनेक पुराणें रचण्यांत आलीं. व्यासोक्त व इतर पुराणें इ. स. च्या सातव्या शतकापर्यंतच झालेलीं आहेत. बरींचशीं उपनिषदेंहि याच काळांत झालेलीं आहेत. अर्थात् वेदानुयायामधूनहि कर्मकांड अजीबात लोपून ज्ञानकांड व उपासनाकांडानेंच या काळांत उचल खाल्ली होती. जुन्या इंद्रादि देवतापैकीं सूर्य व अग्नि यांची उपासना कायम राहिली व इतरांचें पूजन कांहीं ठराविक कर्मांपुरतेंच राहिलें. अग्निहोत्र राहिले; पण त्यांतील हिंसा गेली. एकंदरींत अनेक देवतोपासना चालूं राहिली; पण ती रुद्रादिदेवांची; इंद्रादि देवतांची नव्हे.

आठव्या शतकांत जैन व बौद्धांची चुरस बरीच वाढलेली दिसते. बौद्धराजांनीं जैनांची कत्तल करण्यापर्यंत मजल नेली. उलट जैनराजांनींहि त्यांचा सूड उगविला असला पाहिजेच; पण बौद्धभिक्षु व राजांनीं जितका निर्दयपणा

दाखविल्याचें इतिहास पुराणांतून नमूद आहे तितके जैनसाधु व राजांच्या क्रौर्याचे दाखले नाहींत व ते स्वाभाविकच आहे. पण दोघांच्या भांडण्यांत तिसऱ्याचा लाभ या म्हणीप्रमाणें या काळांत वैदिकधर्माचें चांगलें फावलें. शंकराचार्य याकाळीं अवतरल्यामुळें वैदिकधर्माचा पुनरुद्धार झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. पण त्यांनाहि भगवान महावीर व म. बुद्धानीं केलेल्या क्रांतीच्या मागें जातां आलें नाहीं. या दोन महापुरुषांच्या पूर्वीचा वैदिकधर्म ते प्रचारांत आणूं शकले नाहींत. पण त्या पायावर उभारलेला सुधारक धर्मच त्यांना प्रसृत करावा लागला. त्यानांहि हिंसात्मक यज्ञ तामसी म्हणून त्याज्य ठरवावे लागले. इंद्रादि देवतांची उपासना सोडावी लागली. जैनांचा कर्मसंन्यास पत्करावा लागला. बौद्धभिक्षूंचा वेष स्वीकारावा लागला. किंबहुना त्यांचा शून्यवादहि मायावादाच्या रूपानें ग्राह्य करावा लागला. एकंदरींत जुन्या वैदिक कर्मकांडावर जैन व बौद्धतत्वज्ञानांच्या परिणामाचें फळ म्हणज शंकराचार्यांचें मत होय असें म्हटल्यास त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यावेळीं रुद्र, विष्णु, देवी, गणपति, सूर्य वगैरे देवतांची उपासना वैदिकांत रूढ झाली होती; ती पंचायतन पूजा शंकराचार्यांनीं मान्य करून सर्व वैदिकांना एक केले. त्यावेळीं प्रगट असलेल्या उपनिषदावर त्यांनीं संन्यासपर भाष्यें रचलीं. जैन व बौद्धांचेहि त्यांनीं खंडन केले आहे. पण तें फारच थोडे. त्यामानानें त्या दोन तत्व ज्ञानांतून त्यांनीं घेतलेला भागच अधिक आहे. वैदिक साधुंचा वर्ग तयार करून ब्राह्मणेतरानांहि साधु होण्याचा मार्ग त्यांना घालून द्यावा लागला हा भ. महावीर व म० बुद्धाचा विजयच होय. जागजागीं मठ स्थापून त्यांनीं वैदिकधर्माच्या प्रसाराची सोय केली. याप्रमाणें वैदिकांची त्यांनीं संघटना केल्यामुळें त्या धर्मांत नवचैतन्य आलें व राजाश्रयहि पुढें मिळाला. जैनचैत्यालयाप्रमाणें व बुद्धमंदिराप्रमाणें वैदिक देवांचीं मंदिरेंहि बांधण्यांत येऊं लागलीं व समाज या धर्माकडे आकर्षिला जाऊं लागला.

शंकराचार्यांचें हें स्मार्तमत वाढूं लागल्यावर बौद्धमताचा जवळ जवळ लोपच होत चालला. पुढें महंमदीयांचें आगमन झाल्यावर निर्गुणोपासनेचीहि लाट उसळली. जैनांमध्यें तारणसमाजी व स्थानकवासी पंथ याचवेळीं निघाले असावेत. वेदांताच्या प्रसारामुळें एकेश्वरीमताकडेहि जनता झुकूं लागली होती. त्याप्रमाणें दाक्षिणेंत बाराव्या शतकांत बसवेश्वर अवतरून त्यांनीं एकेश्वरीमत

वाढविले. एका शिवलिंगाशिवाय दुसरा देव नाहीं हेंच तें मत होय. बसवेश्वरांनीं विलक्षण क्रांती करून बहुतेक जैनांना लिंगायत बनविले. नंतर रामानुजाचार्य झाले व त्यांनीं वैष्णवमताचा प्रचार केला; पण जगाला मूळ कारण तीन आहेत असें त्यांनीं तत्वज्ञान सांगितले. जीव, ईश्वर व सृष्टि ही तीन्ही तत्वें निराळी असून ती कधीहि एक होणार नाहींत असें त्याचें म्हणणें होते. याच सुमारास उत्तर हिंदुस्थानांतहि अनेक साधुसंत झाले व त्यांनीं शैव, वैष्णव शाक्त वगैरे पंथाचा प्रसार केला. नंतर मध्वाचार्य व वल्लभाचार्य हे दोन आचार्य झाले व त्यांनीं द्वैत व शुद्धाद्वैत वैष्णव मतें स्थापिली. या सर्व पंथानीं ईश्वरकर्तृत्वास प्राधान्य दिले व ईश्वरी कृपा व्हावी म्हणून उपासनामार्ग बराच वाढविला. याप्रमाणें ही एकांतिकमतें बरीच निघाली व वाढली तरी भ. महावीर व म. बुद्धाच्या अहिंसेचा उपदेश ते नाकारूं शकले नाहींत व तो उपदेश त्यांना आपल्या उपदेशांत गोंवावाच लागला. म्हणून जैन व बौद्धांनीं अहिंसेचा जितका प्रचार केला तितका लिंगायत, वैष्णव व शैवानांहि करावा लागला.

या शैव व वैष्णवांच्या लाटेंत उत्तरहिंदुस्तानांतून जैनलोकसंख्या वाहून गेली असें दिसतें. राज्यहि म्लेंच्छांचेंच सुरूं झाल्यामुळें उच्च दर्जाच्या तात्विक विवेचनाला वावच राहिला नाहीं व शैव, वैष्णवासारख्या एकेश्वरीवाद्यांची मात्र भरभराट झाली. पुढें पुढें तर नानकासारखें एकेश्वरी व निर्गुणोपासकहि अवतरले. हा महंमदी संस्कृतीचा प्रभाव होय. दक्षिणेंत अगदीं थेट सोळाव्या शतकांपर्यंत जैनराजे झाल्यामुळें जैनसमाज बराच मोठा उरला होता. शैव व वैष्णव राजामध्येंच लढालढी विशेष चालू असे. त्याचा शेक जैनराजांनाहि लागला व शेवटीं सर्वच हिंदू राज्यें महंमदी व ख्रिस्ती परदेशी सत्ताधाऱ्यांना बळी पडलीं असा हा दुःखपर्यवसायी इतिहास आहे. शैव, व स्मार्त वैष्णवांच्या झटापटींत सर्व जैनब्राह्मण त्यांपैकीं कोणत्यातरी मताचें झाले; कारण क्षत्रिय राजेच त्या मताचे बनले. शूद्रादि इतर सामान्यसमाजहि ज्या मताची सरशी असे त्या मताप्रमाणें वागत. वैश्य माल स्वतंत्र होते व ते आपल्या जुन्या मतांना चिकटून राहूं शकत. उत्तरेंत विशेषतः मारवाड व गुजराथेंत वैश्य वर्गच तेवढा जैन राहिला आहे याचें कारण तरी हेंच होय. दक्षिणेंत माल बऱ्याच काळपर्यंत जैन राजे असल्यामुळें राज्य गेल्यानंतर त्यांनीं शेतीं पत्करली पण धर्म सोडला

नाहीं. म्हणून दक्षिणेंत सर्व धंद्यांचे वैश्य आहेत व क्षत्रिय शेतकरी आहेत आणि म्हैसूर संस्थानांत थोडे ब्राह्मणहि आहेत.

श्वेतांबरमताचे जैन बहुतेक गुजराथ व मारवाडांतच आहेत. कारण या भागांतच तो पंथ निघाला व पुढें त्याला राजाश्रय मिळाला. कुमारपालादि श्वेतांबर जैन राजे गुजराथेंत होऊन गेले. जैनधर्माच्या लोकसंख्येचा ऱ्हास होण्यास अनेक कारणें आहेत. त्यापैकीं श्वेतांबर, दिगंबर भेद हेहि एक कारण मानण्यांत येतें. पण आमच्यामतें हें कारण गौण आहे. सुलभ व व्यवहार्य मत असेल तिकडे सामान्य लोकांचा ओढा अधिक असतो. त्यामुळेंच बौद्ध, शैव, वैष्णव, शाक्त वगैरे व अलीकडे महंमदी व ख्रिस्ती मतांचा फैलाव झालेला आहे. दिगंबराइतकेच श्वेतांबरहि जैनधर्मप्रेमी आहेत. जैनधर्माचा प्रसार करण्यांत आत्माराम महाराज, धर्मविजय महाराज, श्री वीरचंद गांधी वगैरे श्वेतांबरांनीं बरीच मेहनत घेतली आहे. श्रीमद् राजचंद्रासारखे मोठे तत्त्वज्ञानी श्वेतांबरांतच झाले व म. गांधीही त्यांचीच जगाला देणगी होय. मद्य, मांस व परस्त्रीगमन या व्यसनांची बाधा म. गांधींच्या मातोश्रींनें जर जैनसाधूपुढें त्यांच्याकडून घेववली नसती व आफ्रिकेंतून श्रीमद् राजचंद्राशीं त्यांचा पत्र-व्यवहार झाला नसतां तर बॅ. मो. क. गांधी म. गांधी झाले असते किंवा नाहीं याची वानवाच आहे. तेव्हां श्वेतांबरमतामुळेंहि जैनधर्माचा प्रभाव कायम राहिला ही गोष्ट नाकारून चालणार नाहीं. शिवाय बौद्धमत हिंदुस्तानांत नामशेष झालें असेल तरी मायावाद व अहिंसेच्या रूपानें ते जसें जिवंत आहे तसेंच शैव, वैष्णवादि हिंदूंनींहि जैनमत जिवंत ठेवलें आहे असेंहि म्हणतां येईल. महावीर तीर्थंकरांच्या प्रभावी उपदेशाचा परिणाम हिंदी जनतेवर कायमचा झालेला आहे. जैन लोकसंख्या कमी असली तरी तो इतर पंथांच्या अनुयायावर बराच झालेला आहे हे लक्षांत घेणें जरूर आहे.

एकंदरींत भगवानमहावीरानंतर सहा शतकेंपर्यंत जैनधर्माचा प्रभाव हिंदुस्तानांत कायम होता व त्याचा प्रचार परदेशांतूनहि झाला. मोठमोठे राजे जैन होते. महान जैनसाधु व पंडित होऊन गेले व हिंदुस्तानांतील बहुसंख्याक जनता जैनच होती. पण वीरनिर्वाणानंतर सहाशें वर्षांनीं बौद्धमताची स्पर्धा सुरू झाली. ही स्पर्धा इ. स. च्या आठव्या शतकांपर्यंत चालू राहिली व नंतर वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन झाल्यामुळें बौद्धधर्माचा ऱ्हास झाला. नंतर वैष्णव व शैव, शाक्तादि

सुलभ मतांचा जोर वाढून जैनधर्मासहि उतरती कळा लागली. तथापि दक्षिणेंत इ. स. च्या सोळाव्या शतकापर्यंत जैनराजे असल्यामुळें जैनलोकसंख्या इकडे बरीच होती. गुजराथेंत शैव, वैष्णव व जैन या तिघांचे समसमान प्राबल्य अजूनहि आहे व कुमारपाल राजाचे वेळीं जैनधर्माचा प्रसार गुजराथेंत विशेष होता. महाराष्ट्रांत महानुभव व वारकरी पंथाच्या प्रसारापूर्वी जैनमताचा प्रसार बराच होता. कर्नाटक, आंध्र, व तेलंगणांतहि जैनराजे, पंडित, साधु, कारागीर व व्यापारी सोळाव्या शतकापर्यंत बरेच होते. पण पुढें वैष्णव व लिंगायत मताचा जोर वाढून जैन लोकसंख्येस उतरती कळा लागली. असो.

पंडितांच्या वादविवादावर, राजांच्या लहरीवर व लोकमताच्या छंदावर व्यवहारांत कोणत्याहि धर्ममताचा प्रसार अवलंबून असतो. म्हणून केवळ लोकसंख्येवरून कोणत्याहि धर्माचा श्रेष्ठ कनिष्ठपणा ठरवितां येणार नाहीं. नीति-समाजासाठीं असते; पण धर्म मुख्यतः अध्यात्मिक कल्याणासाठीं असतो. केवळ या दृष्टीनें पाहतां महंमदी, ख्रिस्ती, पारशी व बौद्धमतापेक्षां हिंदूतत्त्वज्ञानें श्रेष्ठ आहेत ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. हिंदूतत्त्वज्ञानांतहि वैष्णव, शाक्त, गाणपत्य, शैव, सिख वगैरे पंथापेक्षां वेदांत तत्त्वज्ञान अध्यात्मिक दृष्टीनें उच्च-प्रतीचे आहे ही गोष्टहि निर्विवाद आहे. ज्ञानी लोकांनीं जैन–तत्त्वज्ञानाचे सार्वंगिकत्व व सर्व श्रेष्ठत्व असेंच वर्णिलें आहेत.

जैनेतर विद्वानहि जैनधर्माची शुद्धता व सर्वश्रेष्ठता अलीकडे कबूल करूं लागले आहेत व जसा जसा जैनदर्शनाचा अभ्यास अधिकाधिक होत जाईल तसतसा त्याचा श्रेष्ठपणा निर्विवादपणें मान्य केला जाईल हे निःसंशय होय. अहिंसेच्या प्रभावाचें महत्त्व म. गांधी जगाला प्रत्यक्ष पटवीत आहेत. आचार्य श्री. शांति-सागरासारखें निर्ग्रंथमुनि जैनदर्शन आचरण्यांत आणून दाखवीत आहेत. विद्या-वारिधी चंपतरायजैनांनीं सर्व धर्माचा तुलनात्मक विचार करून जैनदर्शनांत वर्णिलेले तत्त्वज्ञानच सर्व धर्मांचें सार कां असलें पाहिजे व कसें आहे तें दाखवून दिलें आहे. इतर पंडितहि आपापल्यापरीनें प्रयत्न करीत आहेत. पाश्चिमात्य देशांतून निरीश्वरवाद अनात्मवादाच्या अर्थानें वाढत आहे. ईश्वरकर्तृत्व विद्वानांना पटेनासे झालें आहे; पण जैनदर्शनांतील वीतराग, निरुपाधिक व चैतन्यस्वरूप स्वयंभू ईश्वराची कल्पना विद्वानापुढें मांडल्यास आस्तिक्यबुद्धि वाढणें शक्य आहे. जगांतील विद्वानांना जैनदर्शनाचीच तहान लागलेली स्पष्ट दृग्गोचर होत

आहे. ती पुरविणारा निर्ग्रंथ महात्मा हवा आहे. कालानुसार तो जन्माला येऊन सम्यक्धर्माचा प्रसार करीलच; पण तोंपर्यंत प्रत्येकानें शक्तिनुसार शुद्ध धर्माचा प्रसार करण्याची खटपट केली पाहिजे. हटवादी लोकांना कांहींच पटणार नाहीं. व त्याच्या उद्धाराची आशाच नाहीं. पण सत्यशोधक व सत्याग्रही लोकांची समजूत पाडणें शक्य असते व इष्टहि असतें. जैनधर्म हा पूर्ण सत्य व अव्याबाध आहे. खऱ्या मुमुक्षूंनां तो पटलाच पाहिजे व तेंच तो आचरणांत आणूं शकतील. आद्यतीर्थंकरापासून निर्वेधपणें चालत आलेलें तत्वज्ञानच महावीर तीर्थंकरांनीं सांगितलें. ते त्याच्यानंतर शेंकडों वर्षे मुमुक्षूंनीं आचरिलें; आज आचरीत आहेत, व पुढेंहि आचरतील.

---

## प्रकरण तेरावें.

# उपसंहार.

तीर्थंकरासारख्या अलौकिक व्यक्तींचें चरित्र लिहिण्यास केवलज्ञानीच पाहिजेत; तरच ते अगदीं प्रासादिक होईल. त्यांचें चरित्र लिहिण्यास गणधर लायक होते. पण त्यांनीं लिहिलेलीं चरित्रें उपलब्ध नाहींत. चोवीस तीर्थंकरानंतर जे अनंत सिद्ध होऊन गेले तेहि तीर्थंकरांचे प्रासादिक चरित्र लिहिण्यास लायक होते; पण त्यांपैकीं एखाद्या सिद्धानें लिहिलेलें एखाद्या तीर्थंकराचें चरित्रहि आढआढळत नाहीं. कांहीं मुनींनीं व पंडितांनीं लिहिलेलीं चरित्रें आहेत; पण रामचरित्र लिहिणाऱ्या वाल्मिकीप्रमाणें व कृष्णचरित्र लिहिणाऱ्या व्यासाप्रमाणें या मुनींची व पंडितांची ख्याति नाहीं. राम व कृष्णचंद्रांचीं चरित्रें व्यासवाल्मिकींच्या आटोक्यांतील होतीं. तशीं तीर्थंकरांचीं चरित्रें मुनिपंडितांच्याहि आवाक्याबाहेरचीं आहेत. प्रारंभीं लिहिल्याप्रमाणें त्याचें वर्णन करण्यास केवलीच पाहिजेत. इंद्रियातीत ज्ञानाचा हा विषय असल्यामुळें त्यांचे यथार्थ व प्रभावी वर्णन केवलज्ञान्याशिवाय कोण करूं शकणार ? म्हणून पंतकवींनीं म्हटल्याप्रमाणें

तीर्थंकरांच्या प्रासादिक चरित्राचे बाबतींत ' स्तवास्तव तुझ्या, तुझ्यासम कवी कधीं जन्मती ? ' असा प्रश्न टाकूनच स्वस्थ बसावें लागतें.

पण चालू काळ इतिहासमाहात्म्याचा काल आहे. अलीकडे ऐतिहासिक ज्ञानास विशेष महत्व देण्यांत येतें. म्हणून तीर्थंकरांचें प्रासादिक वर्णन जरी करतां आलें नाहीं तरी ऐतिहासिक वर्णन करणें मात्र अत्यंत अवश्य होऊन बसलें आहे. हें कामसुद्धां कांहीं साधें नाहीं. यालाहि ब-याच संशोधकबुद्धीची, व विशेष लेखनशैलीची जरूरी आहे. जॉर्ज, हेनरी, व्हिक्टोरिया, नेपोलियन, अकबर, अवरंगजेब वगैरेंच्या चारित्रांचीं बाडेंच्या बाडें प्रसिद्ध करतां येतील. कारण या व्यक्ति अलीकडेच होऊन गेल्या असल्यामुळें साधनें मिळूं शकतात. पण अडीच हजार वर्षांपूर्वीच्या महात्म्यांच्या चरित्राची सामुग्री कोठून मिळवावयाची ! सुदैवानें म. बुद्ध व भगवानमहावीरांचे बाबतींत पूर्वाचार्यांनीं बरीचशी माहिती धर्मशास्त्रांतून ग्रथित करून ठेविली असल्यामुळें यांचीं चरित्रें लिहिणें शक्य झालें आहे. तरी पण ही माहिती झाली तरी पुराणवजाच ! यांतून इतिहास काढून त्यांचे कितीहि संगतवार चरित्र लिहिलें तरी अलिकडील व्यक्तींचीं चरित्रें जशीं मिळूं शकतात तशीं कांहीं तीं चरित्रें होणार नाहींत. अशा स्थितींतहि बाबूकामताप्रसादजींनीं हिंदी भाषेंत ऐतिहासिकदृष्टीनें महावीरचरित्र लिहिण्याचा प्रयत्न केला व तो कांहीं अंशीं साधला आहे. हिंदी भाषेशिवाय इतर कोणत्याहि भाषेंत असें महावीर चरित्र नाहीं.

प्रस्तुत लेखकाची विद्वत्ता ऐतिहासिक चरित्र लिहिण्याइतकीहि नाहीं; मग प्रासादिक चरित्र लिहिण्याची गोष्ट दूरच राहिली. काव्यमय चरित्र लिहिण्याचा प्रयत्न होण्याजोगा आहे. पण चालू काळांत त्यांची मातब्बरी नाहीं. हल्लीं ऐतिहासिक व गद्यमय चरित्राचीच विशेष कदर करण्यांत येते. तसें चरित्र कानडी भाषेंत श्री. भिडे यांनीं लिहिल्याचें ऐकिवांत आहे; पण तें पुस्तक आम्हास पाहावयास मिळालें नाहीं. व मिळालें तरी तें आम्हीं समजूं शकणार नाहीं. गुजराथी भाषेंत महावीरचरित्रें आहेत व श्वेतांबरदृष्टीनें तीं लिहिलेलीं आहेत. मराठी भाषेंत तसें चरित्र नसावें याबद्दल मनाला राहून राहून दुःख वाटत होतें. महाराष्ट्रांत इतर प्रांतांपेक्षां आधुनिक विद्वानांची संख्या अधिक. ते बहुतेक वैदिकमताचे असल्यामुळें त्यांनीं ऐतिहासिकदृष्ट्या वैदिकधर्माचें व पुरुषांचें ग्रंथ लिहून ' वेदोच्छिष्टं जगत्सर्वम् ' ही व्यासोक्ति चालू काळांतहि

खरी करण्यासाठीं चंग बांधला. पण त्यामुळें सत्य दडपले जात असलेले आम्हाला सहन होईना. जैनधर्म सर्वांत प्राचीन असून तो भारतीय आहे. वैदिकधर्म बाहेरून आला आहे. जैनधर्माची छाप वैदिकधर्मावर पडल्यामुळेंच तो आर्य म्हणण्यास लायक झाला आहे. नाहींतर हिंसात्मक बलिदान व पंचभूतात्मक प्रकृतींत इंद्रादिदेवांना कल्पून त्यांची भयाकुल अंतःकरणानें पूजा करण्यापलीकडे वैदिकमतांत आरंभीं कांहींच रहस्य नव्हतें. न बोलेल त्याची द्राक्षेंहि पडून राहतील व बोलेल त्याची आंबट बोरेंहि खपतील या म्हणीप्रमाणें ख्रिश्चन, बौद्ध व वैदिकमतांचा डंका गाजत आहे. व जैनधर्माच्या नगाऱ्यावर कोणीहि टिपरी झडवीत नाहीं अशी स्थिती पाहून पात्रता नसतांनाहि हा प्रयत्न आदरिलेला आहे.

जैनांचा प्राचीन गौरव किती म्हणून वर्णावा ? उत्तर ध्रुवाकडील टोळ्या इकडे येण्यापूर्वी भरतखंडांत एकमेव जैनधर्मच होता. वैदिक मिथ्यात्वाचा प्रसार झपाट्यानें होऊं लागल्यानंतरहि जैनतत्त्वज्ञानाची छाप वैदिकतत्त्वज्ञानावर पडतच होती. महावीरकालापर्यंत जैन लोकांचें व संस्कृतीचें वर्चस्व कायम होतें. नंतरच्या बौद्धलाटेंत अनेक वैदिकमतें पुढें सरसावलीं व बौद्धमताप्रमाणेंच जिनशासनालाहि उतरतीकळा लागली. तथापि दक्षिणेंत जैनांचें वर्चस्व बरेंच होतें. पण उत्तरध्रुवाकडील टोळधाडीनें जसा जैनसंस्कृतीवर पहिला हल्ला चढविला तसा महंमदी टोळ्यांनीं अकराव्या शतकांत दुसरा हल्ला चढविला व पंधराव्या शतकाचे अखेरीस जैनांची लोकसंख्या बरीच कमी झाली व त्यांचे राजकीय वैभवहि नष्ट झालें.

अखिल भारताचा विचार सोडून देऊन दक्षिण भारताचा विचार केला तरी गंग, राष्ट्रकूट, होयसाल व कलचूरी ही राजघराणीं सर्वस्वीं जैन होतीं व पल्लव, संतार, चालुक्य, कदंब व रट्ट वगैरे राजघराण्यांतील बरेच राजे जैन होते. बसवेश्वर व रामानुजाच्या कालापासून जैन राजेहि शैव व वैष्णव होत गेले आणि जे जैन राहिले त्यांचाहि शेवटीं पराजय झाला, राजकीय पाठबळ गेल्याबरोबर जैनांची लोकसंख्याहि घटली व राहिले तेवढे बहुतेक शेतकरीच राहिले. दक्षिणेंतील प्रमुख भाषांना ज्यांनीं जन्म दिला व ज्या भाषांतील आद्यग्रंथ जैनच आहेत, त्या भाषेप्रमाणेंच संस्कृत भाषेंतहि ग्रंथरचना करून ज्यांनीं उभयभाषा कोविद म्हणवून घेतलें ते जैनब्राह्मण गेले व त्यांच्याबरोबरच त्यांचें निःसंतान झालें. उपाध्ये व

म्हैसूर भागांत ब्राम्हण म्हणूनहि कांहीं जैन आहेत; पण ते फार थोडे, ज्यांनीं मोठमोठीं राज्यें केलीं ते जैनराजेहि विलयास गेले व त्यांचें संतान असलें तरी ते क्षात्रवृत्तीहीन बनले आहे. ज्यांनीं समुद्रपर्यटन करून परदेशांतून जैनधर्माचा प्रसार केला व तिकडून सुवर्ण आणून भरतभूमीला सुवर्णभूमि हें नामाभिधान प्राप्त करून दिलें तें जैन वैश्यदक्षिणेंत तरी फारसे राहिले नाहींत. गुजराथ व उत्तर हिंदुस्तानांत मात्र जैन मुख्यत्वेंकरून वैश्यच आहेत. शूद्रत्वाला हलकेपणा जैनसमाजांत कधींच नव्हता. हा उत्पादकवर्ग असून समाजाचा आधारस्तंभ होय. या वर्णाचेहि कांहीं जैन दक्षिणेंत आहेत.

जैन, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य कालाच्या पोटांत गडप झाले; पण त्यांचा लौकिक तात्त्विक व ऐतिहासिक ग्रंथरूपानें आणि चैत्यालयांच्या रूपानें आजतागायत मौजूद आहे. नुसत्या मुंबई इलाख्याचा विचार केला तरी मुंबई, अहमदाबाद ( करणवती ), धंधूका, धोलका, घोघा, कपडवंज, मातार, महुआ, नडियाद, उमरेठ, पावागड, चांपानेर, देसार, दाहोद, गोध्रा, भडोच, शुक्रतीर्थ, अकलेश्वर, साजोत, शाहाबाद, सूरत, रादेर, मांडवी, नवसारी, पाटण, ऊंझा, वडनगर, सरोत्रा, मुंजवर, संखेश्वर, सोजित्रा, ईडर, खंभात, तारंगा, वडाली, पालीठाणा, गिरनार, वढवाण, गोरखमर्ढी, बल्लभीमपुर, तेलुजागुंफा, भद्रेश्वर, अंजार, इतकीं अत्यंत प्राचीन मंदिरें असलेलीं स्थानें आहेत. त्याशिवाय जैनवस्ती आहे तेथें नवीं मंदिरें झालींच आहेत. गुजराथनंतर कर्नाटकाचा विचार केला तर बेळगांव, हालसी, हांगल, हूली, कौन्नूर, नंदगड, कलहोले, मनोळी, सौंदत्ती, कोकतनूर, विजापूर, ऐहोली, अरसी बीडी, बादामी, बागलकोट, हुनगुंद, पट्टदकल, तालीकोट, जैनपूर, सिंदगी, धारवाड, बंकापूर, हानगल, लक्कुंडा, मुळगुंद, शिगगांव, हुबळी, लक्ष्मेश्वर, आदुर, डंबळ, देवगिरी, सुंदी, बनवासी, भटकळ, चितकुल, गेरसप्पा, होनावर वगैरे अनेक ठिकाणीं जुन्यावस्त्या आहेत. म्हैसूर संस्थान तर जुन्या वस्त्यांचें आगरच आहे. मद्रास इलाख्यांतील बहुतेक सर्व हिंदू मंदिरें पूर्वीं जिनालयें होतीं.

आतां महाराष्ट्राचा विचार करूं ठाण्याच्या आसपास पूर्वीं जैन-राज्य होतें. त्यामुळें कोंकणप्रांतांत बरींच प्राचीन जिनालयें आहेत. अमरनाथ, बोरीवली, डाहणु, कल्याण, कन्हेरी, गुंफा, सोपारा, तारापुर, वज्राबाई, वशाली, कुलाबा, चिवळ, गोरेगांव, कडागुंफा, महाड, पाले, कोलगुंफा, रायगड, रामधरणपर्वत,

खारेपाटण, दामल, नाशिक, अंजिनी गुंफा, अंकरगुंफा, चांदवड, इगतपुरी गुंफा, चांभारलेणें, सिन्नर, मांगीतुंगी वगैरे. गोवें प्रांतांतहि प्राचीन जैनमंदिरे आहेत. आतां देशावरील जिल्ह्यांचा विचार करूं. नंदुरबार, तुरनमाल, यावलनगर, भामरे, निजामपुर, पीतळ खोरें जैनगुंफा, अजिंठा जैनगुंफा, कन्हाड, वांई, पोमलवाडी, फलटण, बेलापूर, दहीगांव, कोल्हापूर, चावरगुंफा, रायबाग, खेद्रापूर, बीड, हेरले, कुंडल, कुंभोज, स्तवनिधी, बमनी, सावगांव वगैरे याशिवाय जगदंबा करवीर, पंढरीचा विठ्ठल ही प्रसिद्ध मंदिरे व इतरहि अनेक मंदिरें पूर्वी जिनालयेंच होतीं.

आतां ज्या राज्यांत आमचें वास्तव्य आहे त्या हैद्राबाद संस्थानचाच विचार करूं. इ. स. ना पूर्वी या भागावर आंध्रांचें राज्य होतें व त्यावेळीं ते बहुतेक जैनच होते. इ. स. ५५० पर्यंत चालुक्यांनीं राज्य केलें. यांची राजधानी कल्याणपट्टण होय. या घराण्यांतील हि बहुतेक राजे जैन होते. नंतर ते शैव व वैष्णव झाले. मलखेडला राष्ट्रकुटांनीं इ. सनाच्या आठव्या शतकापर्यंत व नंतर यादवांनीं राज्य केलें. यादवांची राजधानी देवगिरी होती. दुधनींहून पांच मैलांवर आतनुचंद्रनाथाचें मंदिर आहे. चंद्रप्रभतीर्थंकरांची दोन हात उंच पद्मासनस्थ मूर्ति आहे. दीड फूट उंचीच्या तीन नग्न मूर्ती व चोवीस तीर्थंकरांची एक मूर्ति आहे. आळंदहून सोळा मैलांवर अष्टें म्हणून गांव आहे. तेथें शके ५२८ मधील विघ्नहर पार्श्वनाथाचें मंदिर आहे. वाटेंत अचलेश्वरगांवीं जें शिवालय आहे, तेंहि पूर्वी जिनालय होतें. परभणी जिल्ह्यांतील किंगेली स्टेशनाहून चार मैलांवर उखलेदगांवीं नेमिनाथांची भव्यप्रतिमा पूर्णानदीचे कांठीं आहे. औरंगाबादेहून वीस मैलावर कचनेर गांवी पार्श्वनाथाचें विशालमंदीर आहे. बारशी शहरापासून वीस मैलांवर कुंथलगिरी आहे. हें सिद्धक्षेत्र असून देशभूषण कुलभूषण मुनि येथून मोक्षाला गेले. त्यांचें चरणचिन्ह तेथें आहे. अलेरस्टेशनापासून चार मैलावर कुलपाक गांवी माणिकप्रभूंचें स्थान आहे. ती मूर्ति आदिनाथांची आहे. गाणगापुराहून बारा मैलांवर तडकलगांवीं शांतिनाथांचे मंदिर आहे. गुलबर्गा जिल्ह्यांतील शाहाबाद स्टेशनापासून दोन मैलावरील वंकुरगांवीं प्राचीन जैनमंदिर आहे. मलखेडचे प्राचीन नांव मलयाद्री होते. हीच जैनसम्राट अमोघवर्षाची राजधानी. अकलंकदेव व जिनसेनाचार्यासारखे जैनविद्वान् येथेंच होऊन गेले. बार्शीहून बारा मैलांवर सांवरगांवीं पार्श्वनाथांचें जुनें मंदिर आहे. होनसलगीला

पार्श्वनाथ व शांतिनाथांच्या मूर्ति आहेत. एलोराच्या जैनगुंफा तर जगप्रसिद्ध आहेत. बोधानची मशीद पूर्वी जिनालय होत. पाटनचेरूला तर खोदावे तेथें जैन अवशेष सांपडतात. येथें इ. सनाच्या सातव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत ज्या राजांनीं राज्य केलें ते जैनधर्मानुरागी होते. खुद्द पाटनचेरू गांवांत कितीतरी जिनालयें आहेत. हे गांव हैद्राबादपासून अठरा मैलांवर आहे.

आतां खुद्द आमच्याच गांवाचा विचार करूं. उस्मानाबादचे पूर्वीचें नांव धाराशिव. हें गांव बार्शी लाइनींवरील येडसी स्टेशनापासून चौदा मैलांवर आहे. शहरापासून तीन मैलावरील डोंगरांत सात जैनगुंफा आहेत. एका गुंफेंत अवगाहनाची पार्श्वनाथांची बैठी मूर्ति आहे. ही गुंफा करकंडुराजानें बांधली. आराधन कथा कोषांत एकशे तेरावी कथा राजा करकंडूची आहे. त्यांत खालील श्लोक आहेत. ' अत्रैव भरतेक्षेत्रे देशे कुन्तल संज्ञके । पुरे तेरपुरे नील महानीलो नरेश्वरौ ४ ॥ अस्मात्तेरपुरादास्ति दक्षिणस्यां दिशि प्रभो । गव्यूति कान्तरेचारू पर्वतस्यो परिस्थितम् ॥ १४४ ॥ धाराशिवपुरंचास्ति सहस्रस्तंभसंभवम् । श्रीमज्जिनद्रदेवस्य भवनं सुमनोहरम् ॥ १४५ ॥ करकंडश्च भूपालो जैनधर्म-धुरंधरः । स्वस्यमातुस्तथा बालदेवस्योश्चैः सुनामतः ॥ १९६ ॥ कारयित्वा सुधीःस्तत्र लवणत्रयमुत्तमम् । तत्प्रतिष्ठा महाभूत्या शीघ्रं निर्माल्य सादरात् ॥ १९७ ॥ यावरून तेर नगरींत नील व महानील म्हणून नरेश्वर होते. तेरच्या दक्षिणेस धाराशिव असून तें जिनेंद्रदेवाचें मनोहर भुवनच आहे. जैनधर्मधुरंधर करकंडराजानें आपली आई व बालदेव यांच्या नांवानें तीन लेणीं कोरलीं व मोठ्या समारंभानें जिनबिंबप्रतिष्ठा केली. धाराशिवाहून तेर आठ मैलांवर आहे. विठ्ठलभक्त गोराकुंभाराच हें गांव होय. येथें महावीरस्वामींचें जुनें मंदिर आहे. इ. स. पहिल्या शतकापासून तेर नगरी विख्यात आहे. त्यावेळचें तिचें नांव तगर होतें. इराणी प्रवाशांनीं या नगरीचें वर्णन केलेलें आहे. अकराव्या शतका-पर्यंत हें शहर फार भरभराटींत होतें. तर्णानदीकांठचें उत्तरेश्वरमंदिर पूर्वी जिनालय होतें.

याप्रमाणें आमचा हा भाग प्राचीनकालीं जैनराजांच्या, पंडितांच्या, शेटजींच्या व इतर श्रावकांच्या कर्तबगारीनें फुलून गेलेला होता. तत्कालीन वैभवास म्लेंच्छांच्या आगमनामुळें व शैववैष्णवादि मिथ्यात्वी मतांच्या हुल्लडीमुळें उतरती कळा लागली. ती इतकी कीं या हुल्लडखोर पंथाप्रमाणेंच

# उपसंहार.

जैनधर्म हा हे एक वैदिकधर्मांतील पंथ आहे असे मानण्यांत येऊं लागलें. जैन म्हणजे बनिया व शूद्र असेंच समजण्यांत येऊं लागले. जैनांची लोकसंख्या फारच अल्प राहिली. जिनालयें शिवालयें, मशिदी किंवा विष्णुमंदिरें बनलीं. इतकी हीन दशा आली तरी जिनशासनाची शुद्धता कांहीं कमी झाली नाहीं. सत्यमेवजयते या वचनानुसार फिरून जैनसंस्कृतीची भरभराट झालेली दिसून येईल. तूर्त मात्र जैनसंस्कृतिकडे कोणाचें लक्ष नाहीं. उत्तरकडील जैन व्यापारमग्न आहेत व दाक्षिणेंतील जैन पोटाच्या मागें लागलेले आहेत. संस्कृतिप्रसाराची नाहीं तर नाहीं; रक्षणाचीहि फिकीर कोणास नाहीं उत्तरेकडील जैनांपेक्षा दक्षिणेंतील जैन अधिक मागासलेले आहेत. अर्थात्च दाक्षिणी भाषांतून जैनवाङ्मय अलीकडे दिसून येत नसल्यास त्यांत काय नवल ! कानडी, तामिल व तेलगु भाषेंतील जुनें वाङ्मय वाचणारेहि जैन दुर्मिळ आहेत; अशा स्थितींत नवी रचना करणारे जैन कोठून मिळणार ! महाराष्ट्रभाषेंत पूर्वी जैनवाङ्मय होतें किंवा नाहीं याचें संशोधन अजून व्हावयाच आहे. हल्ली मराठी भाषेंत प्राचीन जैनग्रंथ एकहि उपलब्ध नाहीं. नवीन रचना होत आहे; व होणें जरूर आहे. आम्ही मूळचे गुजराथी असलों तरी कांहीं पिढ्या महाराष्ट्रांतच गेल्यामुळें महाराष्ट्राचा अभिमान आम्हासहि वाटणें स्वाभाविक आहे. त्यांत पुन्हां इ. स. दहाव्या शतकापूर्वीच्या महाराष्ट्रांत सर्वस्वीं जैनसंस्कृतीच भरभराटीस पोहों-चली होती. असे इतिहासावरून कळत असल्यामुळें तो अभिमान दुणावतो. म्हणून महाराष्ट्राची सेवा करणें आमचें कर्तव्य आहे. महाराष्ट्र भाषेंत जैन-वाङ्मयाची फार त्रुटि आहे हे जाणून ती वाण दूर करण्याचा यथाशक्ति प्रयत्न आम्ही करीत आहों जैनवाङ्मयकुसुममालेचीं सहा पुष्पें आजवर काढलीं व तेरच्या महावीरस्वामीस स्मरून हें सातवें पुष्प महावीरचरित्र म्हणून काढलें आहे. अष्टे येथील विघ्नहरपार्श्वनाथाच्या कृपेनें ऐतिहासिकदृष्ट्या पार्श्वनाथ-चरित्र लिहिण्याची आमची मनीषा निर्विघ्नपणें पार पडो व मराठी वाङ्मयांत जैनवाङ्मयाची अधिकाधिक भरती होत जावो हीच तीव्र इच्छा आहे.

आम्ही येथपर्यंत जें महावीरचारित्र वर्णन केलें आहे तें दिगंबरदृष्टीनें केलेलें आहे. महावीरचरित्राचा विचार आम्हांला सांप्रदायिक दृष्टीनें करावयाचा नसून ऐति-हासिक दृष्टीनें करावयाचा असल्यामुळें बाबूकामताप्रसादनीं आपल्या महावीर-चरित्रांत या दृष्टीनें जी माहिती दिली आहे ती आम्ही खालीं देतों. श्वेतां-

बर सांप्रदायाचे ग्रंथ सुधर्मस्वामी गणधर व भद्रबाहुकेवली यांनीं रचलें असें सांगण्यांत येतें पण ते वीरसंवत् ९८० च्या सुमारास देवर्धिगणीक्षमाश्रमणाचे वेळीं लिपीबद्ध झाले तोंपर्यंत मुखोद्गत होते असेंहि सांगण्यांत येतें. अर्थात् हल्लीं श्वेतांबरग्रंथांतून मिळणारी माहिती सुधर्मस्वामी व भद्रबाहुंना सांगितलेलीच जशीच्या तशी असेल असें म्हणवत नाहीं. उलट ज्या आग्रहामुळें ग्रंथ लिहिण्याची बुद्धि देवर्धिगणीचें काळीं झाली तो आग्रह ह्या ग्रंथांतून डोकावणें अगदीं स्वाभाविक आहे. शिवाय हल्लीं मिळणारें सर्व श्वेतांबर आगम ग्रंथ देवर्धिगणीचे काळींच झाले असेंहि दिसत नाहीं. कारण आगमग्रंथांची भाषा व रचना तर भिन्नभिन्न आहेच; पण त्यांतील अभिप्रायांतहि मतभेद आहे. उदाहरणार्थ समवायांगसूत्रांत आचारांगसूत्राच्या अध्यायांचा जो क्रम व जी संख्या दिली आहे ती हल्लीं नाहीं. कल्पसूत्र श्रुतकेवलिभद्रबाहुंनीं लिहिले म्हणतात. पण त्यांत जी गुरुपरंपरा दिली आहे ती भद्रबाहुनंतरच्या आठशें वर्षांपर्यंतची दिली आहे. भगवतीसूत्रांतहि बरींच परस्परविरोधी वचनें आहेत ही गोष्ट डॉ. बारुआनीं आपल्या आजीवकनामक पुस्तकांत सिद्ध केली आहे. म्हणून श्वेतांबरग्रंथ भगवानमहावीरापासून परंपरेनें चालत आले आहेत असें निश्चितपणें मानतां येत नाहीं. सुधर्मास्वामीपासून तें मुखोद्गत राखलें असलें तरी पाठभेद मुळें, व विसर पडल्यामुळें कांहीं सूत्रें नाहींशीं होणें, तीं विपर्यस्त होणें व नवी घुसडलीं जाणें संभवनीय आहे. नंतरच्या कांहीं अंगधारी मुनींच्या स्मरणांत जेवढीं राहिलीं तीं देवर्धिगणीच्या वेळीं लिपिबद्ध करण्यांत आलीं. धार्मिक मतमतांतरांत बरीच स्पर्धा चालू होती. तिचा प्रभाव या लेखनावर पडला नाहीं असें म्हणणें मनुष्यस्वभावास सोडून आहे. असो.

दिगंबर व श्वेतांबरवर्णनांत महावीरस्वामींचे बाबतींत पहिला मतभेद जन्माबद्दलचाच आहे. सुनन्दाब्राह्मणीचा गर्भाशयांतून त्रिशलाराणीच्या गर्भाशयांत महावीरस्वामींचा गर्भ देवानें आणून ठेवला असें श्वेतांबरग्रंथांत म्हटलें आहे. त्याकाळीं क्षत्रिय वर्ण श्रेष्ठ गणला जात असल्यामुळे व त्यांतल्यात्यांत लिच्छवीवंशाचे क्षत्रिय तर सर्वश्रेष्ठ गणले जात असल्यामुळें सिद्धार्थराजाला ब्राह्मणीभार्याहि असणें संभवनीय आहे आणि ब्राह्मण कुलहीन गणले गेल्यामुळें सुनंदेचा पुत्र त्रिशलादेवीचा मानला गेला असेल. प्रसूतिगृहांत किंवा राजमहालांतून अशा धांदली सर्वत्र घडतातच. किंवा ब्राह्मणांची निंदा करण्यासाठीं म्हणून

मुद्दाम श्वेतांबरग्रंथांतूनही कल्पित कथा घुसडून देण्यांत आली असावी. डॉ. जाकोबीचेंहि असेंच मत आहे. कदाचित् कृष्णचरित्राचा अद्भुतपणा महावीर-चरित्राला आणण्यासाठीं गर्भापहरणाची ही गोष्ट लिहिली गेली असेल. दुसरी मतभेदाची बाब महावीरस्वामींच्या विवाहाची. यशोदा नामक राजकन्येशीं त्यांचा विवाह झाला असून त्यांना प्रियदर्शना नांवाची मुलगीहि झाली होती असें श्वेतांबरग्रंथांत लिहिलें आहे. आम्हांला तर वाटतें कीं, बुद्धचरित्राची ही नक्कल आहे. किंवा आदिनाथतीर्थंकरांच्या चरित्राची नक्कल आहे. महावीरांना नंदिवर्धन वडिल भाऊ व सुदर्शना नांवाची एक बहीण होती असेंहि श्वेतांबरग्रंथांत म्हटलें आहे. पण असा उल्लेख बौद्धग्रंथांत नाहीं. इतर प्रत्येक बाबींचें वर्णन बौद्धाचार्यांनीं केलें आहे. अशा स्थितींत ही महत्वाची गोष्ट ते विसरले नसते. पार्श्वनाथाच्या संघाचें मुनि लंगोटि परिधान करीत होते असेंहि श्वेतांबरग्रंथांत वर्णन आहे पण तें सर्वस्वी चुकीचें आहे. याशिवाय महत्वाचे भेद असे फारसे नाहींत महावीरस्वामींना झालेल्या बऱ्याच उपसर्गांचें वर्णन श्वेतांबर-ग्रंथांतून आहे. वर जे मतभेद दिले आहेत तेंहि तात्विक मतभेद नव्हत. तीर्थंकर ब्रह्मचारीच असले पाहिजेत असा दिगंबरांचा आग्रह नाहीं. ते क्षत्रिय कुळांतच जन्मतात ही गोष्ट दोन्ही सांप्रदायांना कबूलच आहे. महावीरस्वामी नग्नपणें विचरत होते हेंहि श्वेतांबरग्रंथांना मान्य आहे. महावीरस्वामींना गृहस्थी बनविण्यांत ऋषभनाथाइतकेंच त्यांना महत्व देण्याशिवाय दुसरा कोणता हेतु असेल असे वाटत नाहीं. अठ्ठावीसावें वर्षींच दीक्षा घेण्यास महावीरस्वामी तयार झाले होते; पण भावाच्या आग्रहावरून आणखी दोन वर्षें गृहस्थपणांत राहिले व मातेला दुःख देऊन दीक्षा घ्यावयाची नाहीं असा अभिग्रह त्यांनीं मातेच्या पोटांत असतांनाच घेतला असल्यामुळें त्रिशलादेवींच्या मरणापर्यंत त्यांनीं दीक्षा घेतली नाहीं व म्हणूनच ते अठ्ठावीस वर्षें राहिलें; नाहींतर त्यापूर्वींच दीक्षा घेते असेंहि श्वेतांबरग्रंथांतून ध्वनित केलें आहे. यावरून त्यांचें मातृवात्सल्य सिद्ध करण्यांत येतें. पण दीक्षा घेण्यासारखें मुख्य कर्तव्य पुढें ढकलल्यामुळें त्यांचें हें मातृवात्सल्यहि आक्षेपार्ह ठरते ही गोष्ट श्वेतांबरशास्त्रकार विसरले. असो. एकंदरींत तत्वाला बाध येईल किंवा येथपर्यंत वर्णन केलेल्या चरित्राला विशेष बाध येईल किंवा त्याच्या ऐतिहासिकपणाला धोका येईल असें श्वेतांबरदृष्टीच्या वर्णनांतहि कांहीं नाहीं हें वाचकांनाहि दिसून येईलच.

महावीरस्वामींचे दैवी गुण सांगणें मानवीबुद्धीच्या आटोक्याबाहेरचें काम आहे. पण एक मनुष्य या दृष्टीनें त्यांच्यामध्यें जे गुण दिसून येतात तें वर्णन करणें शक्य आहे व तें अनुकरणीय आहेत. त्यांच्या चरित्राकडे नजर टाकल्याबरोबर डोळ्यात भरणारी गोष्ट हीच कीं, त्यांचें चरित्र असामान्य व अलौकिक असलें तरी तें अद्भुत व अस्वाभाविक नाहीं. रामकृष्णादि अवतारी पुरुषांच्या चारित्रांत जो अद्भुतपणा दिसतो तो महावीरस्वामींच्या चरित्रांत मुळींच नाहीं. किंवा म. बुद्ध व म. ख्रिस्त यांच्या चारित्रात ज्या विलक्षण घडामोडी दिसतात त्याहि यांच्या चरित्रांत दिसून येत नाहीत. शंकराचार्यादि आचार्यांच्या चरित्रांत दिसून येणारी मतप्रसाराची धडपड याच्यामध्यें नाहीं व तुलसीदास, तुकाराम, कबीर, चैतन्य, नानकादि साधुसंतांमधील भावनाप्रधानताहि नाहीं. जशी झाडांची वाढ संथपणानें होते व त्याला फळ येतें त्याप्रमाणें अगदीं स्वाभाविकरीतीनें त्याचें आयुष्य श्रेष्ठ उद्दिष्टाकडे चाललें होतें. त्यांना आकस्मिक वैराग्य झालें नाहीं तर तें क्रमानेंच झालें. त्यांना एकदम देव भेटला नाहीं किंवा देवानें त्यांना लोककल्याणाची स्फूर्तिहि दिली नाहीं; सतत बारा वर्षे खडतर तपश्चर्या केल्यानंतर त्यांना त्यांचें ध्येय प्राप्त झालें व सर्वज्ञ झाल्यानंतर अगदीं नैसर्गिकपणेंच त्यांनीं उपदेश देण्यास सुरवात केली. प्रत्येक मानवाला त्यांचें सारखें होता येईल व प्रत्येक भव्यजीवाला त्या स्थितींतून जावयाचेंच आहे. राम, कृष्ण, बुद्ध, ख्रिस्त व महंमद मात्र प्रत्येकाला होतां येणार नाहीं. हे पुरुष अद्भुत होत. पण महावीर हे पूर्ण पुरुष होत व तसें सर्वच भव्यप्राण्यांना व्हावयाचें आहे.

महावीरस्वामींच्या उपदेशात एकांतिकपणा व एकदेशीयपणा मुळींच नव्हता. त्यांनीं एकाच मार्गाचा कधींच हट्ट धरला नाहीं. किंवा त्यांच्या उपदेशांतून कोणत्याहि पेशाचे स्त्रीपुरुषच काय पण पशुपक्षी, कृमिकीटक व वनस्पतिहि सुटल्या नाहींत. जेथें जेथें जीव आहे तेथें तेथें मोक्षासाठीं म्हणजे शाश्वत सुखासाठीं धडपड आहे. आपणास जशी सुखाची अपेक्षा आहे तशी प्रत्येक जीवासहि आहे हें समजून कोणीहि जीवानें दुसऱ्या जीवाला उपसर्ग करूं नये ही अहिंसावृत्तीची शिकवण महावीरस्वामींची प्रमुख शिकवण होय. त्यांच्या काळांत स्वसुखाखातर युद्धें खेळलीं जात व यज्ञांत बलिदान केलें जाई महावीरस्वामींच्या अहिंसात्मक उपदेशानें युद्धांना व मूक जनावरांच्या बलिदानांना

बराच आळा बसला. त्याचप्रमाणें ज्ञान, भक्ति, योग किंवा सगुण व निर्गुण उपासना वगैरे कोणत्याहि एका मोक्षमार्गाचा त्यांनीं हट्ट न धरतां त्या सर्वांचा समन्वय करून सांगितला व ज्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणें ज्यानें त्यानें कोण-ताहि मार्ग पत्करावा असा त्यांनीं उपदेश केला त्याचाहि बराच इष्ट परिणाम तत्कालीन् भिन्न भिन्न मतांच्या लोकांवर झाला.

तिसरी महत्त्वाची गोष्ट महावीरस्वामींच्या चरित्रांत दिसून येते ती स्वावलंबनाची. व्यावहारिक बाबतींतील स्वावलंबनाचें महत्त्व सर्वांना कळतें. व परावलंबी माणसाचा सर्वजण तिरस्कार करतात; पण अध्यात्मिक बाबतींत मात्र ईश्वरेच्छेवर किंवा सद्गुरु कृपेवर अवलंबून राहणाऱ्याला श्रेष्ठ मानण्याची जगाची रीत आहे. महावीरस्वामींनीं ही भ्रामक कल्पना धुळीस मिळवून दिली. व्यावहारिक बाबतींत क्वचित् परावलंबी असले तरी चालेल; पण अध्यात्मिक बाबतींत परावलंबन कुचकामाचें होय ही गोष्ट त्यांनीं स्वतःच्या आचरणानें पटवून दिली. त्यांनीं केवलज्ञान व निर्वाणप्राप्तीसाठीं स्वावलंबनाचाच मार्ग पत्करला. ते गुरू शोधीत फिरले नाहींत किंवा ईश्वराचा धांवाहि करीत बसले नाहींत, तर एकदम मोक्षसाधक क्रियाच करूं लागले. ध्येयसिद्धि झाल्या नंतरहि ते म. बुद्धाप्रमाणें इतरांचें दुःख निवारण करण्यासाठीं दौरा काढूं लागले नाहींत किंवा म. ख्रिस्ताप्रमाणें सर्व प्राण्यांच्या पातकाची जबाबदारी आपल्यावर घेतली नाहीं. महंमदाप्रमाणें आपण ईश्वराचे प्रेषित आहोंत असें सांगून किंवा इतर अनेकांनीं केले त्याप्रमाणें आपण ईश्वराचे अवतार आहोंत किंवा मोठे संत महात्मे आहोंत असें सांगून लोकांना आपल्या नादीं लावून त्यांना पराव-लंबीहि बनविलें नाहीं. माझ्यासारखे तुम्हांला व्हावयाचें आहेच; व तसें होण्या-साठीं पूर्वापार ठरलेला जो मार्ग मी आचरिला तोच तुम्हालाहि चोखाळावा लागेल. शुद्धात्मपद कोणालाहि देतां येत नाहीं. हाच त्यांचा उपदेश असे ज्यांनीं त्याचें ध्येय डोळ्यापुढें ठेऊन योग्य करणी केली ते मोक्षाला गेले व पुढें जातील इतरांना भवभ्रमण व सुखदुःखाचें भोक्तृत्व कांहीं सुटलेले नाहींच. गरजा भागविणें हें त्याचें ध्येय नव्हतें. अर्थात् जगांत एखादी क्रांति करण्यासाठीं ते जन्मले नसून ते आत्मोद्धारासाठींच जन्मले होते. लोककल्याणासाठीं अवतरले नसून आत्मकल्याणासाठींच जन्मले होते. ते आत्मकल्याण साधीत असतां लोक-कल्याण झाले व जगांत विलक्षण क्रांति झाली ही गोष्ट निराळी.

याप्रमाणें महावीर तीर्थंकरांच्या चरित्राकडे अध्यात्मिक दृष्टीनें पाहतांना असें इतरांहून निराळया व असामान्य दृष्टीनें पाहावें लागतें त्याचप्रमाणें व्यावहारिक दृष्टीनें किंवा ऐतिहासिक दृष्टीनें त्यांच्या चरित्राकडे पाहतांनाहि विशेष निराळया दृष्टीनेंच पाहावें लागतें. अवतारांचें वेड ज्यांच्या डोक्यांत शिरलें आहे किंवा लोककल्याण व क्रांतीच्या कल्पनेनें ज्यांच्या डोक्यांत घर केलेलें आहे ते महावीरस्वामींना अवतार समजतात व त्यांनीं वैदिकधर्मांत क्रांति करून लोककल्याण केलें असें मानतात. पण ही गोष्ट खोटी आहे. तसें पाहिल्यास सर्व पुण्यात्मे कीं जे देवगतींतून मनुष्यगतींत येतात ते अवतारच होत. या दृष्टीनें महावीरस्वामींहि अवतारच होत. कारण तेहि देवगतींतून मनुष्य लोकीं अवतरले होते. पण जगाच्या उद्धारासाठीं अवतरलेले अवतार ते नव्हत. त्यांनीं कोणा भक्ताचें रक्षण केलें नाहीं किंवा दुष्टाचा संहार केला नाहीं कारण दोन्हीहि त्यांना नव्हतें. त्यांनीं आत्मकल्याण करून घेतलें व भव्यजीवांचे अंतिम ध्येय साध्य केलें आणि ते असें करीत असतांना त्यांचें आचरण पाहून जीवांनीं जीं कर्मे केलीं तीं क्रांतीला कारण झालीं.

एकंदरींत महावीरस्वामींच्या चरित्रापासून प्रत्येक जीवानें जो बोध घ्यावयाचा तो हाच कीं प्रत्येक जीवाला सुखाची इच्छा असल्यामुळें व तोच त्याचा स्वभाव असल्यामुळें सुख मिळविण्याच्या त्याच्या मार्गांत कोणीहि जीवानें विघ्न आणूं नये. शाश्वतसुख मिळविण्याचा मार्ग एकांतिक नसून अनेकांतिक आहे. कोणत्याहि मार्गाचा हट्ट धरून चालणार नाहीं. हें शाश्वतसुख कोणीहि कोणाला देऊं शकणार नाहीं. तें ज्याचें त्यानेंच मिळविलें पाहिजे. जगांत कांहींतरी अद्भुत करणें हें माणसांचें ध्येय नसून शाश्वतसुख मिळविणें हेंच प्रत्येकाचें ध्येय आहे. हें ध्येय माणसापुरतेंच परिमित नसून सर्व पशुपक्षी, कृमिकीटक, जीवजंतु व वनस्पति यांनाहि आहे. महावीरस्वामींनीं उपदेशिलेल्या अहिंसेचें रहस्य दया नसून सर्वांना आपल्या इतकाच अधिकार आहे ही मान्यता आहे. त्यांच्या अस्तेय, अपरिग्रह, ब्रह्मचर्य या व्रतांतील रहस्य हेंच कीं त्यांतच शाश्वत व निरपेक्ष सुख आहे. ईश्वर–कर्तृत्ववाद जो त्यांनीं खोडून दाखविला त्याचें कारणहि आत्म्याचें निरुपाधिकत्व व स्वावलंबनच होय. जीवात्म्याला स्वतंत्र कर्तृत्व व भोक्तृत्व आहे यावरच सर्व कर्मतत्त्वज्ञान उभारलेलें आहे. सर्व कर्मांचा त्याग व क्षय हाच निश्चित मोक्षमार्ग आहे व सम्यक्‌ज्ञान, सम्यक्‌दर्शन व

सम्यक्‌चरित्र या रत्नत्रयींच्या अवलंबनानेंच तो मार्ग साधेल हें खरें; पण त्यासाठीं अमुक तऱ्हेचीच उपासना, व वेष असला पाहिजे असा कदाग्रह त्यांनीं प्रतिपादिलेला नाहीं. म्हणून त्यांच्या तत्त्वज्ञानास अनेकांत वाद म्हणतात. याप्रमाणें महावीरांनीं उपदेशिलेला मार्ग सर्वसाध्य व परिपूर्ण आहे.

हा मार्ग नेहमींच सुफलदायी व आवश्यक असतो. पण हल्लीं जीवाजीवांत जी स्पर्धा चालू आहे; मतामतांचा गलबला माजला आहे, देश, वर्ण व जातीमुळें जे कलह मातले आहेत या सर्व संकुचित भावनेमुळें ऐहिक सुखांतहि जो खंड पडत आहे तो दूर व्हावा अशी इच्छा असणाऱ्यांनाहि महावीरांचा निर्ग्रंथ व अनेकान्त मार्गच पत्करणें भाग आहे. खरें सुख पौद्गलिक उपभोगाच्या त्यागांतच आहे. हे जीव जाणतील तर क्षणिक सुखासाठीं इतकी धडपड करून जीवाजीवांत स्पर्धा वाढविणार नाहींत. शेवटीं प्रत्येक जीव शाश्वत सुखदायक मोक्षपदालाच जाणार आहे, कारण तोच त्याचा स्वभाव आहे हें जाणून प्रत्येक जीवाला अनुकूल असेल तो मार्ग सुखप्राप्तीसाठीं मिळविण्याचा अधिकार आहे हें जर जीव जाणतील तर ते परमताबद्दल असहिष्णु होणार नाहींत. वनस्पतीपासून पंचेंद्रियप्राण्यापर्यंत सर्व जीवांना या जगांत स्थान आहे व ते राहणारच हें जाणून जाति, वर्ण, देशादि परिमित बाबींचा विचार करून कोणाचाहि द्वेष करण्यांत अर्थ नाहीं हे सर्व जीव जाणतील तर बरेच कलह ताबडतोब मिटतील. पण या सर्व गोष्टी लक्षांत न घेतां जीव धडपडत आहे व स्वसुखांत माती कालवीत आहे. त्याचींच कर्मे त्याच्या दुःखाला कारण आहेत. दुसरे कोणी त्याला दुःख देत नाहीं व सुखहि देत नाहींत. दोन्ही त्याच्याच हातीं आहेत. त्याचीं कर्मे त्याला नडत आहेत, या कर्मांचा क्षय होऊन नवीं कर्मे करण्याचें टाळून शाश्वत सुख मिळविण्याची सन्मति सर्व जीवांना प्राप्त होवो ही भावना भावून आतां पुरें करतों.

---

श्री रत्न जैन ग्रंथ माला नं. ११

# जैन धर्माचें अहिंसातत्त्व.

अनुवादक

मुनि श्री आनंद ऋषिजी महाराज

---:*:---

१९२९

# सुवर्ण नामावळी

स्तंभः—मुनि श्री आनंद ऋषिजी महाराज

आजीवन सदस्य (Life Members)

१ श्री हीरचंदजी नानुलालजी पारख

२ श्री मानकचंदजी सेरमलजी सुराना

सदर बाजार नागपूर.

## आश्रयदाता

१ श्री नंदरामजी चांदमलजी बोहरा

मु. पीपला जि. अहमदनगर

२ श्री लालचंदजी रतनचंदजी भटेवडा

मु. राहु जि. पुणें

३ श्री फतेराजजी धनराजजी सिंगी

मु. सिंधी जि. नागपूर.

श्रीरत्न जैन ग्रंथमाला नं. ११

॥ श्री पंचपरमेष्ठिभ्यो नमः ॥

# जैन धर्माचें अहिंसातत्त्व.

अनुवादक

मुनि श्री आनंद ऋषिजी महाराज

श्रीमान् उमेदमलजी चुनीलालजी कटारीया
मु. गोलगांव जि. यवतमाळ
यांच्या आश्रयानें

प्रकाशक

श्री जैन धर्म प्रसारक संस्था
सदर बाजार नागपूर.

प्रथमावृत्ति २१०० | वीरसंवत २४५२ | मूल्य प्रति ८- शेकडा रू. ५

विक्रीचे पैसे पुस्तक प्रकाशित करण्यास लागतात.

# धन्यवाद

मुक्काम राळेगांव जि. यवतमाळ येथील **श्रीयुत उमेदमलजी चुनीलालजी कटारीया** यांनीं आर्थिक सहायता देऊन या पुस्तकास प्रकाशित करून दिले, म्हणून त्या धर्मप्रेमी आणि ज्ञानप्रचारक सज्जनांचा ही संस्था अंतःकरणपूर्वक धन्यवाद देत असतां आभार मानीत आहे.

मंत्री

# प्रस्तावना.

तत्त्वजिज्ञासु बांधवांनो! आपल्या करकमलांत **श्री जैन धर्म प्रसारक संस्थेचें "जैन धर्माचें अहिंसा तत्त्व,,** नामक अकरावें ट्रॅक्ट देत असतां आह्मांस विशेष हर्ष वाटतो. साहित्यसंशोधक ज्ञानप्रसारक संवेगी **मुनि श्री जिन विजयजी** यांनीं हिंदी भाषेंत "**महावीर**,, नांवाच्या पत्रांत जें लेख रूपानें प्रकाशित केलें होतें, त्यांसच श्री आत्मानंद जैन ट्रॅक्ट सोसायटी अंबाला येथें पुस्तक रूपानें छापिलें. या पुस्तकाच्या नांवावरूनच वाचकांच्या लक्षांत येईल कीं यामध्यें जैन धर्मांत सांगितलेल्या अहिंसेचें तत्त्व ( रहस्य ) आहे. त्यास न समजल्यामुळें मोठमोठाल्या देशनेत्यांच्या मनांत अहिंसेविषयीं ज्या असंबद्ध कल्पना आल्या होत्या, त्यांचें शास्त्रसम्मत आणि युक्तिपूर्वक समाधान केलें आहे. जसें:– अहिंसेची, व्याख्या, अहिंसेचे भेद आणि अधिकारी–गृहस्थाश्रमी अहिंसा कोठपर्यंत आहे आणि महाव्रती अर्थात् साधूंच्या अहिंसेची मर्यादा कोठपर्यंत आहे? हें चांगल्या प्रकारें मूळ लेखकानें दर्शविलें आहे. शेवटीं असें ठरविलें कीं, "जैनधर्मीय अहिंसेच्या कारणानें देशाला पारतंत्र्य आलें नाहीं आणि अहिंसेपासून मनुष्यें निर्वीर्य देखील बनत नाहींत" अहिंसा देवीची आराधना करणाऱ्यांनीं या पुस्तकास वाचून चांगलें मनन करावें आणि अहिंसेविषयीं चांगल्या प्रकारें ज्ञान न मिळविल्यामुळें अज्ञान सूचक कल्पना करणाऱ्यांनीं एक वेळीं तरी या पुस्तकाचें साद्यंत अवलोकन करावें, अशी आमची आग्रहपूर्वक सूचना आहे. परमोपकारी जैन धर्म स्तंभ **मुनि श्री १००८ श्री रत्न ऋषिजी महाराजांचे**

शिष्य मुनि **श्री आनंद ऋषिजी महाराजांनीं** या पुस्तका पासून महाराष्ट्रीय लोकांनाहीं लाभ मिळावा ह्या हेतूनें मराठी भाषेंत भाषांतर करून दिलें. ह्मणून त्यांचा, त्याचप्रमाणें **श्री आत्मानंद जैन ट्रैक्ट सोसायटी अंबाला** येथील सेक्रेटरी कडून मराठी भाषेंत पुस्तक प्रसिध्द करण्याविषयीं आह्मांस परवानगी मिळाली ह्मणून त्या सोसायटीचा आणि नागपूर चे **श्री माणिकराव बालाजी आगरकर** जैन मास्तर यांनीं या पुस्तकास तपासण्याकरितां जी अमूल्य वेळ दिली ह्मणून त्यांचा, श्री जैन धर्म प्रसारक संस्था धन्यवाद पूर्वक आभार मानीत आहे.

प्राणीमात्रांच्या ठिकाणीं करुणा भावना उत्पन्न होऊन जगांत परस्पर सुखानें नांदोत, अशा शुभ मनोकामनेस प्रदर्शित करून ही प्रस्तावना पुरी करितो.

मंत्री

श्री शांतिप्रभवे नमः

# जैन धर्माचें अहिंसातत्त्व.

जैन धर्मामध्यें सर्वच आचार आणि विचार फक्त अहिंसेच्या तत्त्वावर रचिले गेले आहेत. असें तर भारतवर्षांतील ब्राह्मण, बौद्ध वगैरे सर्वच प्रसिद्ध धर्मांनीं अहिंसेला परम धर्म गणिले आहे आणि सर्व ऋषि मुनि, साधु, संत, वगैरे उपदेशकांनीं अहिंसेचे महत्त्व दाखवून, ती स्वीकार करण्यायोग्य आहे असें दाखविलें; तरीही या तत्त्वास जितकें विस्तृत, जितकें सूक्ष्म जितकें खोल, आणि जितकें आचरण करण्यास योग्य, जैन धर्मानें दाखविलें, तितकें दुसऱ्या कोणत्याही धर्मानें दाखविलें नाहीं. जैन धर्माच्या प्रवर्तकांनीं अहिंसातत्त्वास चरम सीमेपर्यंत पोंचविलें आहे. त्यांनीं फक्त अहिंसेचें कथनच केलें नाहीं, परंतु तिचें आचरण देखील तसेंच करून दाखविलें आहे. निरनिराळ्या धर्मांचें अहिंसातत्त्व फक्त कायिक बनून राहिलें आहे, परंतु जैन धर्माचें अहिंसातत्त्व त्यांच्या पेक्षां पुष्कळ अंशीं पुढें वाढून, वाचिक आणि मानसिकाच्याही पुढें आत्मिक रूप बनलें आहे. दुसऱ्याच्या अहिंसेची मर्यादा मनुष्य आणि त्याहून जास्त झाले तर पशु पक्ष्यांच्या जगापर्यंत जाऊन समाप्त होते परंतु जैनधर्माच्या अहिंसेची तर कांहीं मर्यादाच नाहीं, तिच्या मर्यादेंत सगळ्या चराचर जीवजातीचा समावेश होतो, तरीही ती तशीच अमित राहतें. ती जगासारखी अमर्यादित–अनंत आहे आणि आकाशासारखी सर्व पदार्थ व्यापी आहे. परंतु जैनधर्मांतील ह्या मोठ्या तत्वाच्या यथार्थ रहस्याला समजण्याकरितां फारच थोड्या मनुष्यांनीं प्रयत्न केला आहे. जैनांच्या ह्या अहिंसे विषयीं लोकांमध्यें फारच अज्ञानता आणि बेसमज

वाढली आहे. कोणी या अहिंसेला अव्यवहार्य ह्मणजे व्यवहार करण्यास योग्य नाहीं असें ह्मणतो तर कोणी अनाचरणीय ह्मणजे आचरण करण्यास योग्य नाहीं असें ह्मणतो. कोणी ह्या अहिंसेला आत्म्याचा घात करणारी आहे असें ह्मणतो तर कोणी राष्ट्राचा नाश करणारी ह्मणतो. कोणी ह्मणतो कीं जैन धर्माच्या अहिंसेनें देशाला परतंत्र बनविलें आणि कोणी ह्मणतो कीं ह्या अहिंसेनें प्रजेला वीर्यरहित ह्मणजे पराक्रमशून्य बनविलें आहे. या प्रमाणें जैन धर्माच्या अहिंसे विषयीं पुष्कळ मनुष्यांचे पुष्कळसे कुविचार ऐकण्यांत येतात.

कांहीं वर्षांपूर्वीं देशभक्त, पंजाब केसरी, लालाजींनीं देखील एक असाच भ्रमात्मक विचार प्रकाशित केला होता, त्यांत महात्मा गांधीजीकडून प्रचारित अहिंसातत्वाचा विरोध केला होता, आणि नंतर त्याचें समाधानकारक उत्तर स्वतः महात्माजींनीं दिलें होतें. लालाजी-सारखे प्रौढ विद्वान् आणि प्रसिद्ध देशनायक होऊन, त्याचप्रमाणें जैनसाधूंचा पूर्ण परिचय ठेवीत असतांही, जर ह्या अहिंसेविषयीं असे भ्रांत विचार ठेऊं शकतात, तर मग दुसऱ्या साधारण मनुष्यांची गोष्टच काय सांगावी ?

आतांच कांहीं दिवसापूर्वीं जी. के. नरीमन नांवाच्या एका पारसी विद्वानानें महात्मा गांधीजीस संबोधन करून एक लेख लिहिला आहे. त्यांमध्यें त्यांनीं जैनांच्या अहिंसेविषयीं असेच भ्रमपूर्ण उद्गार प्रकट केले आहेत. मि. नरीमन एक चांगले ओरिएंटल स्कॉलर ह्मणजे पौर्वात्य पंडित आहेत आणि त्यांना जैन साहित्य व जैन विद्वानांचा कांहीं परिचय देखील आहे असें माहीत पडतें. जैन धर्माशीं परिचित आणि प्राचीन इतिहासाला जाणणाऱ्या विद्वानांच्या मुखांतून जेव्हां असे अविचारी उद्गार ऐकण्यांत येतात, तेव्हां साधारण मनुष्यांच्या मनांत

वर सांगितलेली भ्रांति बिंबून जाणें साहजिक आहे. याकरितां आम्ही येथें संक्षिप्त रीतीनें आज जैनधर्माच्या अहिंसेविषयीं ज्या वर सांगितलेल्या भ्रांतिमूलक कल्पना जनसमाजांत पसरल्या आहेत, त्यांचा खोटेपणा दाखवितो.

जैनधर्माच्या अहिंसेविषयीं पहिला आक्षेप हा केला जातो कीं, जैन धर्माच्या प्रवर्तकांनीं अहिंसेची मर्यादा इतकी लांब आणि इतकी विस्तृत बनविली आहे कीं त्यामुळें सरासरी अव्यवहार्याच्या कोटींत ती जाऊन पोहोंचली आहे. जो कोणी या अहिंसेचें पूर्णरूपानें पालन करण्यास इच्छील, त्यास आपल्या सर्व जीवनक्रिया बंद कराव्या लागतील आणि निश्चेष्ट होऊन शरीराचा त्याग करावा लागेल. जीवनव्यवहारास चालू ठेवणें आणि ह्या अहिंसेचें पालन करणें, ह्या दोन्हीं गोष्टी परस्पर विरुद्ध आहेत, ह्मणून ह्या अहिंसेचें पालन करण्याचें तात्पर्य आत्मघात करणें आहे, वगैरे.

जैन अहिंसेची मर्यादा फारच विस्तृत आहे, ह्मणूनच पालन करणें सर्वांकरितां फारच कठीण आहे, यांत कांहीं संशय नाहा; तथापि ही सर्वथा अव्यवहार्य आहे किंवा आत्मघातक आहे, या सांगण्यांत कांहींच तथ्यांश नाहीं. ही अहिंसा अव्यवहार्यही नाहीं; आणि आत्मघातक देखील नाहीं. ही गोष्ट तर सर्व लोक स्वीकारितात आणि मान्य करितात कीं, ह्या अहिंसा तत्त्वाच्या प्रवर्तकांनीं अहिंसेचें आचरण आपल्या आयुष्यांत पूर्ण रूपानें केलें होतें. अहिंसा पालन पूर्णतया करीत असतांनांहि पुष्कळशा वर्षांपर्यंत ते जिवंत राहिलेत आणि जगास आपलें परमतत्त्व समजावीत राहिलेत. त्यांच्या उपदेशानुसारे अन्य असंख्य मनुष्यांनीं आजपर्यंत या तत्त्वाचें यथार्थ पालन केलें, परंतु कोणालाहि आत्मघात करण्याचें काम पडलें नाहीं ह्याकरितां ही गोष्ट तर सर्वांच्या अनुभवावरून सिद्ध झालेलीच आहे कीं, जैन अहिंसा अव्यवहार्यही नाहीं

आणि अहिंसा पालन करण्याकरितां आत्मघाताचीही आवश्यकता नाहीं. हा विचार तर त्याच प्रमाणें आहे. ज्याप्रमाणें महात्मा गांधी यांनीं देशाच्या उध्दाराकरितां जेव्हां असहयोगाची योजना उद्घोषित केली होती, तेव्हां अनेक विद्वान आणि नेता ह्मणविणाऱ्या मनुष्यांनीं त्यांच्या ह्या योजनेस अव्यवहार्य आणि राष्ट्रनाशक दाखविण्याविषयीं मोठ मोठाल्या गोष्टी केल्या होत्या आणि जनतेस त्यांच्यापासून सावध राहण्याविषयीं सूचना केल्या होत्या; परंतु अनुभव आणि आचरणावरून आतां हें निःसंदेह सिध्द झालें कीं असहयोगाची योजना अव्यवहार्यही नाहीं व राष्ट्राचा नाश करणारीही नाहीं. हां, जो आपल्या स्वार्थाचा भोग देण्याकरितां तयार नाहीं आणि आपल्या सुखांचा परित्याग करण्यास तत्पर नाहीं, त्यांच्या करितां ह्या दोन्ही गोष्टी अवश्य अव्यवहार्य आहेत, यामध्यें कांहींच संशय नाहीं. स्वार्थत्याग आणि सुखाकडे दुर्लक्ष केल्याशिवाय आत्म्याचा किंवा राष्ट्राचा उध्दार केव्हांही होत नाहीं. राष्ट्राला स्वतंत्र आणि सुखी बनविण्याकरितां ज्याप्रमाणें सर्वस्व अर्पण करण्याची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें आत्म्याला आधि ह्मणजे मानसिक दुःख, व्याधि अर्थात् शारीरिक दुःख, आणि उपाधिपासून स्वतंत्र होण्याकरितां तसेंच दुःख द्वंद्वापासून मुक्त बनविण्याकरितां सुध्दां, सर्व क्षणभंगुर सुखांचें बलिदान करून देण्याची आवश्यकता आहे. ह्याकरितां जो मुमुक्षु ह्मणजे बंधनापासून मुक्त होण्याची इच्छा ठेविणारा आहे, राष्ट्र आणि आत्म्याच्या उध्दाराविषयीं इच्छा करणारा आहे, त्याला तर ही जैन अहिंसा अव्यवहार्य आणि आत्मनाशक आहे असें केव्हांही माहीत होणार नाहीं. परंतु स्वार्थामध्यें लुब्ध बनलेले आणि सुखाची इच्छा करणाऱ्या जीवांची गोष्ट वेगळी आहे.

जैन धर्माच्या अहिंसेवर दुसरा परंतु मोठा आक्षेप हा केला जातो कीं ह्या अहिंसेच्या प्रचारानें भारतवर्षास परतंत्र बनविलें आणि प्रजेस

निर्वीर्य ह्मणजे पराक्रमहीन केलें. ह्या आक्षेपास करणाऱ्यांचें मत असें आहे कीं, अहिंसेच्या प्रचारामुळें लोकांत शौर्य राहिलें नाहीं; कां कीं हिंसेपासून उत्पन्न होणाऱ्या पापा पासून भिऊन लोकांनीं मांस भक्षण करणें सोडून दिलें आणि मांस भक्षण केल्याशिवाय शरीरांत शक्ति व मनांत शौर्य उत्पन्न होत नाहीं, ह्मणूनच प्रजेच्या हृदयांतून युध्दाची भावना नष्ट झाली. त्या कारणामुळें विदेशी आणि परधर्मी लोकांनीं भारतावर आक्रमण करून, त्यास आपल्या स्वाधीन करून घेतलें. याप्रमाणें अहिंसेच्या प्रचारानें देश पराधीन आणि प्रजा पराक्रमशून्य बनली.

अहिंसेविषयीं केलेली ही कल्पना नितांत (बिलकूल) युक्तिशून्य आणि सत्यापासून पराङ्मुख आहे. ह्या कल्पनेच्या मूळांत फारच मोठी अज्ञानता आणि अनुभवशून्यता राहिलेली आहे. जे ह्या विचारांना प्रदर्शित करितात त्यांना एक तर भारताच्या प्राचीन इतिहासाविषयीं पत्ता नसला पाहिजे, नाहीं तर जगांतील मानव समाजाच्या परिस्थितीचें ज्ञान नसलें पाहिजे. भारताच्या पराधीनतेचें कारण अहिंसा नाहीं परंतु भारताची अकर्मण्यता (निरुद्यमित्व) अज्ञानता आणि असहिष्णुता (दुसऱ्यांच्या बढतीला पाहून सहन न होणें) आहे आणि या सर्वांचें मूळ हिंसा आहे.

जेथपर्यंत भारतवर्षांत अहिंसा प्रधान धर्मांचा अभ्युदय राहिला होता, तेथपर्यंत प्रजेमध्यें शांति, शौर्य, सुख, आणि संतोष यथेष्ट व्याप्त झालेले होते, याप्रमाणें भारताचा प्राचीन इतिहास स्पष्टपणें सांगत आहे. अहिंसा धर्माचे महान् उपासक आणि प्रचारक नृपति मौर्य, सम्राट् चंद्रगुप्त आणि अशोक होते, यांच्या काळांत भारतवर्ष परतंत्र झालेला होता काय ? अहिंसा धर्माचे कट्टर अनुयायी दाक्षिणात्य कदंब, पल्लव, आणि चौलुक्य वंशांतील प्रसिद्ध प्रसिद्ध

महाराजे होते, यांच्या राज्यकाळीं कोणत्याही परचक्रानें येऊन भारतास पीडित केलें होतें काय? अहिंसातत्त्वाचे अनुयायी चक्रवर्ती सम्राट् श्रीहर्ष होते, त्यांच्यावेळीं भारतास कोणीही पददलित केलें होतें काय? अहिंसा मताचें पालन करणारा दक्षिणस्थ राष्ट्रकूट वंशांतील नृपति अमोघवर्ष आणि गुजराथेंतील चालुक्य वंशीय प्रजापति कुमारपाल होता, यांच्या अहिंसेविषयीं उपासने पासून देशाची स्वतंत्रता नष्ट झाली होती काय? इतिहास तर साक्ष देऊन राहिलेला आहे कीं, ह्या राजांच्या राजत्वकाळीं भारतवर्ष अभ्युदयाच्या शिखरावर पोंहोंचलेला होता. जेथपर्यंत भारत वर्षांत बौद्ध आणि जैनधर्माचा जोर होता, तसेंच जेथपर्यंत हे धर्म राष्ट्रीय धर्म ह्मणविले जात होते, तेथपर्यंत भारतवर्षांत स्वतंत्रता, शांति, संपत्ति वगैरे पूर्णरूपानें राहिलेली होती. अहिंसेची उत्कृष्ट उपासना करणाऱ्या ह्या राजे लोकांनीं अहिंसा धर्माचें पालन करीत असतांना सुध्दां पुष्कळशीं युध्दें केलीत. पुष्कळशा शत्रूंचा पराजय केला आणि पुष्कळशा दुष्ट लोकांना दंडही केला. यांच्या अहिंसेच्या उपासनेनें देशाला परतंत्र बनविलें नाहीं व प्रजेला पराक्रमशून्यही बनविलें नाहीं. ज्यांना गुजराथ आणि राजपुताना येथील इतिहासाविषयीं थोडे फारहि वास्तविक ज्ञान असेल, ते जाणूं शकतात कीं, ह्या देशांना स्वतंत्र, समुन्नत आणि सुरक्षित ठेवण्या करितां जैनांनीं कोण कोणत्या प्रकारें पराक्रम करून दाखविले होते. ज्यावेळीं गुजराथेंतील राज्यकार्याचा भार जैनांच्या स्वाधीन होता अर्थात् महामात्य, प्रधान, सेनापति, कोषाध्यक्ष वगैरे मोठमोठाले अधिकार जैनांच्या स्वाधीन होते; त्यावेळीं गुजराथचें ऐश्वर्य उन्नतीच्या चरम सीमेवर चढलेलें होतें. गुजराथच्या सिंहासनाचें तेज चोहोंकडे व्यास झालेलें होतें. गुजराथच्या इतिहासांत सेनापति विमलशाहा, मंत्री मुंजाल, मंत्री शांतु, महामात्य उदयन आणि बाहड, वस्तुपाल आणि तेजपाल

आभू आणि जगडू, वगैरे जैन राजद्वारी पुरुषां करितां जें स्थान आहे, तें दुसऱ्या करितां नाहीं. फक्त गुजराथच्याच इतिहासांत नाहीं, परंतु साधारणपणें भारतवर्षाच्या इतिहासांत देखील ह्या अहिंसाधर्माची परम उपासना करणाऱ्यांच्या पराक्रमाशीं सारखेपणा ठेविणारी मनुष्यें फारच कमी मिळतील. ज्या धर्माचे परम अनुयायी स्वतः असे शूर वीर आणि पराक्रमी होते, तसेंच ज्यांनीं आपल्या पुरुषार्थानें देश आणि राज्यास विशेष समृध्द आणि सत्वशील बनविलें होतें, त्या धर्माच्या प्रचारामुळें देशाची किंवा प्रजेची अधोगति कशी होऊं शकेल? देशाची परतंत्रता किंवा प्रजेची निर्वीर्यता यामध्यें केव्हांही अहिंसा कारणीभूत होऊं शकत नाहीं.

ज्या देशांत हिंसेचा विशेष प्रचार आहे, जे अहिंसेचें नांव देखील जाणत नाहींत, ज्यांचें नेहमीं फक्त मांसाचेंच भक्षण आहे आणि पशूपेक्षाहि जे अधिक क्रूर असतात, ते नेहमीं स्वतंत्रच राहतात काय? रोमन साम्राज्यानें कोणत्या दिवशीं अहिंसेचें नांव ऐकिलें होतें? आणि मांस भक्षण सोडिलें होतं? मग त्याचें नांव जगांतून नाहींसे कां झालें? तुर्कस्थानच्या प्रजेमधून हिंसेची भावना केव्हां नष्ट झाली होती? आणि क्रूरतेचा केव्हां लोप झाला होता? मग त्याच्या सम्राज्याची आज अशी दीनदशा कां होऊन राहिली आहे? आयर्लंड देशांत अहिंसेची उद्-घोषणा केव्हां केली होती? मग तो देश आज शेंकडों वर्षांपासून स्वतंत्र होण्याकरितां कां तडफडत आहे.? दुसऱ्या देशांच्या गोष्टी जाऊं द्या, खुद्द भारतवर्षाचेंच उदाहरण घ्या. मोगलसाम्राज्याच्या चालकांनीं केव्हां अहिंसेची उपासना केली होती? त्यामुळें त्यांचें प्रभुत्व नामशेष होऊन गेलें आणि त्याच्याविरुध्द पेशव्यांनीं केव्हां मांस भक्षण केलें होतें? ह्मणून त्यांच्या ठिकाणीं एकदम वीरतेचा वेग उघडकीस आला? यावरून स्पष्ट दिसतें कीं देशाच्या राजनैतिक उन्नतींत हिंसा कारणी-

भूत नाहीं आणि अवनतींत अहिंसा कारणीभूत नाहीं, परंतु उन्नति अवनतिमध्यें राज्य कारणाऱ्यांची कार्यदक्षता आणि कर्तव्यपरायणताच मुख्य कारण आहे.

होय, प्रजेच्या नैतिक उन्नतीमध्यें तत्त्वतः अहिंसा अवश्य कारणीभूत होते आणि अवनतीमध्यें हिंसा अवश्य कारणीभूत होते. अहिंसेच्या भावनेपासून प्रजेंत सात्विक वृत्ति प्रफुल्लित होते आणि जेथें सात्विक वृत्तीचा विकास होतो, तेथें सत्वाचें राहणें असतें. सात्विक प्रजेचेंच जीवन श्रेष्ठ आणि उच्च समजलें जातें. याविरुध्द सत्वहीन जीवन कनिष्ठ आणि नीच गणिलें जातें. ज्या प्रजेंत सत्व नाहीं, तेथें संपत्ति, स्वतंत्रता वगैरे कांहींच नाहीं. या करितां प्रजेच्या नैतिक उन्नतींत अहिंसा एक प्रधान कारण आहे.

नैतिक उन्नतीच्या समोर भौतिक प्रगती कांहींच नाहीं आणि या विचारामुळेंच भारतवर्षांतील प्राचीन ऋषि-मुनि लोकांनीं आपल्या प्रजेस शुध्द नीतिवान् बनविण्याविषयींच सर्वांपेक्षां जास्त सदुपदेश केलेला आहे. युरोपच्या प्रजेनें नैतिक उन्नतीस गौण मानून भौतिक प्रगतीकडे डोळे मिटून पळावयास सुरवात केली होती, त्याचेंच कडू फळ आज सगळें जग भोगीत आहे. जगांत खरी शांतता आणि वास्तविक स्वतंत्रतेची स्थापना करण्याची जर आवश्यकता आहे तर मनुष्यांना शुध्द नीतीवान बनलें पाहिजे.

जो अहिंसेच्या तत्त्वास चांगल्या प्रकारें समजून त्याचें पालन करितो, तोच शुध्द नीतीवान बनूं शकतो. शांति, शक्ति, शुचिता, दया, प्रेम, क्षमा, सहिष्णुता, निर्लोभता वगैरे सर्व प्रकारच्या सद्गुणांची जननी अहिंसा आहे. अहिंसेच्या आचरणापासून मनुष्याच्या हृदयांत पवित्र भावनेचा संचार होतो, वैर विरोधाची भावना नष्ट होते आणि सर्वांशीं

बंधुत्त्वाचें नातें जुळतें. ज्या प्रजेच्या ठिकाणीं ह्या भावना प्रफुल्लित होतात, तेथें ऐक्याचें साम्राज्य होतें आणि एकता ( संप ) च आज आमच्या देशाच्या अभ्युदयाचें व स्वातंत्र्याचें मूळ बीज आहे, ह्मणून ह्या देशाच्या अवनतीचें कारण अहिंसा नाहीं, परंतु उन्नतीचें एकच अमोघ साधन आहे. हननार्थक " हिंसि,, धातूपासून " हिंसा" शब्द बनलेला आहे, ह्मणून हिंसेचा अर्थ कोणत्याहि प्राण्यास हनन करणें किंवा मारणें, असा होतो. भारतीय ऋषि-मुनींनीं हिंसेची स्पष्ट व्याख्या अशा प्रकारें केलेली आहे. " **प्राणवियोगप्रयोजनव्यापारः,,** अथवा " **प्राणिदुःखसाधन व्यापारो हिंसा** " अर्थात् प्राण्याच्या प्राणाचा वियोग करण्याकरितां किंवा प्राण्याला दुःख देण्याकरितां जो प्रयत्न केला जातो, त्याचेंच नांव हिंसा आहे. याच्याविरुध्द कोणत्याही जीवाला दुःख किंवा कष्ट न पोंचविणें, ती अहिंसा आहे. पातंजल योगसूत्राचे भाष्यकार महर्षि व्यासांनीं अहिंसेचें लक्षण असें केलें आहे. " **सर्वथा सर्वदा सर्वभूतानामनभिद्रोहोऽहिंसा**" ह्मणजे सर्व प्रकारें, सर्वकाळीं, सर्व प्राणीमात्राशीं अद्रोह भावानें राहणें अर्थात् प्रेमभाव ठेवणें, त्याचें नांव अहिंसा आहे. याच अर्थाला विशेष स्पष्ट करण्याकरितां ईश्वरगीतेंत लिहिलें आहे कीं:-" **कर्मणा मनसा वाचा सर्वभूतेषु सर्वदा ॥ अक्लेशजननं प्रोक्ता, अहिंसा परमर्षिभिः ॥** अर्थात मनानें, वचनानें आणि शरीराच्या क्रियेनें सर्वकाळीं कोणत्याहि प्राण्याला क्लेश न पोंचविण्याचें नांव महर्षीनीं ' अहिंसा सांगितलें आहे. अशा प्रकारच्या अहिंसेचें पालन करण्याची काय जरूर आहे ? याविषयीं श्री हेमचंद्र आचार्यांनीं सांगितलें आहे कीं **आत्मवत् सर्वभूतेषु सुखदुःखे प्रियाप्रिये ॥ चिंतयन्नात्मनोऽनिष्टां, हिंसामन्यस्य नाचरेत् ॥** अर्थात् जसें आपल्या आत्म्यास सुख प्रिय लागतें, आणि दुःख अप्रिय लागतें, त्याचप्रमाणें

सर्व प्राणी मात्रांना लागतें; याकरितां आपल्या आत्म्यासारखे दुसऱ्या आत्म्यांना देखील अनिष्ट अशा हिंसेचें आचरण कव्हांही न केलें पाहिजे.

याच गोष्टीस स्वयं श्रमण भगवान् श्रीमहावीर स्वामींनीं देखील अशा प्रकारें सांगितलें आहे:—

**"सव्वे पाणा पियाउया, सुहसाया, दुहपडिकूला, अप्पियवहा, पियजीविणो, जीविउकामा। (तह्मा) णातिवाएज्ज किंचणं"**

**अर्थः**—सर्व प्राण्यांना आयुष्य प्रिय आहे, सर्व सुखाचे अभिलाषी आहेत, दुःख सर्वांना प्रतिकूल आहे, वध सर्वांना अप्रिय आहे, जीवनक्रिया सर्वांना प्रिय लागतें—सर्व जीवांना जिवंत राहण्याची इच्छा आहे, याकरितां कोणत्याहि जीवाला न मारिलें पाहिजे किंवा कष्ट न दिलें पाहिजे. अहिंसेच्या आचरणाविषयीं आवश्यकतेकरितां यापेक्षां जास्त आणखी कांहींच पुरावा नाहीं आणि पुरावाही होऊं शकत नाहीं परंतु येथें एक प्रश्न असा उपस्थित होतो कीं अशा प्रकारच्या अहिंसेचें पालन सर्वच मनुष्यें कसें करूं शकतील ? कांकीं त्याप्रमाणें शास्त्रांत सांगितलें आहे:—

**जले [1]जीवाः स्थले जीवा, जीवाः पर्वतमस्तके ॥**
**ज्वालामालाकुले जीवाः, सर्वं जीवमयं जगत् ॥ १ ॥**

**अर्थः**—पाण्यांत, भूमींत, पर्वतांत, अग्नींत वगैरे सर्व ठिकाणीं जीव भरलेले आहेत; सगळें जग जीवमय आहे; याकरितां मनुष्याच्या प्रत्येक व्यवहारांत ह्मणजे खाण्यांत, पिण्यांत, चालण्यांत, बसण्यांत, व्यापारांत, विहारांत वगैरे सर्व प्रकारच्या व्यवहारांत जीवहिंसा होते.

---

१ या श्लोकांत जीवाः या शब्दाच्या ठिकाणीं विष्णुः असे देखील ह्मणतात.

हिंसेशिवाय कोणतीही प्रवृत्ति केली जात नाहीं; ह्मणून अशा प्रकारच्या संपूर्ण अहिंसेचें पालन करण्याचा तर हा अर्थ होऊं शकतो कीं, मनुष्यानें आपल्या सर्व जविन क्रिया बंद करून, योग्यासारखे समाधिस्थ होऊन ह्या नरदेहाचा नाश बळजबरीनें करून टाकावा. असें केल्याशिवाय अहिंसेचेंही पालन करणें आणि जीवनाचें ( आयुष्याचें ) संरक्षण करणें, हें तर आकाशांतील फुलाच्या सुगंधाच्या अभिलाषेसारखेंच निरर्थक आणि निर्विचार आहे. ह्मणून पूर्ण अहिंसा हा फक्त विचाराचाच विषय होऊं शकतो, आचाराचा नाहीं.

हा प्रश्न यथार्थ आहे, ह्या प्रश्नाचें समाधान अहिंसेचें भेद आणि अधिकारी याविषयीं निरूपण केल्यानें होईल. याकरितां आधीं अहिंसेचे भेद दाखविले जातात. जैनशास्त्रकारांनीं अहिंसेचे अनेक प्रकार दाखविले आहेत. जसें:- स्थूल अहिंसा आणि सूक्ष्म अहिंसा; द्रव्य अहिंसा आणि भाव अहिंसा; स्वरूप अहिंसा आणि परमार्थ अहिंसा; देश अहिंसा आणि सर्व अहिंसा वगैरे. कोणत्याही हालत्या चालत्या प्राण्यास किंवा जीवास जाणून बुजून न मारण्याच्या प्रतिज्ञेचें नांव स्थूल अहिंसा आहे आणि सर्व प्रकारच्या प्राण्यांना सर्व प्रकारचे क्लेश न पोंहोंचविण्याविषयीं आचरणाचें नांव सूक्ष्म अहिंसा आहे. कोणत्याही जीवास आपल्या शरीरापासून दुःख न देण्याचें नांव द्रव्य अहिंसा आहे आणि सर्व आत्म्याविषयीं कल्याणाच्या भावनेचें नांव भाव अहिंसा आहे. हीच गोष्ट स्वरूप आणि परमार्थ अहिंसेविषयीं देखील सांगितली जाऊं शकते. कांहीं अंशीं अहिंसेचें पालन करणें, ती देश अहिंसा ह्मणविली जाते आणि सर्व प्रकारें ह्मणजे परिपूर्णतेनें अहिंसेचें पालन करणें, ती सर्व अहिंसा ह्मणविली जाते.

यद्यपि आत्म्यास अमरत्वाच्या प्राप्तीकरितां आणि संसाराच्या सर्व बंधनापासून मुक्त होण्याकरितां अहिंसेचें आचरण संपूर्ण रूपानें करणें फारच आवश्यक आहे, तसें केल्याशिवाय केव्हांही मुक्ति मिळूं शकत नाहीं; तथापि संसारांतील सर्वच मनुष्यांमध्यें एकदम अशा पूर्ण अहिंसेचें पालन करण्याची शक्ति आणि योग्यता येऊं शकत नाहीं. ह्मणूनच कमी जास्त शक्ति आणि योग्यता असणाऱ्या मनुष्याकरितां वर दाखविल्याप्रमाणें तत्वज्ञांनीं अहिंसेचे भेद करून क्रमशः या विषयांत मनुष्यास उन्नत होण्याची व्यवस्था दाखवून दिली आहे. अहिंसेच्या ह्या प्रकारामुळेंच तिच्या अधिकाऱ्यामध्यें भेद करून दिले आहेत. जीं मनुष्यें अहिंसेचें पूर्णपणें पालन करूं शकत नाहींत; ते गृहस्थ-श्रावक-उपासक-अणुव्रती देशव्रती वगैरे ह्मणविले जातात. जोपर्यंत ज्या मनुष्यामध्यें संसारांतील सर्व प्रकारचे मोह आणि प्रलोभनास सर्वथा सोडून देण्याइतकी आत्मशक्ति प्रकट होत नाहीं, तोंपर्यंत तो संसारांत राहत असतां आणि आपल्या गृहव्यवहारास चालवीत असतांना हळुंहळूं अहिंसाव्रताचें पालन करण्यामध्यें त्यानें उन्नति करीत जावें. जेथपर्यंत होऊं शकेल तथपर्यंत त्यानें आपल्या स्वार्थास कमी करीत जावें आणि स्वतःच्या स्वार्थाकरितां प्राणीमात्रांना मारन-ताडन-छेदन-आक्रोशन वगैरे क्लेश उत्पन्न करणाऱ्या व्यवहारांचा निषेध करीत जावा. अशा गृहस्थाकरितां कुटुंब, देश किंवा धर्माचें संरक्षण करण्याकरितां जर स्थूल अहिंसा करावी लागली, तर त्यास आपल्या व्रतांत कांहींच भंग होत नाहीं; कांकीं जेथपर्यंत तो गृहस्थाश्रमी अर्थात् संसारी अवस्थेंत आहे, तेथपर्यंत समाज, देश आणि धर्माचें यथाशक्ति रक्षण करणे, हें त्याचें परम कर्तव्य आहे. जर एखाद्या भ्रांतीच्या वश होऊन तो आपल्या कर्तव्यापासून भ्रष्ट झाला, तर त्याचें नैतिक अधःपतन होते आणि नैतिक अधःपतनहि एक सूक्ष्म हिंसा आहे; कांकीं

त्यापासून आत्म्याच्या उच्चवृत्तीचें हनन (मरण) होतें. अहिंसा धर्माच्या उपासकाकरितां स्वतःचा स्वार्थ—स्वतःच्या लोभानिमित्तानें स्थूल हिंसेचा परित्याग करणें, पूर्ण आवश्यक आहे. जो मनुष्य आपल्या विषय तृष्णेची पूर्ति करण्याकरितां स्थूल प्राण्यांना दुःख देतो, तो केव्हांहि कोणत्याहि प्रकारें अहिंसाधर्मी ह्मणविला जात नाहीं. अहिंसक गृहस्था-करितां जर हिंसा करणें योग्य असेल, तर फक्त तें दुसऱ्याकरितांच आहे. या सिद्धांतापासून विचार करणारी मनुष्यें समजूं शकतात कीं, अहिंसाव्रताचें पालन करीत असतांही, गृहस्थ आपल्या समाज आणि देशाचें रक्षण करण्याकरितां युद्ध करूं शकतो. ह्या विषयाच्या सत्यते-करितां आह्मीं येथें ऐतिहासिक प्रमाणही देत आहोंत.

गुजराथचा अंतिम चौलुक्य नृपति दुसरा भीम ( ज्यास भोळा भीम देखील ह्मणतात ) यांच्याकाळीं, एकेवेळीं त्याच्या अणहिलपुर नांवाच्या राजधानींवर मुसलमानांचा हमला झाला. त्यावेळीं राजधानींत राजा हजर नव्हता. फक्त राणी हजर होती. मुसलमानांच्या हमल्यापासून शहराचें संरक्षण कसें करावें ? याविषयीं सर्व अधिकाऱ्यांना फारच चिंता झाली. दंडनायका ( सेनापती ) च्या पदावर त्यासमयीं एक आभू नांवाचा श्रीमाली वणिक ❀ श्रावक होता. तो आपल्या अधि-काराव़र नवीनच आलेला होता आणि तो विशेष धर्माचरण करणारा पुरुष होता. याकारितां त्याच्या युद्धविषयक सामर्थ्याविषयीं कोणालाही निश्चित विश्वास नव्हता. इकडे एक तर राजा गैरहाजर होता, दुसरें, राज्यांत कोणीच तसा पराक्रमी पुरुष दुसरा नव्हता, आणि तिसरें कारण, राज्यांत यथेष्ट सैन्यही नव्हतें. यामुळें राणीला फारच चिंता

---

❀ संसारांत राहून स्थूल नियमाप्रमाणें वागणाऱ्या गृहस्थास जैन धर्मामध्यें श्रावक असें ह्मणतात.

झाली. त्या राणीनें विश्वस्त आणि योग्य मनुष्या कडून सेनापति आभूच्या सामर्थ्या विषयीं कांहीं वृत्तांत ऐकून, स्वतः तिनें त्यास आपल्यापाशीं बोलाविलें आणि नगरावर आलेल्या आपत्तीविषयीं कोणता उपाय केला पाहिजे, याबद्दल सम्मत्ति विचारिली. तेव्हां सेनापतीनें सांगितलें कीं, जर महाराणीचा माझ्यावर विश्वास असेल आणि युध्दा-संबंधी पूर्ण सत्ता मला सोपवून दिली जाईल, तर मला भरंवसा आहे कीं, मी आपल्या देशाला शत्रूच्या हातांतून पूर्णपणें वाचवीन. आभूच्या अशा प्रकारें उत्साहजनक वाक्यास ऐकून राणी खूश झाली आणि युध्दासंबंधीं पूर्ण सत्ता त्यास देऊन, युध्दाची घोषणा करून दिली. सेनापति आभू यानें त्याच वेळीं सैनिक संगठन करून लढाईच्या मैदानांत डेरा दिला. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळापासून युध्द सुरु होणार होतें, ह्मणून पहिल्या दिवशीं आपल्या सैन्याचा जमाव करता करतांच त्यास संध्याकाळ झाली. तो व्रतधारी श्रावक होता, ह्मणून दररोज सकाळीं व संध्याकाळीं [1]प्रतिक्रमण करण्याचा त्यास नियम होता. संध्याकाळ पडल्यानंतर प्रतिक्रमण करण्याची वेळ आली असें पाहून, त्यानें एकांतांत कोठेंतरी जाऊन प्रतिक्रमण करण्याचा विचार केला; परंतु त्याच वेळीं माहीत पडलें कीं, त्यासमयीं त्याचें तेथून दुसऱ्या ठिकाणीं जाणें, इच्छित कार्यांत विघ्न करणारें होतें, ह्मणून त्यानें तेथेंच हत्तीच्या अंबारीवर बसल्या बसल्याच एकाग्रतेनें प्रतिक्रमण करण्यास सुरू केलें. जेव्हां तो प्रतिक्रमणांत येणाऱ्या—

---

(१) पापक्रियेपासून मागें हटण्याकरितां घेतलेल्या व्रतांचे सकाळीं व संध्याकाळीं पश्चात्तापपूर्वक चिंतन करणें, त्यांस जैन शास्त्रांत प्रतिक्रमण असें ह्मणतात.

"(२) जे मे जवा विराहिया. एगिंदिया बेइंदिया,, वैगर पाठाचें उच्चारण करीत होता, तेव्हां कोणी एका सैनिकानें त्यास ऐकून कोण्या एका अधिकाऱ्यांस सांगितलें कीं, पहा महाराज! आमचे सेनापति साहेब तर अशा युध्दाच्या मैदानामध्येंही (जेथें शस्त्र व अस्त्रांचा ठणठणाट होऊन राहिला आहे आणि मारा मारा असे शब्द निघून राहिले आहेत तेथें) एगिंदिया बेइंदिया करून राहिले आहेत. नरम नरम शीरा खाणारे हे श्रावक साहेब काय बहादुरी करून दाखवितील? हळुंहळूं ती गोष्ट थेट राणीच्या कानापर्यंत जाऊन पोंचली. हें ऐकून ती फारच संशययुक्त बनली, परंतु त्यावेळीं दुसरा कांहींच विचार करावयाचा नव्हता, ह्मणून भविष्यावर आधार ठेवून ती गुपचुप राहिली.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळापासूनच युद्धाचा प्रारंभ झाला, योग्य संधि (वेळ) पाहून सेनापति आभूनें अशा शौर्यानें आणि चातुर्यानें शत्रूवर आक्रमण केलें कीं, त्यामुळें थोड्याच वेळांत शत्रुच्या सैन्याचा फार संहार झाला आणि त्याच्या मालका (सेनापती) नें आपलें शस्त्र खालीं ठेऊन युद्ध बंद करण्याविषयीं प्रार्थना केली.

आभूचा अशा प्रकारें विजय झाला हें पाहून अणहिलपुरच्या प्रजेंत जयजयकाररूप आनंद फैलावला. राणीनें विशेष सन्मानपूर्वक त्याचें स्वागत केलें आणि त्यानंतर मोठा दरबार करून राजा व प्रजेकडून त्याचा योग्य सन्मान करण्यांत आला. त्यावेळीं राणीनें हंसत असतां दंडनायकाशीं सांगितलें कीं, हे सेनापती! जेव्हां युद्धाची व्यूहरचना करीत असतां मध्येंच आपण "एगिंदिया बेइंदिया,, बोलूं लागले होते, तेव्हां तर आपल्या सैनिकांना देखील असा संशय आला

---

(२) अर्थः— ज्या जीवांना फक्त एक शरीरच इंद्रिय आहे, ज्यांना दोन इंद्रियें, तीन इंद्रियें, चार इंद्रियें आणि पांच इंद्रियें आहेत, अशा जीवांची मी विराधना (हिंसा) केली असेल. वगैरे पाठ प्रतिक्रमणाच्या आधीं बोलावा लागतो. अनुवादक.

होता कीं, आपल्या सारखे धर्मशील आणि अहिंसाप्रिय पुरुष मुसल्माना सारख्यांशीं लढणाऱ्या अशा क्रूर कार्यांत कोणत्या प्रकारें धैर्य ठेवूं शकतील ? परंतु आपल्या वीरतेस पाहून सर्वांना आश्चर्यचकित व्हावें लागले. हें ऐकून कर्तव्यदक्ष त्या दंडनायका (आभू) नें सांगितलें कीं, हे महाराणी ! "माझें जें अहिंसाव्रत आहे, तें माझ्या आत्म्याशीं संबंध ठेविणारे आहे. मी "एगिंदिया बेइंदिया" ह्मणजे एकेंद्रिय द्वींद्रिय जीवांचा वध न करण्याविषयीं जो नियम घेतला आहे, तो आपल्या स्वार्थाच्या अपेक्षेनें आहे. देशाचें रक्षण करण्याकरितां आणि राज्याच्या आज्ञेकरितां जर मला वध (हिंसा) करण्याची आवश्यकता पडली, तर तसें करणें माझें कर्तव्य आहे. माझें शरीर हीं राष्ट्राची संपत्ति आहे, ह्मणून राष्ट्राची आज्ञा आणि आवश्यकतेप्रमाणें त्याचा उपयोग झालाच पाहिजे. शरीरांत असलेला आत्मा आणि मन हीं माझी स्वतःची संपत्ति आहे, तिला स्वार्थी हिंसा भावनेपासून अलिप्त ठेवणें, हेंच माझ्या अहिंसाव्रताचें लक्षण आहे. वैगेरे,, जैन गृहस्थास पालन करण्यायोग्य अहिंसाव्रताचें यथार्थ स्वरूप काय आहे ? हें ह्या ऐतिहासिक आणि रसिक उदाहरणापासून सुज्ञ पाठक चांगल्या प्रकारें समजूं शकतील.

## सर्व अहिंसा आणि तिचे अधिकारी.

जी मनुष्यें अहिंसाव्रताचें पूर्णरूपानें पालन करितात, ते यति, मुनि, भिक्षु, श्रमण, संन्यासी, महाव्रती वैगेरे शद्बांनीं संबोधिले जातात. ते संसाराच्या सर्व कार्यांपासून लांब आणि अलिप्त राहतात. त्यांचें कर्तव्य फक्त स्वतःचें आत्मकल्याण करणें, आणि जे मुमुक्षु त्यांच्यापाशीं येतील, त्यांना आत्मकल्याणाचा मार्ग दाखविणें आहे विषयविकार आणि कषाय ह्मणजे क्रोध, मान, माया व लोभाच्या भावनेपासून त्यांचा आत्मा वर राहतो. जगांतील सर्व प्राणीमात्र त्यांच्याकरितां आपल्या आत्म्यासारखे आहेत. हा मी आणि हा दुसरा, अशा प्रकारचा द्वैतभाव त्यांच्या हृदयां-

तून नष्ट होऊन जातो. त्यांचें मन, वचन आणि कर्म ( शरीरक्रिया ) तिन्हीं एकरूपच असतात. सुख दुःख किंवा हर्ष शोक त्यांच्या मनांत एकाच स्वरूपाचे पाहण्यांत येतात. जो मनुष्य अशा प्रकारच्या स्वरूपावस्थेस प्राप्त करून घेतो, तोच महाव्रती आहे आणि त्याकडूनच अहिंसेचें सर्वतः पालन केलें जाऊं शकतें. अशा महाव्रती ( साधू ) करितां स्वतःच्या निमित्तानें हिंसा करणें योग्य नाहीं आणि दुसऱ्याच्या निमित्तानेंही हिंसा करणें योग्य नाहीं. तो स्थूल आणि सूक्ष्म सर्व प्रकारच्या हिंसेपासून मुक्त राहतो.

येथें एक प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, अशा प्रकारचे जे महाव्रती ह्मणजे साधू असतात, ते खात पीत नाहींत काय ? किंवा उठत बसत नाहींत काय ? जर ते तसे करतात, तर मग अहिंसेचें सर्वतः ह्मणजे पूर्णपणें पालन करणारे कसें ह्मणविले जातात ? कांकीं खाण्या पिण्यामध्यें किंवा उठण्या बसण्यामध्यें देखील जीवहिंसा तर होतेच.

याचें समाधान असें आहे. यद्यपि ही गोष्ट खरी आहे कीं, त्या महाव्रतीपासूनही सांगितलेल्या क्रिया करण्यामध्यें सूक्ष्म प्रकारची जीवहिंसा होते, परंतु त्यांच्या उच्च ह्मणजे श्रेष्ठ मनोदशेच्या कारणामुळें त्यांना त्या हिंसेपासून उत्पन्न होणाऱ्या पापाचा स्पर्श बिलकुल होत नाहीं, ह्मणूनच त्यांचा आत्मा त्या पापबंधनापासून मुक्तच राहतो. जेथपर्यंत मनुष्याचा आत्मा ह्या स्थूल शरीरांत अधिष्ठाता होऊन वास करीत असतो, तेथपर्यंत ह्या शरीरापासून तशा सूक्ष्म हिंसेचें होणें अनिवार्य आहे; परंतु त्या हिंसेंत आत्म्याचा कोणत्याही प्रकारें संकल्प विकल्प नसल्यामुळें तो त्या हिंसेपासून अलिप्तच राहतो. महाव्रती (साधू) च्या शरीरापासून होणाऱ्या हिंसेला द्रव्यहिंसा किंवा स्वरूपहिंसा ह्मणतात, परंतु भावहिंसा किंवा परमार्थहिंसा ह्मणत नाहींत; कांकीं ह्या

हेंसेत आत्म्याचा कांहाच हिंसकभाव नाहीं. जो हिंसकभावानें हिंसा करितो, तोच आत्मा हिंसेपासून उत्पन्न होणाऱ्या पापानें बद्ध होतो.

जैनांच्या तत्त्वार्थसूत्रांत हिंसेचें लक्षण दाखवीत असतां असें लिहिलें आहे कीं; "प्रमत्त योगात् प्राणव्यपरोपणं हिंसा" अर्थात् प्रमत्त भावानें जो प्राण्यांच्या प्राणाचा नाश केला जातो, तीच हिंसा आहे. प्रमत्त भावाने जो प्राण्यांच्या प्राणाचा नाश केला जातो, तीच हिंसा आहे. प्रमत्त भावाचें तात्पर्य असें आहे कीं, विषय ( इंद्रियसुख ) आणि कषाय ( क्रोध, मान, कपट आणि लोभ ) युक्त असणें, जो जीव विषय कषायाच्या वश होऊन कोणत्याही प्राण्याला दुःख किंवा कष्ट पोंचवितो, तो हिंसा संबंधीं पापाचें बंधन करितो. ह्या हिंसेची व्याप्ति फक्त शरीरानें कष्ट पोंचविण्यापर्यंतच नाहीं, परंतु वचनानें तसेंच उच्चारण आणि मनानें तसेंच चिंतन करण्यापर्यंत आहे. जो विषय कषायाच्या वश होऊन दुसऱ्याकरितां अनिष्ट भाषण आणि अनिष्ट चिंतन करितो, तो सुद्धां भावहिंसा किंवा परमार्थहिंसा करितो आणि याविरुद्ध जो विषय–कषायापासून विरक्त आहे, त्यापासून जर कधीं कोणत्याही प्रकारची हिंसा झाली, तरीही त्याची ती हिंसा परमार्थानें हिंसा नाहीं. एका व्यवहारिक उदाहरणानें याचें स्वरूप स्पष्टपणें लक्षांत येईल.

एक पिता आपल्या मुलाची, किंवा गुरु आपल्या शिष्याची, एखाद्या वाईट प्रवृत्तीमुळें रागावून, त्याच्या कल्याणाकरितां कठोर वचनानें किंवा शरीरानें त्याचें ताडन करितो; तर तो वडील किंवा गुरु लोकांच्या दृष्टींत कांहीं निंदनीय किंवा दंडनीय समजला जात नाहीं, कांकीं बापाचा किंवा गुरुचा तो व्यवहार द्वेषापासून उत्पन्न झालेला नाहीं. त्या व्यवहारांत सद्बुध्दि राहिलेली आहे. याविरुद्ध जो कोणी मनुष्य द्वेषाच्या वश होऊन, एखाद्या मनुष्याला शिवीगाळ किंवा मार हाण करितो, तो तर राज्याच्या किंवा समाजाच्या दृष्टींत

दंडनीय आणि निंदनीय समजला जातो, कांकीं तसा व्यवहार करण्यांत त्याची दुष्ट भावना आहे. जरी ह्या दोन्हीं प्रकारच्या व्यवहारांचें बाह्य स्वरूप सारखेंच आहे, तरी भावनेच्या भेदामुळें त्यांच्या आंतल्या स्वरूपांत मोठा भेद आहे. अशाच प्रकारचे भेद द्रव्य आणि भावहिंसा वगैरेच्या स्वरूपाविषयीं समजले पाहिजेत.

वास्तविक हिंसेचें आणि अहिंसेचें रहस्य मनुष्याच्या भावनेवरच राहिलेलें आहे. कोणतेंही कर्म किंवा कार्याच्या शुभाशुभ बंधनाचा आधार करणाऱ्याच्या मनांतील भावनेवर आहे. ज्या भावनेनें जो मनुष्य कर्म करितो, त्याच्या अनुसारें त्यास फळ मिळते. कर्माचा शुभाशुभपणा त्याच्या स्वरूपांत राहिलेला नाहीं, परंतु करणाऱ्याच्या विचारांत राहिलेला आहे. जें कर्म करतेवेळीं करणाऱ्याचा विचार शुभ असतो, तें शुभकर्म ह्मणविलें जातें. आणि जें कर्म करित असतां करणाऱ्याचा विचार अशुभ असतो, ते अशुभ कर्म ह्मणविलें जातें एक डॉक्टर एखाद्या मनुष्याला शस्त्रक्रिया ( चिरफाड ) करण्याकरितां जें क्लोरोफार्म ( बेभान करण्याची एक औषधी ) देऊन बेभान करितो, त्यामध्यें आणि एक चोर किंवा घात करणारा मनुष्य. एखाद्या मनुष्याला धन किंवा आयुष्याचें हरण करण्याकरितां जें क्लोरो-फार्म देऊन बेशुद्ध करितो त्यामध्यें, क्रियेच्या दृष्टीनें कांहींच फरक नाहीं, परंतु फलाच्या दृष्टीनें जेव्हां पाहिलें जातें, तेव्हां डॉक्टराला तर फारच सम्मान मिळतो, आणि चोराला किंवा घात करणाऱ्याला भयंकर शिक्षा दिली जाते. हें उदाहरण जगाच्या दृष्टीनें झालें.

स्वयं मनुष्याच्या अंतरात्म्याच्या दृष्टींत जें अनुभविलेलें आहे, असें आतां एक दुसरें उदाहरण घ्या. एक पुरुष आपल्या शरीरानें ज्याप्रमाणें आपल्या स्त्रीशीं आलिंगन (भेट) करितो, त्याचप्रमाणें तो आपल्या आईशीं, बहिणीशीं किंवा मुलीशीं आलिंगन करितो. आलिंगनाच्या बाह्य

प्रकारांत कांहींच भेद नसला, तरीही आलिंगन करणाऱ्याच्या आंतरिक भावनेंत फारच मोठा भेद अनुभविला जातो. पत्नीशीं आलिंगन करीत असतां पुरुषाचें मन आणि शरीर जेव्हां मलिन विकारयुक्त भावनेनें भरलेलें असतें, तेव्हां माता वगैरेशीं आलिंगन करीत असतां मनुष्याचें मन निर्मळ शुद्ध सात्विक-वत्सल भावनेनें भरलेलें असतें. कर्मा (क्रिये) च्या स्वरूपांत कांहींच फरक नसतांही फळाच्या स्वरूपांत इतका विपर्यय (फरक) कां असतो ? याचा जेव्हां विचार केला जातो, तेव्हां स्पष्टच माहीत पडते कीं, क्रिया करणाऱ्याच्या भावनेंत विपर्यय असल्यामुळें फळाच्या स्वरूपांत विपर्यय आहे. याच फळाच्या परिणामावरून कर्त्याच्या मनांतील भावनेसंबंधी चांगलेपणा किंवा वाईटपणा याबद्दल निर्णय केला जातो. त्याच मनोभावनेच्या अनुसारें कर्माचें शुभाशुभपण मानिलें जातें; ह्मणून यावरून हें सिद्ध झालें कीं, धर्म-अधर्म, पुण्य-पाप किंवा सुकृत-दुष्कृताचें मूळ फक्त मनच आहे.

भागवत धर्माच्या नारद पंचरात्र नामक ग्रंथांत एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीः- **मानसं प्राणिनामेव, सर्वकर्मैककारणम् ॥ मनोऽनुरूपं वाक्यं च, वाक्येन प्रस्फुटं मनः ॥ अर्थः**-प्राण्यांच्या सर्व कर्माचें मूळ फक्त मनच आहे, मनाच्या अनुरूपानेंच मनुष्याची वचन व शरीर प्रवृत्ति होते, आणि त्या प्रवृत्ती पासून त्याचें मन माहीत पडतें.

या प्रकारें सर्व कर्माच्या ठिकाणीं मनाचेंच प्राधान्य आहे, ह्मणून आत्मसंबंधी विकास करण्यामध्यें प्रथमारंभीं मनाला शुद्ध आणि संयत ( सम्यक्ज्ञान-दर्शन-चारित्र रूप मोक्षमार्गाच्या ठिकाणीं चांगल्या प्रकारें प्रयत्न करणारा ) बनविण्याची आवश्यकता आहे. ज्याचें मन याप्रमाणें शुद्ध आणि संयत होतें, तेव्हां तो कोणत्याही प्रकारच्या कर्मापासून लिप्त होत नाहीं. यद्यपि जेथपर्यंत आत्म्यानें देहाला धारण केलें आहे, तेथ-

पर्यंत त्यापासून सर्वथा कर्माचा परित्याग होणें असंभव आहे, कांकीं गीतेचें कथन आहे कीं "नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः,,

तथापि "योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ॥ सर्वभूतात्म भूतात्मा, कुर्वन्नपि न लिप्यते,, गीतेंत सांगितलेल्या ह्या कथनानुसारे-जो योगयुक्त, विशुध्दात्मा, जितेंद्रिय आणि सर्वभूताविषयीं आत्मबुध्दी ठेविणारा मनुष्य असतो, तो कर्मांना करूनही त्यापासून अलिप्त राहतो.

वर सांगितलेल्या ह्या सिद्धांतावरून वाचकांच्या लक्षांत आतां हें चांगल्या प्रकारें येऊन जाईल कीं, जे सर्वव्रती ह्मणजे पूर्ण त्यागी मनुष्य असतात, त्यांच्याकडून जी कांहीं सूक्ष्म शारीरिक हिंसा होते, तेचें फळ त्यांना कां मिळत नाहीं ? याचकरितां कीं, त्यांच्यापासून होणाऱ्या हिंसेंत त्यांची भावना हिंसक नसते आणि हिंसक भावनेशिवाय झालेली हिंसा, हिंसा ह्मणविली जात नाहीं याकरितां आवश्यक महाभाष्य नांवाच्या आप्त जैनग्रंथांत सांगितलें आहे कीं:--

**असुभपरिणाम हेउ, जीवाबाहो त्ति तो मयं हिंसा ।**
**जस्स उ न सो निमित्तं, संतोवि न तस्स सा हिंसा ॥**

**अर्थः**--कोणत्याही जीवास कष्ट पोहोचविण्याविषयीं जे अशुभ परिणाम कारणीभूत असतात, ती तर हिंसा आहे आणि वरून हिंसा माहीत पडत असली, तरीही जेथें ते अशुभ परिणाम कारणीभूत नाहींत, ती हिंसा ह्मणविली जात नाहीं. हीच गोष्ट आणखी एका ग्रंथांत या प्रकारे सांगितली आहे.

**जं नहु भणिओ बंधो, जीवस्स वहेवि समिइगुत्ताणं ॥**
**भावो तत्थ पमाणं कायवावारो ॥**

धर्मरत्न मंजूषा. पृष्ठ ८३२.

**अर्थः**— समिति-गुप्तियुक्त असणाऱ्या महाव्रतांकडून एखाद्या जीवाचा वध झाला, तरीही त्यांना त्यांचा बंध होत नाहीं, कांकीं बंध-होण्यामध्यें मानसिक भावनाच कारणीभूत आहे, कायिक व्यापार नाहीं. हीच गोष्ट भगवत् गीतेंत देखील सांगितली आहे. जसें:—

**यस्य नाहंकृतो भावो, बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥**
**हत्वापि स इमांल्लोकान्, न हंति न निबद्धयते ॥**

**अर्थः**— ज्याच्या हृदयांतून अहंभाव नष्ट झाला आहे आणि ज्याची बुद्धि अलिप्त राहते, तो मनुष्य कदाचित् लोकांच्या दृष्टीने प्राण्यांना मारणारा दिसतो, तरीही तो त्यांना मारीत नाहीं आणि त्या कर्मामुळ तो बद्धही होत नाहीं. याच्याविरुद्ध ज्याचें मन शुद्ध आणि संयत नाहीं, जो विषय आणि कषायांशी लिप्त आहे, तो बाह्यस्वरूपानें अहिंसक दिसला, तरीही तत्त्वानें तो हिंसकच आहे. त्याच्याकरितां स्पष्ट सांगितले आहे कीं:- -

**" अहणंतोवि हिंसो, दुट्ठत्तणओ मओ अहिमरोध " ।**

ज्याचें मन दुष्ट भावनेनें भरलेलें आहे आणि जो कोणाला मारीत नसला, तरीही तो हिंसकच आहे. याप्रमाणें जैनधर्माच्या अहिंसेचें संक्षिप्त स्वरूप आहे.

समाप्त

ॐ शांतिः ! शांति !! शांति !!!

# आवश्यकीय सूचना

वाचकानीं खालीं दिलेल्या शुद्धिपत्राकडे लक्ष ठेवून पुस्तक वाचण्याची कृपा करावी.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १५ | नाहा | नाहीं |
| ,, | २० | कलें | केलें |
| ७ | ८ | हाऊं | होऊं |
| ,, | १७ | सम्राज्याची | साम्राज्याचीं |
| ८ | २४ | सर्वांशीं | सर्वांशीं |
| १० | ६ | सन्ने | सव्वे |
| ,, | १८ | सर्व | सर्वं |
| १५ | १ | वगैर | वगैरे |
| ,, | १६ | अणहिल्पुरच्य | अणहिलपुरच्या |
| १८ | १ | हंसत | हिंसेंत |
| ,, | ,, | काहाच | कांहींच |
| ,, | ३ | अस | असें |
| २० | ६ | विर्पयय | विपर्यय |
| २१ | १० | तिर्चे | तिर्चे |
| ,, | २२ | कायत्रात्रारो | न पमाणं कायवावारो |
| २२ | ६ | व्हत्वापि | हत्वापि |
| ,, | १० | कमामुळ | कर्मामुळें |
| ,, | १४ | अहिमरोध | अहिमरोध |

## अवश्य मागवा.

१ श्री पंचपरमेष्ठि वंदना ( हिंदी ) मू. ८। शें. १॥

## मराठी भाषेंत

२ आत्मोन्नतीचा सरळ उपाय मू. ८॥ शें ४.

३ अन्य धर्मापेक्षां जैन धर्मांतील विशेषता मू. ८॥ शें २॥

४ वैराग्य शतक. मू. ८॥ शें ३॥

५ जैनदर्शन व जैनधर्म मू. ८॥ शें २॥

६ माझी भावना ( राष्ट्रीय गीत ) मू. ८॥ शें. २

७ जैनधर्माविषयीं अजैन विद्वानांचे
अभिप्राय भाग १ ला मू. ८-। शें ६

८ उपदेश रत्नकोष मू. ८= शें. १०

९ मराठी जैन पद्यावली मू. ८-। शें. ६

१० हिंदी जैन पद्यावली मू. ८- शें. ६

पुस्तकें मिळण्याचें ठिकाणः—

**श्री जैन धर्म प्रसारक संस्था**

सदर बाजार नागपूर

# रूपिणी.

लेखक,

दत्तात्रय भिमाजी रणदिवे.

किंमत सहा आणे.

# रूपिणी.

लेखक व प्रकाशक,

**दत्तात्रय भिमाजी रणदिवे,**

वर्धा.

**सन १९१४**

प्रथमावृत्ती १०००

**किंमत सहा आणे.**

# आरंभींचे दोन शब्द.

प्रस्तुत पुस्तकांतील कथानक मूळ श्रेणिकपुराणांतील असून, मला तें बरेंच मनोरंजक व बोधप्रद वाटल्यावरून त्यास प्रस्तुतचा साधा वेष देऊन मी तें वाचकांपुढें ठेवीत आहे. यांतील अद्भुतता मुळांतीलच असून, तींत किंवा मूळच्या एकंदर संविधानकांत, सुसंगत करण्यापलीकडे मी कोणताहि विशेष फेरफार केला नाहीं. प्रस्तुत पुस्तक लिहिण्यांत मूळ कथानकाचें स्वरूप कायम ठेवावें हाहि माझा एक उद्देश असल्यामुळें या बाबतींत पुराणकाराशीं एकरूप होण्या-खेरीज मला गत्यंतरच नव्हतें ! ह्मणून अद्भुततेच्या बाबतींत वाचकांकडून मजवर कोणत्याहि प्रकारचा आरोप लाधिला जाणार नाहीं अशी आशा आहे ! कथानक खुलून दिसावें एवढ्यासाठीं यांत दिलेलीं वर्णनें व भाषणें मात्र माझ्या पदरचीं आहेत. तीं कशीं काय साधलीं आहेत हें ठरविणें रसिक वाचकांचें काम आहे. त्यांना विशेषतः आमच्या जैनबंधूंना माझी ही कृति आवडल्यास अशा प्रकारचीं जैनपुराणांतील कथानकें पुढें आणण्यास त्यांजकडून मला शक्य तें साह्य मिळेल अशी आशा आहे.

प्रस्तुत पुस्तकाच्या अंतरंगासंबंधीं एवढें सांगितल्यानंतर हें ज्यांच्या निरपेक्ष आणि उदार सहाय्यामुळें इतक्या सुंदर बाह्यवेषानें वाचकांपुढें येत आहे त्यांचे आभार मानणें हें माझें पहिलें कर्तव्य आहे. हे थोर गृहस्थ ह्मणजे नागपूरचे प्रख्यात उदारधी धनिक स्वर्ग० संघई **गुलाबसावजी** यांचें सत्पुत्र शेठ **मोती-लालजी** होत. यद्यपि आपल्या नांवाचा नुसता उल्लेख करण्याचीहि त्यांची इच्छा नव्हती, तरी माझ्या कृतज्ञ लेखणीस त्यांच्या या इच्छेप्रमाणें वागणें केवळ अशक्य झालें याबद्दल ते मला क्षमा करतील अशी आशा आहे. यांच्याबरो-बरच ज्यांचा साभार नामोल्लेख करणें अत्यंत आवश्यक आहे असे दुसरे सद्गृहस्थ ह्मणजे त्यांचेच कारभारी श्रीयुत **कनयालालजी** हे होत. श्रीयुत शेठ **मोतीलालजी** यांच्या उदारतेइतकीच यांचीही रसिकता प्रस्तुत पुस्तकाच्या बाबतींत मला सहाय्यभूत झाली आहे.

याशिवाय या पुस्तकास आगाऊ आश्रय देणाऱ्या रसिकमंडळींचा, व वेळेवर आणि सुबक काम करून दिल्याबद्दल लक्ष्मीनारायण प्रेसचे मॅनेजर व चित्रकार श्रीयुत कापरे यांचाही मी आभारी आहे.

प्रुफकरेक्शनच्या बाबतींत बरीच गैरसोय झाल्यामुळें पुस्तकांत पुष्कळ अशुद्धें राहून गेलीं आहेत. तीं शुद्धिपत्रकांत शक्य तितकीं दुरुस्त करण्याचा प्रयत्न केला आहे. तरी या, आणि प्रस्तुत पुस्तकांत इतरही जे काय दोष असतील त्याबद्दल वाचकांची क्षमा मागून हे जवळ जवळ दोनशें शब्दांला मागें टाकणारे दोन शब्द येथेंच संपवितों !

लेखक,

वर्धा,<br>
अक्षय तृतीया.

# शुद्धिपत्र.

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| २ | ३ | अडवाल | आडवाल |
| ४ | ३ | भूपाल शिरोमणि | भूपालशिरोमणि |
| ४ | १४ | अंतरंगांतहीं | अंतरंगांत हीं |
| ६ | २ | त्याचीही | त्याची ही |
| ६ | ८ | चटकन् दृष्टीस पडत | चटकन् त्याच्या दृष्टीस पडत |
| ६ | १४ | त्यांनीं याचे पायच धरले पाहिजेत | त्यांनीं याचेच पाय आवळून धरले पाहिजेत. |
| ६ | २० | वाटत, | समजत. |
| ८ | १२ | संपति | संपत्ति |
| ८ | १८ | स्वभवाची | स्वभावाची |
| ९ | १७ | पुढें उभयतांची भेटव काय संवाद झाला | पुढें उभयतांची भेट होऊन काय संवाद झाला |
| १० | ३ | हाते | होत |
| १० | ६ | करण्याकडे | करणाऱ्या |
| १० | २१ | नाहीं ना | नाहींत ना |
| १५ | ९ | मुख | सुख |
| १५ | २० | याची कल्पना तरी आहे काय? | याची तुला कल्पना तरी आहे काय? |
| १६ | ८ | राहिल्यास | राहिलेल्यास |
| १६ | ९ | पायावर | पायांवर |
| ,, | १३ | तो केवळ तिच्या कल्पनेचा होता | तो केवळ तिच्या कल्पनेचा खेळ होता |
| ,, | १९ | ते कांहीं | तें कांहीं |
| १९ | १ | ! | ? |
| ,, | १९ | गृहिणी पदाचा | गृहिणीपदाचा |
| ,, | २४ | असलेली तुझी | असलेलीं तुझीं |
| २१ | ३ | त्या | या |
| ,, | १० | शराचा | शरांचा |
| ,, | ११ | कां | का |

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २१ | १३ | आगि | आणि |
| ,, | १६ | पति सौख्याचा | पतिसौख्याचा |
| ,, | ,, | अवलांना | अबलां ना |
| ,, | १९ | निर्वीय | निर्वीर्य |
| २२ | १ | मनाबलावर | मनोबलावर |
| ,, | १४ | आत्मोधाराचा | आत्मोद्धाराचा |
| २३ | ५ | ? | ! |
| ,, | ६ | ? | ! |
| २४ | १३ | हलके | हलकें |
| २५ | १७ | राहित | रहित |
| २६ | २३ | त्याच | त्याचें |
| २८ | २ | धाडसाचा पराकाष्टेच्या | धाडसाचा व पराकाष्टेच्या |
| २८ | १५ | ह्मणतों | ह्मणतो |
| २९ | ७ | एकांतांत आहेत | एकांतांत बोलत आहांत |
| २९ | १९ | दुर्वासनाच्या | दुर्वासनांच्या |
| ३० | ७ | घेतलें | घेतलेंस |
| ३० | १४ | नाहीं | नाहीं |
| ३१ | ११ | आजाणपणें | अजाणपणें |
| ३१ | १९ | माणसाना | माणसांना |
| ३२ | ६ | ? | ! |
| ३२ | १४ | असा दूर ढकलूं | अशी दूर ढकलूंस |
| ३२ | १६ | पाहण्याचा | पाहण्याच्या |
| ३२ | २३ | निष्ठूर | निष्ठुर |
| ३२ | १४ | तुझें | तुझे |
| ३३ | १५ | कां | का |
| ३३ | १६ | पातिव्रत्यरुपी | पातिव्रत्यरुपीं |
| ३६ | | प्रकरण ४ थे | प्रकरण ४ थें |
| ३६ | ९ | निश्चय | क्रम |
| ३६ | १७ | ? | ! |

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | ,, | ? | ! |
| ३८ | ४ | कां | का |
| ३९ | ११ | त्याला | याला |
| ३९ | २२ | ! | ? |
| ४३ | १२ | वाटून | पाहून |
| ४७ | २ | त्याला कोणी तरी एखादा | त्या दोघांपैकीं कोणी तरी एखादा |
| ४७ | १४ | ? | ! |
| ५३ | २ | पिशाच्च | पिशाच |
| ५३ | ११ | ब्र ह्मणून काढावयाचा नाहीं | तोंडावाटे ब्र ह्मणून काढावयाचा नाहीं |
| ५४ | २ | ? | ! |
| ,, | ४ | याविषयीं त्यांना त्या घटके पर्यंत | याविषयीं त्या घटकेपर्यंत |
| ,, | ९ | ? | ! |
| ,, | १० | मंडळी पैकी | मंडळीपैकीं |
| ,, | ११ | ? | ! |
| ५५ | १७ | तृण शय्येवर | तृणशय्येवर |
| ५६ | ७ | नाही | नाहीं |
| ५७ | १७ | तें | हें |
| ६० | १४ | अततात | असतात |
| ६१ | ३ | जिनेंद्र सेवा | जिनेंद्रसेवा |
| ६१ | १ | आडकलास | आढळलास |
| ६२ | ७ | तेंथून | तेथून |
| ,, | १५ | सद्गणी | सद्गुणी |
| ,, | २१ | बेळी | वेळीं |
| ,, | २२ | यांविषयीं | यां विषयीं |
| ६३ | २ | घरी आली | घरीं आलीं |
| ,, | ३ | सद्गुणाची | सद्गुणाचीं |

# अनुक्रमणिका.

'तूं माझ्या अंगाला नुसतें बोट तर लाव. की, तूं नाहीं तर मी या दोघांपैकीं कोणीतरी त्याचक्षणीं गतप्राण झालेले आढळून येईल !' रूपिणी त्वेषानें म्हणाली.

श्रीजिनाय नमः

# रूपिणी.

## प्रकरण १ लें.

### संकेत.

अरुणोदयाची वेळ. अंगावरील अंधेराची काळी दुलई नुकतीच दूर झाल्यामुळें सृष्टिसुंदरी जागृत होऊन चोंहींकडे प्रसन्न मुद्रेनें अवलोकन करीत होती! विहगगण स्वर्गीय संगीताच्या मधुर मधुर तानांनीं प्राणिमात्रास तन्मय करून टाकीत होता! त्याच्या या हृदयास हलविणाऱ्या संगीतानें वेडावून गेल्यामुळेंच कीं काय, वृक्षसमूह हळू हळू डुलत होता. आणि वायुलहरी मंदमंद नाचत होत्या! आपल्या रमणाची आणि आपली लौकरच भेट होणार या विचारानें आनंदित झालेल्या पूर्वदिग्वधूचें मुखमंडल एखाद्या नवपरिणत वधूच्या मुखाप्रमाणें अत्यंत आरक्त झालें होतें! पण पुरुषांच्या भृंगवृत्तीस अनुसरून, सहस्त्ररश्मि, एकीकडे आपल्या नववधूचें चुंबन घेत असतांना, दुसरीकडे आपला एक हात हळूच लांबवून, वसुधा--देवीच्या अंगास स्पर्श करीत होता! वाचकहो! बरोबर याच वेळीं राजगृह नगरींतही अशीच एक घटना चालू होती!

"अहाहा! आज खरोखरच माझें भाग्य उदयाला आलें!" एका तरुणानें एका तरुणीस आडवून म्हटलें.

"हं! खबरदार मला अडवाल तर!" तरुणीनें संतापून म्हटलें.

पण तो तरुण कसला निगरगट्ट! तो तिच्या संतापाला बिलकुल न जुमानतां म्हणाला:—

"अशी सोन्यासारखी आलेली संधि मी दवडीन असें तुला वाटतें? प्यारी, आज किती तरी दिवस मला तुझा ध्यास लागून राहिला होता. देवाशपथ आणखी कांहीं दिवस तुझी भेट न होती तर मी खचित जिवंत राहिलों नसतों!"

"पुरे करा हा चाहटळपणा! दुसऱ्याच्या बायकोशीं असं बोलायला तुम्हांला शरम नाहीं वाटत?" तरुणीनें उत्तर दिलें.

खरोखर या वेळीं तिनें रागाचा असा कांहीं आविर्भाव आणिला होता, कीं, दुसरा एखादा साधारण लुच्चा आणि कमी निर्लज्ज मनुष्य असता, तर तिची ताबडतोब क्षमा मागून तेथून चालता होता. पण तो तरुण अशा कामांत पक्का निर्ढावलेला. शिवाय त्याला विशिष्ट प्रकारच्या स्त्रियांच्या स्वभावाची माहितीही चांगली होती. यामुळें तो बिलकुल न डगमगतां तिला म्हणाला:—

"रूपिणी, असला डोल घालण्यांत काय अर्थ आहे बरें? तुझ्या या खोट्या रागाला मी भिईन असें कां तुला वाटतें? खरोखरच जर तुला असें वाटत असेल तर ही भ्रामक समजूत अगोदर तूं आपल्या डोक्यांतून काढून टाक. नको! नको! प्यारी, त्या तुझ्या कुटिल भिंवया नको अशा वर चढवूंस. तुझ्या या भ्रूभंगानें माझा प्रणयभंग न होतां मनोभंग मात्र होत आहे! खरोखर तुझ्या या तीव्रतर दृक्प्रहारांनीं फार तर माझ्या हृदयाचा चुराडा होईल. पण माझें प्रेम? छे: तें

लवमात्रही भंगलें जाणार नाहीं आणि त्याचा भंग करण्याचें सामर्थ्य तुझ्याच काय, पण जगांतील कोणत्याही मानवी प्राण्याच्या कोपांत नाहीं! रूपिणी, मी हें उगाच कांहीं तरी बडबडतों असें नाहीं! माझे शब्द माझ्या हृदयाला फोडून निघत आहेत! ही माझ्या अंत:करणाची भापा आहे! आणि माझ्या या अभंगप्रेमाची साक्ष ह्मणून माझी सारी धनदौलत आणि माझा देहही मी आज तुला समर्पण करीत आहे. काय? अजूनही माझ्या प्रेमाची तुला खातरी पटत नाहीं? अजूनही तुझ्या मनांतील राग नाहींसा होत नाहीं? अजूनहि मी तुझ्या अनुरागाला पात्र होत नाहीं? नाहीं! नाहीं! रूपिणी, आज मी तुला मजवर अशी अप्रसन्न राहूं देणार नाहीं! माझ्या या एकनिष्ठ भक्तीनें किंवा पूजाद्रव्यानें माझी हृदयदेवता जर मजवर प्रसन्न होत नसेल, तर आज मी तिजपुढें आपल्या प्राणाचाही बली समर्पण करण्याचा निश्चय केला आहे; आणि हा पहा त्याचा आरंभ!" एवढें बोलून त्यानें आपल्या डोकीच्या फेट्याचा फास गळयाला लाविला; आणि आतां तो जोरानें ओढणार, इतक्यांत त्या तरुणीनें त्याचे दोन्ही हात जागचे जागीं बळकट धरून ह्मटलें:—

"थांबा! थांबा! देवदत्त, असें साहस करूं नका! तुमच्या प्रेमाची परीक्षा पाहण्याकरितांच मी तुमच्याशीं क्षणभर अशी निष्ठुरतेनें वागलें! पण खरं पुसाल तर तुह्मांला पाहिल्या दिवसापासूनच माझं मन तुमचेवर जडलं आहे! पण आपण हा केवढा आततायीपणा आतां चालविला होता? बाई! बाई! शर्थ झाली पुरुपांच्या या उतावळेपणाची!

या वेळीं बहुपतिक वसुंधरा जशी भानूच्या, तशी ती तरुणीही त्या तरुणाच्या करपाशांत बद्ध झाली होती! वाचकहो! या उभय-

तांना क्षणभर आपण अशाच स्थितींत ठेवून त्यांचा पूर्ववृत्तांत काय आहे तो पाहूं या.

प्रस्तुतचें कथानक भूपाल शिरोमणि महाराज श्रेणिकांच्या वेळचें असून, उपरिनिर्दिष्ट तरुणी त्यांच्याच राजधानींतील ह्मणजे राजगृह नगरींतील एका शेतकऱ्याची बायको होती. हिच्या नवऱ्याचें नांव बळिभद्र असून हिचें नांव रूपिणी होतें. ही रूपानें फारच सुंदर असून, हिचा चेहराही अत्यंत मोहक होता. तिच्या ठुसठुशीत बांध्यानें तर, तिच्या मोहकतेंत विशेषच भर घातली होती। पण हिचें बाह्यांग जितकें मनोरम तितकेंच तिचें अंतरंग घाणेरडें होतें. तिच्या ठिकाणचा हा घाणेरडा दुर्गुण ह्मणजे तिच्या मनाची चंचलता होय. याच दुर्गुणामुळें तिचें इतकें उत्कृष्ट सौंदर्यही केवळ प्रेतावरील पुष्पाप्रमाणें तिरस्करणीय झालें होतें !

इतक्या सुंदर शरीरांत असल्या निंद्य दुर्गुणाचा कसा प्रादुर्भाव झाला, या नाजुक फुलाच्या अंतरंगांतही दारुण विषारी कीड कशी शिरली, याविषयीं येथें मीमांसा करण्याची आवश्यकता नाहीं. येथें इतकेंच सांगणें पुरे आहे कीं, तिची बाल्यावस्थेंतील परिस्थितीच पुष्कळ अंशीं या दुर्गुणास कारणीभूत झाली होती.

तिच्या अशा प्रकारच्या स्वभावामुळें गृहकार्याकडे किंवा गृहिणीविषयक कर्तव्याकडे तिचें बिलकुल लक्ष नसे. नट्टापट्टा आणि नखरा यांतच तिचा बहुतेक सारा वेळ जाई ! यामुळें तिजसंबंधीं गांवांत नानाप्रकारच्या कंड्या पसरलेल्या असत ! टवाळ लोकांना काय ? जरा कोठें व्रण सांपडावयाचा अवकाश, कीं, केलाच त्यावर साऱ्यांनीं मिळून दंश ! पण या योगानें तिच्या गरीब पण अब्रुदार सासूसासऱ्यांच्या मनाला केवढ्या वेदना होत, याची त्यांना किंवा खुद्द रूपिणीलाही

कल्पना नसे ! आपणासंबंधीं गांवांत चाललेली निंदा कधीं कधीं तिच्याही कानांवर येई, पण त्यामुळें देखील आपल्या चंचल स्वभावांत फरक करण्याइतका परिणाम तिच्या मनावर कधींच झाला नाहीं !

लोकनिंदेचा तसाच सासूसासऱ्यांच्या उपदेशाचा किंवा शिव्याशापांचाही तिच्या मनावर बिलकुल परिणाम झाला नाहीं; किंवा होत नसे. तिचा नवरा तर काय, बिचारा अगदीं सात्त्विक. सारा दिवसभर आपल्या कामांत गढलेला. त्यानें दिवस उगवण्याचे आंतच शेताला जावें, तों प्रहररात्र उलटल्यावर घरीं परत यावें. पण त्याला तेथें सुख किंवा आनंद यांचा ह्मणून बिलकुल लाभ होत नसे.

आपल्या स्वभावदोषानें आपण आपल्या पतीस दुःखी करीत आहोंत, आणि त्यामुळें उभयतांचेंही जीवन रूक्ष होत आहे, संसारांतील खऱ्या सौख्यास उभयतांही मुकत आहोंत, हें त्या अभागिनीस कळत नव्हतें !

अशा प्रकारची या तरुणीची स्थिति असून शेतांत जाण्याकरितां ह्मणून ती आज घरांतून निघाली होती, तों वाटेंत प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभीं सांगितल्याप्रमाणें प्रकार घडून आला.

तिला ज्यानें आडविलें तो तरुणही राजगृह नगरींतलाच राहणारा असून, तो एका भिक्षुकाचा मुलगा होता. त्याचें नांव जरी देवदत्त होतें, तरी त्याची वागणूक आणि आचरण पाहून त्याला 'दानवदत्त' हेंच नांव विशेष यथार्थ शोभलें असतें, असें कोणासही वाटल्याखेरीज राहतें ना ! त्याचा बाप जरी भिक्षुकीचा धंदा करीत असे, तरी त्याच्या सांपत्तिक स्थितीबद्दल राजगृह नगरींतील मोठमोठ्या लक्ष्मीपुत्रांनाही हेवा वाटत होता ! आणि मोठमोठ्या उला-

ढाली करून रात्रंदिवस तोट्या- नफ्याच्या विवंचनेंत जळणाऱ्या कित्येक व्यापाऱ्यांना तर त्याचीही स्पृहणीय सांपत्तिक स्थिति पाहून, आपण आरंभींच या बिनभांडवली पण बिनकाळजीच्या धंद्यांत कां पडलों नाहीं, असें होऊन जाई!

या गृहस्थाच्या--नव्हे भिक्षुकाच्या ठिकाणीं आपल्या धंद्याची हतोटीही तशीच अजब असे. भोळीं भावडीं सावजें चटकन दृष्टीस पडत आणि तो हां हां ह्मणतां त्यांची शिकार करी. एखाद्या लक्ष्मीपुत्राचा एकुलता एक पुत्र आजारी पडणें, एखादा व्यापारी पैशाच्या पेंचांत येणें, किंवा एखाद्या अब्रूदार माणसांवर राजाची कसली तरी तोहमत येणें, याला तो आपल्या धंद्याचा उत्कृष्ट मोसम समजत असे. त्यावेळीं त्यानें त्या संकटांत सांपडलेल्या माणसाकडे जाऊन त्यास एखाद्या ग्रहाच्या पीडेची, किंवा ग्रामदेवतेच्या क्षोभाची अशी कांहीं सडकून तंबी द्यावी, कीं, त्या ग्रहांना किंवा देवतांना आंवरून धरण्यासाठीं त्यांनीं याचे पायच धरले पाहिजेत! अर्थात् मग हे भिक्षुक महाराज मागतील तेवढी दक्षिणा ते देत, आणि सांगतील तेवढा खर्च करीत! अमक्याला शनी पायीं आला, एवढें याला समजलें, कीं, याची पायपिटी तेथें सुरू झालीच! आणि अनेक वेळां यजमानाकडून याचें उखळ इकडे पांढरें होतांच तिकडे ग्रहही आपलीं तोंडें काळीं करीत!

शेतकरीवर्गाला तर हा भिक्षुक नुसती दुभती धेनूच नव्हे, तर कामधेनु वाटत असे! त्यांच्या गरीब स्वभावाबद्दल तर प्रश्नच नाहीं! अंगीं साधारण धूर्तपणा असला ह्मणजे पुरे! मग वाटेल त्यानें ह्यांना पिळावें! हा भिक्षुक तर धूर्तपणाचा अगदीं पुतळाच असल्यामुळें तो निरनिराळ्या मार्गांनीं त्यांना पिळून त्यांच्या जवळील द्रव्याचें हरण कसा करीत असेल, ते निराळें सांगण्याची गरज नाहीं.

त्यानें या लोकांच्या कल्याणासाठीं ग्रामदेवतांना अभिषेक करण्याचा एवढा सपाटा लाविला होता, कीं, त्यामुळें, गांवच्या खऱ्या नदीचा ओघ बंद पडून अभिषेकाच्या जलाचीच एक कृत्रिम नदी निर्माण झाली होती? या अनर्थाबद्दल एकदां खुद्द त्याच्या मुलानेंच त्याच्याजवळ आश्चर्य प्रदर्शित केलें. तेव्हां तो संतापूनच ह्मणाला--"मूर्खा, तुला बिलकुल अक्कल नाहीं! या नदीच्या ओघाच्या उलटापालटींतच द्रव्याच्या ओघाचीही उलटापालट आठविली होती, समजलास; तो ओघ इकडे वळला ह्मणूनच लोकांच्या घरांतील द्रव्याचा ओघही माझ्या घराकडे वळला! हा अखंड वाहणारा अभिषेक--जलाचा प्रवाह ह्मणजे तुला काय वाटतें? हा नुसता आपल्या घरांत वाहणारा द्रव्याचा ओघ आहे ओघ! समजलास—" बापाच्या या उत्तरानें मुलगा अगदीं चित झाला असल्यास त्यांत आश्चर्य कसलें?

नेहमीं दुसऱ्याकडे मागण्याची खालीं हात पसरण्याची या भिक्षुकाला इतकी संवय लागली होती, कीं, त्याचा चुकून देखील कधीं उपडा हात होत नसे. यायोगानें त्याला जेवण्याची देखील पंचाईत पडूं लागली. त्याच्या उताण्या हातावर बायकोनें जेव्हां घास ठेवावेत तेव्हां कोठें त्याचें जेवण होई. मुलाच्या थोबाडींत वगैरे मारण्याचा त्याला कधीं प्रसंग आलाच, तर तो उपड्या हातानेंच मारीत असे!

अशा माणसाच्या पोटीं देवदत्ताचा जन्म झालेला, तेव्हां उद्योगाबद्दल तिटकारा त्याच्या वयाबरोबरच त्याच्या मनांत वाढत गेला असल्यास त्यांत आश्चर्य कसलें? शिवाय त्याच्या बापाचा उपदेशही त्याच्या या वृत्तीला पोषक असाच असे. तो त्याला नेहमीं ह्मणे:—
"करावयाचें आहे काय बेट्या आपल्याला कांही उद्योग धंदा करून?

आपला पिढीजाद व्यवसाय आपल्याला शिताफीनें करितां आला ह्मणजे पुरे ! आणि ही शिताफी प्राप्त होण्यास रगडसा हांजीहांजी-खोरपणा आणि पुष्कळशी धूर्तता यांखेरीज दुसरें कांहीं नको ! मग आपल्याला काय कमी आहे ? यजमानाची सारी संपत्ति खुशाल आपली समज ! माझा हा उपदेश नीट ध्यानांत धरून चालशील तर तुला जन्मांत कधीं कांहीं कमी पडावयाचें नाहीं !"

झालें ! लहानपणापासून याप्रमाणें आळशी आणि निरुद्योगी बनलेला देवदत्त तारुण्याचे आरंभींच स्वच्छंदी आणि बदफैली बनला असल्यास त्यांत आश्चर्य कसलें ? आणि आतां तर तो पूर्णत्वानें दुर्व्यसनपंकांत रुतला होता ! याशिवाय लोकांच्या टवाळ्या किंवा कुचाळ्या करणें हाहि एक त्याच्या आवडीचा विषय होऊन राहिला होता ! बाप मृत्यु पावल्यामुळें त्याची रग्गडशी संपति आयतीच हातीं येऊन त्याच्या या नीच वृत्तीस पराकाष्ठेचा ऊत आला होता, आणि ती संपत्तीही दुर्मार्गांत जाऊं लागली होती ! वाजवीच आहे, भोळ्या भाबड्या माणसांच्या डोळ्यांत धूळ फेंकून मिळविलेली संपत्ति अशा दुर्मार्गांत जाऊं नये तर जावी तरी कोणीकडे ?

या नीच तरुणास पुष्कळ दिवसापासून रूपिणीचा अगदीं ध्यास लागून राहिला होता, तिच्या स्वभवाची वगैरे जरी त्याला बिलकुल माहिती नव्हती, किंवा तिची आणि त्याची कधीं ओळखही झाली नव्हती, तरी तिची राहणी आणि मनाचे चंचलपणा दाखविणारे तिचे अभिनय, एवढीं बाह्य कारणेंच त्याला तिजविषयीं दुर्वासना धरावयास पुरेशीं वाटत होतीं ! पण तिची कधीं एकांतांत भेटच न झाल्यामुळें त्याला आपली ही वासना तिजजवळ अजून-पर्यंत उघडपणें बोलून दाखवितां आली नाहीं ! ती संधि त्याच्या

सुदैवानें त्यास आज अचानक प्राप्त झाली! तोही कांहीं कामाकरितां आज असाच आपल्या शेताकडे चालला होता.

रूपिणीचा पोशाख नेहमींप्रमाणें आजही झोंकदारच होता. तिनें एक तलम काळी चंद्रकळा परिधान केली असून, अंगांत जरीची बुट्टेदार चोळी घातली होती आणि अष्टमीच्या चंद्रासारख्या आपल्या मनोहर निटिलावर कुंकवाची अगदीं बारीक चिरी लाविली होती. खरोखर तिचा या वेळचा पोशाख किंवा अभिनय यांपैकीं एकाकडे जरी एखाद्याची नजर गेली असती, तरी ही शेतकामाला चाललेली शेतकऱ्याची स्त्री आहे असें कोणीं कितीही कंठशोष करून सांगितलें असतें तरी त्याला खरें वाटलें नसतें!

देवदत्ताचा पोषाखहि त्याच्या वृत्तीला साजेसाच होता. त्यानें अंगांत एक तलम मलमलीचा सदरा घातला असून, डोकीस अस्मानी रंगाचा फेटा मोठ्या ऐटीनें बांधला होता. हातांत एक वेताची बारीक छडीहि होती.

सभोंवार नेत्रकटाक्ष फेंकीत मोठ्या तोऱ्यानें चाललेल्या रूपिणीस दुरून पाहतांच एखादें गिधाड जसें प्रेताकडे धांवतें, तसा तो तिजकडे धांवला. पुढें उभयतांची भेट व काय संवाद झाला तो वर आलाच आहे.

आपण योजिलेल्या युक्तीचा—आत्मघाताच्या सोंगाचा—दुर्बळ किंवा चंचल मनाच्या रूपिणीवर अनुकूल परिणाम झालेला पाहतांच देवदत्तानें प्राप्त झालेल्या संधीचा आपल्या मतें शक्य तेवढा मोठा फायदा करून घेण्याचें ठरविलें.

त्यानें आपल्या मोहक भाषणांनीं तिच्या मनास भुरळ पाडून, आणि भावी सुखांचीं अनेक मनोहर चित्रें तिच्या डोळ्यापुढें उभीं करून

तिजकडून आपणाबरोबर देशांतरास पळून जाण्याचें कबूल करवून घेतलें !

या वेळीं आपलें केवढें अधःपतन होते आहे, हें त्या दुर्बळ मनाच्या प्रमदेच्या लक्षांत आलें नाहीं ! तिच्याकडे तरी काय दोष ? त्या नीचानें तिच्या या पंगु मानसिक--वृत्तीचा आपल्या दुर्वासनेकडे शक्य तेवढा दुरुपयोग करण्याकडे आपल्या पुरुषस्वभावाची कमाल केली होती.

त्याच्या मोहक भाषणांनीं हुरळून गेलेली रूपिणी ह्मणाली:--

" मग उद्यां दोन प्रहररात्रीं मी येथें जरूर येऊं ना ? आपण माझी येथेंच वाट पाहत बसाल ना ? "

" होय. तुला याविषयीं अजून कां शंका वाटते ?" तिच्या वरील प्रश्नानें केवळ आनंदानें वेडाच होऊन देवदत्त ह्मणाला. यावेळीं खरोखर स्वर्गाचें द्वारच उघडलें आहे असें त्याला वाटूं लागलें. तो पुढें ह्मणाला:--" छी: किती वेडी आहेस तूं ? तो क्षण--उभयतां मिळून स्वर्गसुखांत विहार करण्याचा तो समय, येईपर्यंत ज्याला आपण तप्त निखाऱ्यावर लोळत असल्याप्रमाणें वाटणार त्या या तुझ्यासाठीं वेडावलेल्या दासाला, 'माझी येथेंच वाट पाहत बसालना ?' असें तूं विचारतेस ? मालमत्ता विकून पैसे गोळा करावयाचे नसते तर मी मुळीं आतांपासूनच येथें बसून राहिलों असतों. "

इतक्यांत रूपिणीचें मन शंकाकुल होऊन ती ह्मणाली:--" मी आपल्या शब्दावर विश्वास ठेवून आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागावयास तयार झालें, पण आपण मला पुढें फसविणार तर नाहीं ना ? माझा त्याग तर नाहींत ना करणार ? "

" कसली ही कुशंका !" देवदत्त उद्गारला. "प्यारी ! माझ्या प्रेमाविषयीं तुझ्या मनांत अजूनहि संशय रहावा ? बोल ! तुझा हा

संशय नाहींसा होण्यासाठीं मीं आतांचें आतां काय करूं तें बोल? माझें हें हृदय विदीर्ण करून त्यांत तुझ्याविषयीं वसत असलेलें गाढ प्रेम तुला दाखवूं काय?"

"नको! नको!" त्याच्या या नाटकी भाषणानें निःशंक झालेली रूपिणी ह्मणाली, "माझ्या वेड्या मनानें कसली तरी भलतीच शंका घेतली! पण आपल्या हातून नाहींग बाई असें होणार! बरं पण गडे, सोडा आतां, मला लौकर शेतांत गेलं पाहिजे. नाहीं तर आपला सगळाच बेत ढासळून जावयाचा?"

तिच्या मधुर भाषणांनीं आणि सरस कटाक्षशरांनीं विद्धहृदय झालेल्या देवदत्तास यावेळीं तिचा त्याग करणें मोठें जड गेलें? पण पुढील अभंग आणि अचाट सुखाकडे लक्ष देऊन, त्यानें ठरलेली वेळ येईपर्यंत होणारें तिचें वियोगदुःख कसें तरी सहन करण्याचा निश्चय केला, आणि तिला आपल्या बाहुपाशांतून मुक्त केलें. मात्र तिला सोडतेवेळीं आपलें वचन पाळण्याविषयीं त्यानें तिजकडून पुन्हां एकदां शपथपूर्वक कबूल करून घेतलें!

नंतर तीं उभयतांहि आपापल्या मार्गास लागलीं.

# प्रकरण २ रें.

## परीसस्पर्श !

देवदत्ताशीं संकेत करून रूपिणी आपल्या शेताकडे जाण्यास निघाली, हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. घराबाहेर पडून स्वतंत्र राहण्यांत फारच सुख असतें असें तिच्या मनानें पक्कें घेतलें असल्यामुळें, देवदत्ताबरोबर पळून जाण्याचें तिनें अगदीं ठाम ठरविलें होतें. या भावी सुखाच्या मनोराज्यांत गुंग होऊन चालली असतां, रस्ता सोडून जरा बाजूस पण जवळच शिलाशकलावर बसलेल्या एका तेजःपुंज तरुण मुनीवर तिची अवचित दृष्टि गेली.

हे मुनि ऐन तारुण्यांत असून त्यांची पंचविशी देखील अजून उलटली नव्हती. अशा वयांत वैराग्य प्राप्त होऊन सकल विषयसुखोपभोगांचा त्याग करणें ही गोष्ट कांहीं सामान्य नव्हे. या वयांत जे मनोविकार वर्षाकालांतील जलौघाप्रमाणें कोणत्याहि प्रतिबंधाला न जुमानतां कनककामिनी--विलासाकडे धांवावयाचे, त्यांस स्थिर करणाऱ्या—नव्हे उलट गति देणाऱ्या—परमार्थाकडे वळविणाऱ्या या महाभागाचें आत्मिक सामर्थ्य, वर्णन करण्याची शक्ति कोणाच्या लेखणींत आहे ?

अशा वयांत वैराग्य प्राप्त होण्यास पूर्वजन्मांतील शुभ कर्में कारणीभूत असतील, पण तदनुसार असिधारातुल्य खडतर व्रतांचें पालन करणें यांत अलौकिक पुरुषार्थ नाहीं असें कोण म्हणेल !

यावेळीं प्रात:काळचे आठ वाजण्याचा सुमार होता. सृष्टीचें स्वरूप अजूनही सौम्य आणि रमणीय असेंच होतें. आणि मुनीश्वर तें अवलोकन करून त्याजवरून सुचणाऱ्या अनेक विचारतरंगांत मग्न होऊन गेले होते. ते अत्यंत सुस्वरूप असून तप:श्रीनें त्यांची कांति अधिकच खुलून दिसत होती. त्यांची मुद्रा अत्यंत शांत असून तिच्यांत एवढा मोहकपणा भरला होता, कीं, पाहणारांस एकसारखें तिजकडे पाहतच राहावेंसें वाटे !

त्यांना पाहतांच रूपिणीच्या मनांत अनावर मोह उत्पन्न झाला, आणि ती आपला मार्ग सोडून त्यांच्याकडे वळली.

ती त्यांच्यासमोर जाऊन उभी राहिलेल्यास बराच वेळ झाला तरी कोणाच्याच तोंडून एक शब्दही निघाला नाहीं. मुनि आपणास कोण कोठील वगैरे प्रश्न विचारतील, नंतर आपण आपला मनोदय त्यांना कळवूं, असा तिचा बेत होता. पण मुनि आपल्याच ध्यानांत मग्न ! त्यांनीं तिजकडे नुसतें ढुंकून देखील पाहिलें नाहीं ! बराच वेळ वाट पाहून कंटाळल्यामुळें ती आपण होऊनच मुनींस बोलूं लागली. ती ह्मणाली:—

“महाराज ! किती वेळ तरी मी आपणाजवळ उभी राहिलें आहे ! पण आपण मजशीं एक अक्षर देखील बोलत नाहीं ! कां बरं, मी आपल्या कृपेला पात्र नाहीं कां ? महाराज, जिच्या प्राप्ती-करितां शेंकडों तरुण लोक आपल्या सर्वस्वावरही पाणी सोडावयास तयार होतात, ती आपण होऊन तुमच्याकडे आली असतां तुह्मी तिजकडे नुसता डोळा उघडूनही पाहूं नये ! माझ्या सुखाची गोष्ट एका बाजूला राहूं द्या. पण स्वत:च्या सुखाविषयींही तुह्मीं इतके बेफिकीर कसे ? तुह्मांला स्वत:ला याचें कांहीं इतकं वाटलं नसेल,

पण अशा वयांत तुमचा हा एवढा सुंदर आणि सुकुमार देह, उन्हातान्हांत कष्टत असलेला पाहून माझें काळीज तिळतिळ तुटत आहे ? महाराज, अशा तरुण वयांत या भलत्याच फंदांत पडून, आपल्या जिवाचे असे हाल कां बरें करून घेतां ? तुमच्या मनमोहक चेहऱ्याला आणि सुंदर रूपाला पाहून मजसारख्या शेंकडों बायका रात्रंदिवस तुमच्या सेवेस हजर राहतील. तुह्मांला तोंडांतून एक अक्षर देखील काढावयाची गरज राहणार नाहीं ! मग महाराज असं कां बरं ? छे: सोडाच आतां हें मौन आणि या गरिब दासीला करा पावन ! काय, आपण अजून देखील कांहींच बोलत नाहीं ? नाहीं बरं, मी नाहीं आपणांस अशी सोडावयाची !" एवढें बोलून त्या पतित प्रमदेनें त्या निष्पाप मुनिवर्यांचा हात धरला.

एवढा वेळपर्यंत तिची चर्पटपंजरी चालू होती, तरी ते मुनिवर्य स्तब्ध बसले होते. पण तिनें त्यांच्या हातास स्पर्श करितांच "पतित भगिनी, हें काय बरें करतेस" असे उद्गार त्या शांत, निर्विकार आणि निष्कलंक महात्म्याच्या तोंडून बाहेर पडले.

एवढेच उद्गार. पण त्याचा त्या पतित प्रमदेवर केवढा तरी विलक्षण परिणाम झाला. तिनें तावडतोब त्यांचा हात सोडून दिला, आणि सर्वस्वी नाहीं तरी त्या उद्गारानें तिचा कामवेग बराच कमी झाला. पुरुषाच्या भाषणाचा किंवा स्पर्शाचा असा विलक्षण अनुभव तिला आजन्मांत आला नव्हता. तथापि 'पीळ जळतो पण वळ जळत नाहीं.' या न्यायानें ती त्यांना लागलीच ह्मणाली:—

"महाराज, माझी एवढीहि कामना आपण नाहीं कां पूर्ण करीत ? आपण जर माझा हा हेतु पुरविला नाहीं, तर मी या दुःखानें तळमळून तळमळून मरेन. माझं मन आपणावर एवढं जडलं आहे कीं,

आपणाशिवाय मला प्रत्यक्ष स्वर्ग जरी मिळाला तरी तो शुद्ध नरका-सारखा वाटेल."

"सुख! सुख! सुख! हे अभागिनी।" ते शांतचित्तमुनि मोठ्या गंभीरपणानें ह्मणाले, "तूं केवढ्या गाढ अज्ञानतिमिरांत बुडाली आहेस, आणि तुझें सुखलोलुप मन विकारवशतेच्या भरांत भलत्याच गोष्टीला कसें कवटाळित आहे. सुखाची इच्छा प्रत्येक प्राणिमात्रास असते आणि त्याप्रमाणें तुला त्याची तळमळ लागून रहावी हें साहजिक आहे. पण सुखाविषयींची तुझी समजूत मात्र चुकीची आहे. खरें सुख आणि तुझी त्याविषयींची समजूत यांत पाणी आणि अग्नि, किंवा दिवस आणि रात्र यांप्रमाणें विरोध किंवा अंतर आहे. तूं सुख समजून ज्याच्या मागें लागली आहेस, आणि अनियंत्रितपणें ज्याचा अनुभव घेत आहेस, तो विषयोपभोग खरोखरच खरें सुख आहे काय? जर तसें असेल, तर सुखा-विषयीं तुला जी अजून तळमळ लागून राहिली आहे ती कां? सुख मिळूनहि सुखाची इच्छा कशी रहावी? यावरून आपण भयंकर भ्रमांत पडलों आहों हें नाहीं कां तुझ्या लक्षांत येत? तुझ्या बाबतींत बोलावयाचें ह्मणजे हा नुसता भ्रमच नव्हे तर दारुण अधःपात आहे! इंद्रियवेदना शमविण्याच्या प्रयत्नांत विकृत मनास क्षणैक वाटणाऱ्या आनंदास सुख समजून, तूं हें कसलें भयंकर विषप्राशन करीत आहेस, याची कल्पना तरी आहे काय? या-योगानें तुझ्या आत्म्याची काय भयंकर स्थिति होईल, तुला कसल्या यातना भोगाव्या लागतील, याचा तूं कधीं तरी विचार केला आहेस काय? कां तो विचार मनांत येऊनहि तूं बेहोषपणानें तिकडे दुर्लक्ष करीत आहेस? काय व्यभिचारी जीवांना परलोकीं होणाऱ्या भयंकर

यातनांची तुला कल्पना नाहीं? कां, हा सारा प्रकार तुला खोटा वाटतो? थांब! या प्रकारांत कितपत तथ्य आहे हें जर तुला पहावयाचें असेल तर क्षणभर डोळे झांकून स्थिर मनानें रहा, आणि तुला काय दिसतें तें सांग."

रूपिणीचें मन त्या महात्म्याच्या भाषणानें इतकें वेधून गेलें होतें, कीं, तिला तें स्थिर करण्याचा बिलकुल प्रयत्नच करावा लागला नाहीं; तें आपोआपच स्थिर झालें होतें. ती त्यांच्या सांगण्याप्रमाणें डोळे झांकून उभी राहिल्यास कांहीं थोडा वेळ लोटला नसेल, तोंच मोठ्यानें तिनें एक किंकाळी मारिली, आणि "महाराज, मला वांचवा हो वांचवा : असें ह्मणत त्यांचे पायावर लोळण घेतली."

रूपिणीला जिवंतपणींच या वेळीं जो नरकाचा भयानक देखावा दिसला त्याच्या मुळाशीं त्या महात्म्याचें कांहीं अलौकिक सामर्थ्य होतें, कीं, तो केवळ तिच्या कल्पनेचा होता, हें निश्चितपणें सांगतां येणें अशक्य आहे; व्यभिचारी जीवांस नरकलोकीं कसें भयंकर शासन मिळतें, या विषयींच्या गोष्टी नेहमीं तिच्या कानांवर पडत असून त्यावरून तत्संबंधी विचारहि तिच्या मनांत नेहमीं घोळत असत. यामुळें मुनीच्या भाषणानें आधींच विशेष श्रद्धाळू बनलेल्या मनास त्याच विचारांचें काल्पनिक चित्र अगदीं मूर्तिमंत दिसावें ही गोष्ट कदाचित् अधिक संभवनीय असेल. ते कांही असो. एवढी गोष्ट खरी, कीं, तो दिसलेला भयानक देखावा तिला इतका खरा वाटला, आणि त्याचा तिच्या मनावर एवढा जबरदस्त परिणाम झाला, कीं, ती स्थिति आपण प्रत्यक्षच भोगीत आहोंत अशी तिच्या मनाची समजूत होऊन, तिनें वर सांगितल्याप्रमाणें भेदरून जाऊन मोठ्यानें किंकाळी फोडिली!

नरक कशा प्रकारचा असतो, आणि असल्या पातकी जीवांना तेथें कसल्या दारुण यातना भोगाव्या लागतात याविषयींचीं वर्णनें निरनिराळ्या धर्मग्रंथांतून वाचकांच्या कानांवर नेहमींच येत असल्या-मुळें रूपिणीनें या क्षणभराच्या काल्पनिक नरकवासांत कसल्या कसल्या दारुण यातना भोगिल्याचें अनुभविलें तें येथें सविस्तर सांगण्याची आवश्यकता नाहीं.

मुनीच्या पायांवर लोळण घेतलेली रूपिणी बऱ्याच वेळानें शुद्धि वर आली. तिला भरलेली धडकी अजूनहि कमी झाली नव्हती! अजूनही तिचें काळीज जोराजोरानें उडत असून सारें अंग घामा-घूम झालें होतें! आपण पाहिलेला तो भयानक देखावा, आणि भोगि-लेले दारुण क्लेश हीं सर्व खरींच होतीं असेंच अजूनहि तिला वाटत होतें. ती जरा शांत झाल्यावर मुनि बोलूं लागले:—

" रूपिणी, आपल्या या निंद्य दुर्गुणांमुळें आपणास परलोकीं काय शासन मिळेल हें तूं पाहिलेंसच. मरणानंतरचा नरक तुला दिसून आलाच, पण या निंद्य दुर्गुणांमुळें इहलोकींही जो नरक तूं निर्माण केला आहेस तिकडे तुझी नजर कधीं गेली आहे काय? हा नरक त्या नरकापेक्षां कोणत्याहि प्रकारें कमी भयंकर, कमी दुःसह किंवा कमी यातनावह नाहीं! इतकेंच नव्हे, तर कांहीं कांहीं बाबतींत हा त्यापेक्षांहि जास्त भयंकर आहे! परलोकच्या नरकांत तुझ्या पापाबद्दल तुला स्वतःलाच शासन भोगावें लागेल, पण या इह-लोकच्या नरकांत तुजबरोबरच तुझ्या प्रियजनांना आणि नातल-गांनाही असह्य क्लेश भोगावे लागत आहेत; रूपिणी, याचा—या ऐहिक नरकाचा—या जिवंतपणांतल्या रौरवाचा—तूं कधीं तरी विचार केला आहेस काय? या पापामुळें तुझें मन प्रत्येक क्षणीं कसें साशंक

असतें, अनेक प्रकारचीं भयें तुझ्या हृदयास प्रतिक्षणीं कशीं फाडित असतात, निरनिराळ्या प्रसंगीं नवीन नवीन काय युक्त्या योजाव्यात आणि कसल्या थापा द्याव्यात या विवंचनेनें अशांतता तुझ्या मागें कशी सारखी हात धुऊन लागली आहे आणि सुखाच्या निद्रेनेंहि तुला कसें सोडविलें आहे या सर्व गोष्टींचा नीट विचार कर! हें मनस्तापाचें चित्र डोळ्यापुढें धर! आणि या यातनांची भावी नरक-यातनांशीं तुलना करून याही तितक्याच असह्य आहेत कीं नाहींत तें सांग? येथला हा मनस्ताप तेथल्या तापलेल्या लोखंडी पुतळ्याच्या आलिंगनाच्या तापाहून कोणत्या प्रकारें कमी आहे? तापलेल्या तेलाच्या कढईंत तळली जात असतांना तेथलें तुझें तळमळणें आणि अशांतीमुळें येथें होणाऱ्या तुझ्या जिवाची तळमळ यांत काय भेद आहे? आणि तेथें भाले, बरच्या, सुया, दाभणें वगैरे तीव्र शस्त्रांचें शरीरांत भोसकणें आणि प्रत्येक पापप्रसंगीं 'आपण हें निंद्य कर्म करीत आहोंत' अशा प्रकारचा सदसद्विवेक बुद्धीच्या तीव्र तरवारीचा येथें तुझ्या हृदयावर होणारा असह्य घात यांत तूं कोणता फरक समजतेस? त्याचप्रमाणें या दुर्गुणांमुळें येथें होणारें अब्रूचे धिंडवडे हें तर तेथें होणाऱ्या शरिराच्या चिंधड्यापेक्षांहि निः-संशय दुःसह होत! आणि या सर्व यातना, रूपिणी, तूं नित्य अनुभवित असतांनाहि आपण सुखोपभोगच अनुभवीत आहोंत असें तुला वाटतें काय? केवढा हा तुझा भ्रम! पितांना गोड लागतें, एवढ्या-साठींच तूं हें अत्यंत दारुणपरिणामी विष, अमृत समजून प्राशन करीत आहेस, पण याचा वाईट परिणाम तुझ्यावरच होऊन थांबत नाहीं! तुझ्याबरोबर तुझ्याशीं ज्यांचा ज्यांचा संबंध आहे त्यांच्याहि हृदयाला ते अघोर यातना देत आहे! याचा तूं कधीं विचार केला

आहेस काय ! आपणास सुख व्हावें या आशेनें ज्यानें मोठ्या आनंदानें तुझें पाणिग्रहण केलें, व ज्याच्याशीं कोणत्याहि प्रकारें प्रतारणा करणार नाहीं असें तूं लग्नाचे वेळीं वचन दिलेंस त्या तुझ्या पतीची, त्या तुझ्या देहाच्या अधिपतीची, तुझ्या या बेइमानी वर्तनानें काय अवस्था होत असेल, हजारों विंचवानीं नांग्या मारिल्याप्रमाणें किंवा रखरखीत निखाऱ्यावर धरल्याप्रमाणें त्याच्या अंतःकरणास कशा वेदना होत असतील याचें चित्र तूं आपल्या डोळ्यापुढें धर. "

या वेळीं रूपिणीच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहत होत्या पण मुनीवर्यांनीं तिकडे लक्ष न देतां आपला वाक्प्रवाह तसाच चालू ठेविला.

"पापिणी !" ते ह्मणाले. "आपलें घर साक्षात् नरक बनविणारी ही अघोर विषयवासना सुखकारक आहे असें तुला वाटतें तरी कसें ? शिवाय या नरकांतील यातनांचा अनुभव तुजबरोबर तुझ्या आप्तांनाहि घेणें भाग पडत आहे ! केवढें अघोर कर्म हें, खरोखर हिंसा, लबाडी, चोरी, विश्वासघात, वचनभंग या दारुण पातकांचें मूळ हा व्यभिचारच नव्हे काय ? आणि जगांतील अशांततेच्या मुळाशीं तर या खेरीज दुसरें कोणतें कारण आहे ? भ्रष्टचरिते, बोल ! या अशांततेच्या कारणास, या दुर्गतीच्या मुळास, या मनस्तापाच्या बीजास, या गृहिणी पदाच्या कलंकास, या उभय कुलांच्या मुखावर फांसलें जाणाऱ्या काजळास, या पतिविषयक बेइमानपणास, या अखिल पातकांच्या राशीस, या निःशेष अनर्थांच्या पायास, या परम निंद्य व्यभिचारास तूं सुख समजतेस काय ? हीं पहा तुझ्या या वर्तनानें असह्य मनोयातना होऊन केवळ मरणाचीच वाट पाहत असलेलीं तुझीं सासुसासरे, आणि

मरणानें देखिल या मनोवेदना कमी होण्याची आशा नसलेला तो तुझा पति ?—"

पण मुनिचें हें भाषण पूर्ण झालें नाहीं तोंच ती दुर्दैवी स्त्री "पुरे ! पुरे ! महाराज !" असें ह्मणत एकदम उठली आणि त्यांच्या पायांवर अविरत अश्रुजलाचा अभिषेक करूं लागली ! या वेळीं तिचा कंठ अगदीं भरून आला असल्यामुळें तिच्याच्यानें कांहीं बोलवेना, तथापि ती स्फुंदतच ह्मणाली:—

"महाराज ! या पापिणीला आपल्या केल्या कर्माचा आतां अत्यंत पश्चात्ताप होत आहे ! आणि आपल्या कृपेनें नुकत्याच साफ झालेल्या माझ्या दृष्टीस माझें स्वरूप अत्यंत घाणेरडें, हिडीस आणि पराकाष्ठेचें किळसवाणें दिसत आहे ! महाराज सांगा ! या रूपिणीच्या, नव्हे नीच पापिणीच्या उद्धाराचा कांहीं मार्ग आहे काय ? नरकांत बुडालेल्या या कीटकांस वर येण्याची कांहीं आशा आहे काय ? सांगा हो ! सांगा ! महाराज, माझ्या हृदयाला यावेळीं कसा नुसता वणवा लागून राहिला आहे !"

"रूपिणी, शांत हो." मुनि अत्यंत गंभीरतेनें ह्मणाले. तुला जर आपल्या कृतकर्माचा खरोखरच पश्चात्ताप होत असेल, आणि यापुढें या पापापासून अलिप्त राहण्याचा जर तुझा खराच निश्चय झाला असेल तर तुझ्या उद्धाराची अजूनहि आशा आहे आणि तो मार्ग मी तुला दाखवितों."

"अहाहा ! महाराज, या चांडळणीविषयीं देखील आपल्या चित्तांत एवढी अनुकंपा ! खाचित साधुवर्य, आपण साक्षात् ईश्वर आहांत !" एक दीर्घ निःश्वास सोडून रूपिणी ह्मणाली. "एखाद्या विषारी प्राण्याप्रमाणें सर्व जग जिचा तिटकारा करितें, आणि महा-

रोग्याप्रमाणें समजून सच्छील लोक जिच्या वाऱ्यासहि उभे राहत नाहींत, त्या या कर्मचांडाळणीची आपणास इतकी दया येते ना? त्या कुमार्गगामिनीवरहि अमृत वर्षाव करण्यास आपण तयार झालात ना! या पतितेचाहि उद्धार आपण करणार ना? अहाहा! केवढं हें आपलं दयालुत्व! खचित महाराज! आपल्या प्रभावानं पाषाणालाहि पाझर फुटेल! तर सांगा, या पतितेच्या उद्धाराचा मार्ग कोणता आहे तो कृपा करून लौकर सांगा!"

"शील." मुनींच्या तोंडून एवढाच शब्द निघाला.

"पण महाराज! दुष्ट मनोविकारांचा अफाट वेग आवरून धरावयास आणि कामदेवाच्या प्रखर शराचा मारा विफल करावयास ही यःकश्चित अबला समर्थ होईल कां?"

"रूपिणी, निश्चयाला अशक्य काय आहे? तुला ज्यांचें मोठें भय वाटतें त्या मनोविकारांना जिंकणारे आणि कामदेवाला गलितगर्व करणारे महात्मे तरी कोण होते? तुजसारखीं माणसेंच नव्हतीं काय? इतरांची गोष्ट बाजूला राहो, पण **राजीमती** तर यःकश्चित अबलांना!-शिवाय पति सौख्याचा लेशतरी तिला ठाऊक होतां कां? पण तूं म्हणतेस त्या दुष्ट मनोविकाराच्या अफाट प्रवाहाला तिनें जागचें जागींच नाहीं का थांबविलें? आणि कामदेवाच्या प्रखरशरांनाहीं तिनें निर्वीय केलें नाहीं काय? मग तूंच त्यांना इतकें कां भ्यावेस? पिशाच्याप्रमाणें तीं भित्र्यांच्या किंवा त्यांचें नेहमीं चिंतन करणारांच्या मागें लागत असतात हें पक्कें ध्यानांत ठेव; तूं मर्दाप्रमाणें धीट होऊन त्यांना दूर झुगारलेंस, कीं, तीं तुजकडे ढुंकून देखिल पाहणार नाहींत! लक्षांत ठेव, तीं नुसती गांडुळें आहेत? त्यांना आहे त्या स्थितींत

ठेवणें किंवा त्यांचे भयंकर सर्प बनविणें हें केवळ तुझ्या मनाबला-वर आणि शील रक्षणाच्या निश्चयावर अवलंबून आहे. हीं दोन्हीं जर निश्चल असतील तर तुला त्यांच्याकडून बिलकुल पीडा होणार नाहीं, आणि तीं अशीं निश्चल ठेवण्याचें सामर्थ्य तुझ्याच काय, पण प्रत्येक मानवी आत्म्याच्या ठिकाणीं आहे."

"मग महाराज, मला पतीचाहि त्याग करावा लागेल काय?"

"नाहीं. रूपिणी, तुला हें व्रत पाळावयासाठीं पतित्यागाची आवश्यकता नाहीं. संसारत्यक्त साधूंना किंवा साध्वींनाच पत्नि पतिसंबंधाचा सर्वस्वी त्याग करण्याची आवश्यकता असते, पण शीलव्रताच्या बाबतींत संसारी जनांना हा कडक निर्बंध लागू नाहीं. संसारी स्त्रीपुरुषांनीं स्वतःच्या पतिपत्नीसमागमांत संतुष्ट राहणें ह्मणजेच शील पाळणें होय. जगांत विवाहसंस्था याच कार्यासाठीं अस्तित्वांत आली असून दुर्बळ मनाच्या स्त्रीपुरुषांस या योगानें आत्मोधाराचा फारच सोपा मार्ग निर्माण झाला आहे. ह्मणून रूपिणी, खिचपत असलेल्या नरकांतून निवा-वयाची तुझी अजूनहि इच्छा असेल तर तूं याच घटकेला हें व्रत घे आणि तें आजन्म निश्चयानें पाळ."

रूपिणीचा निश्चय केव्हांच झाला होता. फक्त ती त्यांच्या आशि-र्वादात्मक प्रोत्साहनासाठींच कांहीं थोडा वेळ थांबली होती. त्यांचें भाषण पूर्ण होतांच तिनें उभें राहून त्यांच्या पायावर हात ठेविला आणि ह्मटलें:—

" भो! परम करुणामय साधुवर्य, आपल्या या परम वंद्य, परम निर्मल आणि पतित जनसंरक्षक चरणावर हात ठेवून सांगतें, कीं, या पुढें ही रूपिणी, पतीखेरीज अन्य कोणत्याहि पुरुषास स्पर्शच काय पण

पापदृष्टीनें बघणार देखील नाहीं! कसलाहि प्रसंग आला, कितीहि दुर्दशा झाली, कसल्याहि भयंकर विपत्तीनें गांठिलें. संकटांनीं पाठ पुरविली, मनोविकारांच्या उच्छृंखलतेचा कडेलोट झाला, या देहाला जिवंत जाळलें किंवा त्याचे राई राई एवढाले तुकडे केले, तरी रूपिणी मरेपर्यंत ह्मणून आपलें हें व्रत बिलकुल भंगूं देणार नाहीं ! मी ही प्रतिज्ञा याच वेळीं याच पायाला स्मरून करितें ? "

या वेळीं त्या साधुवर्यांच्या प्रशांत मुद्रेवरहि प्रसन्नतेची किंचित छटा उमटल्याखेरीज राहिली नाहीं.

रूपिणीच्यानें पुढें बोलवेना ! तिचा कंठ दाटून आला आणि नेत्रांतून अश्रुवर्षाव होऊं लागला. त्या महात्म्याच्या चरणावर आपलें डोकें पुन्हां एकदां ठेवून ती तेथून मोठ्या कष्टानें निघाली.

घेतलेलें हें व्रत तिनें कसें काय पाळलें हें पुढें समजेलच.

रस्त्यानें जातांना ती स्वतःशींच ह्मणूं लागली:—

"आजपर्यंत किती तरी पुरुषांचा स्पर्श या देहास झाला, पण माझं सर्वस्वी रूपांतर करणारा असा हा स्पर्श पहिलाच. परीसस्पर्श ह्मणतात तो हाच काय ?"

# प्रकरण ३ रें.

## कसोटीला उतरलें.

रूपिणीच्या नवऱ्याला आज आपल्या पत्नीचा कांहीं निराळाच अनुभव येऊं लागला ! तिच्या बोलण्याचालण्यांत व एकंदर वृत्तींत पडलेला फरक पाहून त्यास पराकष्ठेचें आश्चर्य वाटलें ! "पण देवा ! हें सर्व क्षणभंगुर तर नसेलना?" असा विचार त्याचक्षणीं त्याच्या मनांत आल्याखेरीज राहिला नाहीं. पण आपली ही भीति खोटी आहे हें पुढें लौकरच त्याच्या अनुभवास आलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं तें जोडपें मोठ्या आनंदानें घरीं परतलें. आजच्यासारखा आनंद, आणि आजच्या सारखें समाधान त्या उभतांस साऱ्या जन्मांतहि अनुभवल्याचें कधीं ठाऊक नव्हते ! सृष्टीचें स्वरूप तरी त्यांना आज किती रमणीय आणि सुखप्रद भासत होतें ! आज आपल्या हृदयावरचें कसलें ओझें कमी झालें तें रूपिणीस कळेना ! तथापि आपलें मन आज फार उल्हसित आणि हलके झालें आहे एवढें मात्र तिला खास वाटत होतें. नवऱ्याची प्रसन्न मुद्रा पाहून तर तिला किती तरी समाधान वाटलें ! या शुद्ध सुखाचा अनुभव तिला नवाच होता !

आपल्या मुलांत व सुनेंत उत्पन्न झालेलें हें ऐक्य पाहून सासुसासऱ्यासही परमावधीचा आनंद झाला? म्हातारपणीं त्यांची या शिवाय दुसरी कोणती इच्छा असणार ?

रात्रीं आपल्या पतीचें पाय चुरीत असतांना पतिसेवेच्या या मंगलाचरणाचा तिनें आजच्याच सुमुहूर्तावर प्रारंभ केला होता—तिनें त्यास त्या महात्म्याचें झालेलें दर्शन, त्यानें पाजिलेलें दिव्य उपदेशामृत, आणि त्यामुळें आपणास झालेला पश्चात्ताप याविषयींचीं इत्थंभूत हकीकत निवेदन केली. यावेळीं त्या साधूविषयीं रूपिणीच्या पतिच्या मनांत किती पूज्यबुद्धि उत्पन्न झाली असेल, याची नुसती कल्पनाच करावी. असो. आतां आपण खऱ्या शुद्ध प्रेमामृताचा आजच आस्वाद घेणाऱ्या या जोडप्याच्या सुखांत व्यत्यय न आणतां रूपिणीसाठीं वेडा बनलेल्या देवदत्ताची, काय हकीकत आहे ती पाहूं.

रूपिणीचा आणि त्याचा कोठें तरी देशांतरीं निघून जाण्याचा बेत ठरतांच तो तिचा निरोप घेऊन शेताकडे जाण्यास निघाला ह्मणून पहिल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. पण त्याप्रमाणें तो शेतांत गेला नाहीं. त्याचें मन तिकडे जाण्याकडे बिलकुल लागेना. ठरलेल्या बेताप्रमाणें सर्व जिनगीची विल्हेवाट लावून, तिची मार्गप्रतीक्षा करावयासाठीं इष्ट स्थळीं केव्हां जाऊन बसतों असें त्यास होऊन गेलें, यामुळें शेतांत जाण्याचा बेत रहित करून तो मधूनच घराकडे परतला.

घरीं येतांच त्यानें घरांतील चीज वस्त येईल त्या किंमतीस विकावयास आरंभ केला. विक्रीचें असें धोरण ठेविल्यावर कोणत्याहि वस्तूस गिऱ्हाइक मिळण्यास, किंवा तिची विक्री होऊन रोख रकम हातीं येण्यास कितीसा उशीर लागणार ? हां हां ह्मणतां त्याच्या सर्व स्थावर जंगम जिनगीची विक्री होऊन, त्याच्या पदरांत रोख दाम पडले. त्याच्या या कृत्याचें पुष्कळांस आश्चर्य वाटलें. त्याच्या कित्येक स्नेह्यांस तर

त्याच्या जिनगीची जवळ जवळ अशी लूट होत असलेली पाहून अतिशय वाईट वाटलें! पण स्वतः मालकच जर आपल्या जिनगीची समजून उमजून अशी विल्हेवाट लावीत आहे तर त्यांना वाईट वाटून काय उपयोग होणार होता? दुसऱ्याची कोणाची तर त्याला कांहीं ह्मणावयाची किंवा विचारावयाची छाती झालीच नाहीं. पण मध्यंतरी त्याच्या बायकोनें त्याला अडथळा करण्याचें धाडस केलें; त्याचा परिणाम इतकाच झाला, कीं, तिच्या अंगावर चुकून तिचे राहिलेले दागिनेहि त्यानें काढून घेऊन त्याची विक्री केली! अखेर बिचारीला नुसत्या नेसत्या लुगडयानिशींच माहेरीं जाण्याचा प्रसंग आला!

याप्रमाणें मातीमोलानें सर्व जिनगीची विक्री करून, गोळा झालेली रकम बरोबर घेऊन देवदत्त संध्याकाळचे आंत इष्टस्थळीं जाऊन पोंचला. आतां ठरलेली वेळ केव्हां येते आणि रूपिणीची भेट केव्हां होते असें त्याला होऊन गेलें. त्याची उत्कंठा पराकाष्टेची वाढली. एकेक पळ त्याला वर्षाप्रमाणें वाटूं लागलें. आतां तर बरीच रात्र होऊन जिकडे तिकडे गडद काळोख पसरल्यामुळें त्याची उत्कंठा अगदींच अनावर झाली. जरा कोठें कांहीं खुसबसलें, कीं, रूपिणीच आली असें त्याला वाटे. पण लौकरच तें एखादें श्वापद असल्याविषयींची जेव्हां त्याची खातरी होई, तेव्हां त्यावेळीं चोंहीकडे पसरलेल्या त्या काळोखापेक्षांही अधिक भेसूर आणि गडद आशा निराशेच्या काळोखांत त्याचें मन विलीन होऊन जाई.

अखेर ठरलेली वेळ टळून गेली तरी रूपिणी आली नाहीं अशी जेव्हां त्याची खात्री झाली, तेव्हां त्याच मन पराकाष्टेचें अस्वस्थ झालें. पण करणार काय? ती कां आली नसावी या वि-

षयीं त्याचें मन नानाप्रकारचे तर्कवितर्क करूं लागलें. पण त्यांतील अमुकच मात्र खरा असें त्याला ठरवितां येईना. तिनें आपला ठरलेला बेत फिरविला असावा ही गोष्ट त्यास बिलकुल संभवनीय वाटेना. तिला अजूनपर्यंत संधीच मिळाली नसेल यामुळें तिचें येणें झालें नसावें, असेंच उलट त्यास ठाम वाटत होतें. तथापि न जाणों संधि सांपडल्यास ती अजूनहि येईल अशा प्रकारची आशा मनांत धरून तो दिवस उगवेपर्यंत तिची वाट पाहत राहिला, पण व्यर्थ. फटफटित उजाडलें तरी रूपिणी आली नाहीं. सूर्याच्या किरणजालांनीं पृथ्वीतलावरील सर्व अंधकार नाहींसा केला, तरी त्याच्या अंतःकरणांतील निराशेचा गडद अंधकार मात्र तसाच कायम होता ?

झालेल्या निराशेनें देवदत्ताचें डोकें अगदीं भणाणून गेलें ! पुढें काय करावें हें त्याला बिलकूल सूचेना ! एखादें भयंकर जहर भक्षण केल्याप्रमाणें त्याच्या जिवाची तळमळ होऊं लागली ! अखेर खरा प्रकार काय आहे तो तिला समक्ष भेटूनच विचारावा असा त्यानें निश्चय केला. पण दिवसां गांवांत जाण्यास तोंड नसल्यामुळें त्याला तो सारा दिवस त्या जंगलांतच पशूंच्या सहवासांत काढावा लागला. ठीकच आहे, पशूंच्या सहवासांत एखाद्या नरपशूस राहणें भाग पडलें तर त्यांत वावगें तरी काय झालें ? खरें म्हटलें तर असे नरपशु नेहमींच पशुसंगतींत राहतील तर जगांतील पुष्कळच अनर्थ टळतील.

जरा रात्र पडतांच देवदत्त तेथून जो निघाला तो तडक रूपिणीच्या घरापुढें आला. ती अंधेरी रात्र असून, घरांत समोर कोणीच न दिसल्यामुळें तो चटकन आंत शिरला, व अंगणांतच

असलेल्या एका खोलींत जाऊन लपून बसला. वास्तविक पाहिलें तर प्रस्तुत प्रकार म्हणजे अत्यंत धाडसाचा परकाष्टेच्या निर्लज्जपणाचा होय. पण 'कामातुराणां न भयं न लज्जा' या सुप्रसिद्ध उक्तीप्रमाणें अशीं माणसें खरोखरच पराकाष्टेचीं निर्लज्ज आणि निर्भय बनतात. त्यांना स्वतःच्या प्राणघाताचें देखील भय वाटत नाहीं. केवढा हा कामवासनेचा प्रभाव ? असो.

देवदत्त ज्या खोलींत शिरला ती रूपिणीची निजावयाचीच खोली होती. तो तेथें जाऊन बसतो न बसतो तोंच ती आंथरूण वगैरे घालण्याकरीतां हातांत दिवा घेऊन तेथें आली. तिचा नवरा अजून शेतांतून आला नव्हता. देवदत्तास तेथें असा अवचित पाहून ती मोठ्यानें ओरडणार तोंच त्यानें नाकावर बोट ठेवून तिला चूप राहण्याविषयीं खूण केली.

"अरे देवा !" रूपिणी मनांतले मनांत उद्गारली. "ज्या कर्माला भ्यावें तेंच पुढें करतोस ना ? आतां मी करूं तरी काय ? हा ह्मणतो त्याप्रमाणें मुकाट्यानें बसूं ? कां एकदम आरडाओरड करून याला पळावयाला लावूं ? करूं तरी काय ?" पण तिला यापेक्षां अधिक विचार करावयास लावून कांहीं निश्चित ठरविण्यास त्यानें बिलकुल अवधीच राहूं दिला नाहीं. तो एकदम पुढें येऊन ह्मणाला :—

"रूपिणी, थांब. गडबड करूं नकोस. मला तुझ्याशीं दोन—फक्त दोनच—शब्द बोलावयाचे आहेत. त्यांचें सरळ उत्तर तुजकडून मिळालें ह्मणजे मी येथून मुकाट्यानें चालतां होईन. तुला बिलकुल भिण्याचें कारण नाहीं. पण जर तूं मध्यंतरींच गडबड करशील

किंवा माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर देणार नाहींस तर त्याचा परिणाम उभयतांच्या अब्रूस घातक असाच होईल हें पक्कें लक्षांत असूंदे."

"बोल." रूपिणीच्या तोंडून फक्त एवढाच शब्द बाहेर पडला. तिचें काळीज यावेळीं सारखें धडधड करीत होतें, न जाणों नरक-मार्गापासून नुकतेच परावृत्त झालेलें आपलें मन या पाप्याच्या मोहक भाषणानें पुन्हां तिकडे वळावयाचें, किंवा असा प्रकार न झाला तरी याच्याशीं आपण एकांतांत आहेत, ही गोष्ट आपल्या पतीस आणि सासुसासऱ्यास कळून त्यांच्या मनास पुन्हां निष्कारण दुःख व्हावयाचें अशी दुहेरी धास्ती तिला वाटत होती. पण तिच्या या धास्तीची त्या नीचाला काय परवा असणार? त्यानें मोठ्या अधिकारयुक्त वाणीनेंच तिला विचारीलें:—

"कबूल केल्याप्रमाणें परवां रात्रीं ठरविलेल्या स्थळीं कां नाहीं आलीस?"

"मी तो नरकाचा मार्ग त्याच क्षणीं सोडला!"

"ह्मणजे?"

"मी त्याच वेळीं एका परमपूज्य साधूकडून शीलव्रत घेतलें."

"मी नाहीं समजलों तुझें ह्मणणें."

"नीट ऐक तर" रूपिणी जरा धीट होऊन बोलूं लागली. "त्या-वेळीं दुर्वासनाच्या नरकांत कुजत असणाऱ्या या पापिणीनें पळून जाण्याच्या तुझ्या विचाराला संमति दिली. पण नंतर माझ्या पूर्वपुण्या-ईनें लागलेंच मला एक साधु, साधु कसला साक्षात् ईश्वरच—भेटला, आणि पापसमुद्रांत गटांगळ्या खाणाऱ्या या अभागिनीची त्यास दया येऊन त्यानें आपल्या उपदेशरूपीं हस्तांनीं मला वर ओढलें. त्याच-

क्षणीं असल्या पापांत पुन्हां न पडण्याची, पतिशिवाय अन्य कोण-त्याहि पुरुषाकडे नुसत्या पापदृष्टीनेंहि न पाहण्याची मी शपथ घेतली! आणि त्याप्रमाणें कांहीं झालें तरी आजन्म वागण्याचा माझा निश्चय आहे!"

"रूपिणी, तुझ्या या साऱ्या गप्पा खऱ्या मानण्याइतका मी बावळट आहे असें कां तुला वाटतें?" तो अधम ह्मणाला.—"शिवाय तूं आतां किती जरी पतिव्रतेचें बेमालूम सोंग घेतलें तरी तें जगाला थोडेंच खरें वाटणार आहे? बाकी तूं परपुरुषाकडे न पाहण्याची शपथ घेणें ह्मणजे कुत्रीनें हाडाकडे, जळवेनें रक्ताकडे, किंवा माशीनें मळाकडे न पाहण्याची शपथ घेण्यासारखेंच आहे."

"देवदत्त," त्याच्या या पाजीपणाच्या भाषणानें रूपिणी जरा चिडून ह्मणाली. "माझें भाषण किंवा वर्तन तूं अथवा एकंदर जग खरें मानतें, कीं, खोटें मानतें, हें पाहण्याची मला गरज नाहीं. मी त्याची पर्वाही करीत नाही. माझ्या मनास मी निष्पाप दिसलें ह्मणजे पुरे! अधमा! मजसारख्या जळवा, माशा, किंवा कुत्र्याच काय, पण तुजसारखे सदैव उकिरडे फुंकीत राहणारे लंबकर्णहि त्या महात्म्याच्या दर्शनानें आपला स्वभाव साफ विसरतील!"

ती इतक्या कळकळीनें आणि गंभीरपणानें बोलत होती तरी त्याच्या मनावर त्याचा बिलकुल परिणाम झाला नाहीं. उलट ती आपली थट्टाच करीत असावी असेंच त्याला वाटून, तिचें भाषण संपतांच तिला तो ह्मणाला:—

"पुरे गडे आतां हा विनोद!" एवढें बोलूनच तो थांबला नाहीं, तर तिचा हात धरावयालाहि पुढें सरसावला, त्याबरोबर "हं! खबर-

दार नीचा, माझ्या अंगाला हात लावशील तर!" असे उद्गार रूपिणीच्या तोंडून बाहेर पडले. यावेळीं ती एखाद्या खवळलेल्या वाघिणीप्रमाणें दिसत होती. आणि तिच्या आवाजांतहि एवढा तेजस्वीपणा भरला होता, कीं, इतका पाजी देवदत्त, पण तिला स्पर्श करण्याची त्याची छाती झाली नाहीं. तो लांबूनच तिला ह्मणाला:—

"तर मग तूं बोलतेस ही थट्टा नव्हे तर !"

"मुळींच नाहीं!" नुकतेंच शीलाचें अभेद्य कवच धारण केलेल्या त्या ललनेनें उत्तर दिलें.

"पण मग तूं मला जें वचन दिलें आहेस त्याची वाट काय!"

"त्याची वाट काय असावयाची! तें आपल्या आठवणींतून साफ काढून टाकावें म्हणजे झालें. नीच कार्याविषयीं आजाणपणें दिलेलें वचन त्या कार्याचें नीचत्व कळून आल्यावर पाळणें म्हणजेच महात्पाप होय. याकरितां आपण तें आतां अगदीं विसरून जा!"

"होय. तसें मुद्दां करीन. पण फक्त एका अटीवर." देवदत्त अगदीं शांतपणें म्हणाला.

"ती कोणती?" रूपिणीनें उत्सूकतेनें विचारिलें.

"तुझ्या मधुर प्रेमाचा मला एकादां तरी स्वाद मिळावा हीच."

"हं! असला अभद्र शब्द पुन्हां मजजवळ बोलूं देखील नकोस. तुझ्यासारख्या नीच माणसाना यापुढें माझें दर्शन देखील व्हावयाचें नाहीं हें पक्कें लक्षांत असूं दे."

"रूपिणी! अशी कठोर नको ग होऊंस!" तिच्या हृदयांतील प्रेमाची नाहीं तर दयेची भावना जागृत करण्यानें तरी आपला इष्ट हेतु तडीस जातो कीं, नाहीं हें पाहण्याचें उद्देशानें तो गयावया

करून ह्मणाला. “ तुझ्यावांचून माझी काय अवस्था झाली आहे, याची तुला कल्पना देखील नसेल. पण मी तुला खचीत सांगतों कीं, या दोन दिवसांत जेवण आणि निद्रा हीं मला ठाऊक देखील नाहींत। आणि यापुढें तूं आपला हट्ट जर असाच चालविशील तर एका तरुणाच्या हत्तेचें पाप निःसंशय तुझ्या शिरावर बसेल ! तूं शीलव्रत घेतलें आहेस तर खुशाल घे ? त्याच्या आड येण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं. पण फक्त एकच वेळ माझी इच्छा—”

त्याच्या या लोंचटपणाचा रूपिणीस जास्तच तिटकारा आल्यामुळें ती त्याचें भाषण पूर्ण होऊं न देतां मध्येंच ह्मणाली:—

“ देवदत्त, तुला जें सांगावयाचें तें मी अगोदरच स्पष्टपणें सांगितलें असून तूं पुन्हां आपली तीच फाजीलपणाची बडबड चालविली आहेस याला काय ह्मणावें ? तुला आतां माझें शेवटचें एकच सांगणें आहे कीं, तूं पुन्हां एक अक्षरंहि न बोलतां येथून चालता हो. ”

“हे भूमीवरील अप्सरे ! या दीन दासाला नको ग असा दूर ढकलूं” खुषामतीच्या मात्रेचा थोडासा वळसा तरी लागूं पडतो कीं नाहीं तें पाहण्याचा हेतूनें तो ह्मणाला:—“ रूपिणी ! सुरूपिणी ! आपल्या सौंदर्यानें रतिलाहि लाजविणाऱ्या सुस्वरूपिणी ! तुझ्या आधींच वांकड्या असलेल्या त्या भिवया, आणखी नको ग अधिक वांकड्या करूंस ! आणि त्या अष्टमीच्या चंद्रासारख्या तुझ्या मनोहर कपाळावर तें विशोभित आठ्यांचें जाळेंहि असें नको पसरूंस ! खचित नीलकमलाचें सौंदर्य हरण करणाऱ्या तुझ्या या रमणीय नेत्रांला हें हृदय भेद करणारे तीव्रतर कटाक्ष, आणि कमलगर्भासारख्या नाजुक देहाला हें प्रस्तरतुल्य निष्ठूर हृदय. बिलकुल शोभत नाहीं ! त्याचप्रमाणें निरंतर अमृतरस स्रवणारे तुझे हे ओष्ट त्या

तुझ्या कालकूटस्वरूप वाणीस बाहेर येऊं देण्यास कसे नाखूष आहेत यांकडे थोडेंसें तरी लक्ष दे. सुंदरी, अन्नछत्र ठेवणारा दाता कालें-करून कृपण किंवा दरिद्री बनला तरी त्याची मजल माशीलाही फिरकूं न देण्यापर्यंत जाईल ही गोष्ट शक्यच नाहीं. त्यांतून हें माझें हृदयनिवासिनीदेवते, मी तुला आपलें सर्वस्व समर्पण करीत आहें. आजपर्यंत कोणत्याही भक्तानें आपल्या आराध्यदेवतेस श्रृंगारिलें नसेल, अशा प्रकारच्या सुवर्णरत्नालंकारांनींही मी तुला श्रृंगारीन. इतकेंच नव्हे, तर, तुझ्या प्रसन्नतेसाठी मी आपल्या प्राणाचाही बळी समर्पण करीन!" कोण जाणे त्याचा हा चार्गटपणा आणखी किती लांबतो तो! पण रूपिणीस तो अगदीं असह्य झाल्यामुळें ती मोठ्या संतापानेंच त्यास ह्मणाली:—

"देवदत्त! येथून चालता हो! एक क्षणभरही मजपुढें उभा राहूं नकोस! नीचा! तुझ्या लोचटपणानें, खुषामतीनें, द्रव्याच्या किंवा डागडागिन्यांच्या लालचीनें अगर पाजीपणाच्या कोड्यानें मी पुन्हां त्या दुर्मार्गांत पडेन असें कां तुला वाटतें? आतां या रूपिणीला जगां-तली सारी संपत्ति आपल्या पातिव्रत्यरूपी हिऱ्यापुढें कांचेप्रमाणें वाटत आहे! आणि तिचा पातिव्रत्याचा हिरा हरण करावा ह्मणून जगांतील्या साऱ्या हिऱ्यामाणकांचा ढीग जरी कोणी तिजपुढें केला तरी ती त्यास अश्शी लाथेनें झुगारील!"

यावेळीं रूपिणी आपल्या विचारांत इतकी तन्मय झाली होती, कीं, आपणापुढें खरोखरच कोणी रत्नाचा ढिगारा केला आहे असें तिला वाटून; 'अश्शी लाथेनें झुगारीन' हें वाक्य उच्चारते वेळीं खरोखरच तिनें सपाटून लाथ लगाविली! पण ती कोणत्याहि रत्नांच्या ढिगा-ऱ्याला न लागतां त्या दुर्गुणरूप कोळशाच्या राशीला—देवदत्ताला—

मात्र लागली ! आपल्या भाषणाचे अखेरीस त्यानें तिला जी उपमा दिली होती तीस अनुसरून अभिनय करणेंही जरुर वाटल्यामुळें तो तिजपुढें गुढघे टेंकून बसला होता तो अजूनपर्यंत तसाच होता !

पण तिची लाथ लागतांच तो अतिशय खवळून गेला, आणि संतापाच्या भरांत ताडकन उठून ह्मणाला:

" अग ! हलकट स्त्रिये ! तुझी ऐवढा वेळ विनवणी केली तरी तुला नाहींना द्रव आला ? मला घरादाराचें वाटोळें करावयास आणि सर्वस्वावर पाणी सोडावयास लावून शेवटीं माझी अशी निर्भत्सना करितेस ? अरेरे स्त्रियांची जात खरोखर महा दुष्ट ! महा-अधम ! महापाजी ! महाबेइमान—!"

" चूप ! नीच पुरुषा ! " रूपिणी अतिशय संतापानें मध्येंच ह्मणाली:—"मजसारख्या एखाद्या पापी स्त्रीच्या वर्तनावरून सरस-कट सर्व स्त्रीजातीवर असा निंद्य दोषारोप करूं नकोस ! मजसा-रख्या ज्या पातकी स्त्रिया आहेत, त्यांची तरफदारी करावयाची माझी इच्छा नाहीं. तथापि तुला मी खातरीपूर्वक सांगतें कीं, त्यांच्यापैकीं प्रत्येकीच्या पापप्रवृत्तीच्या मुळाशीं कोणी तरी पुरुषच सांपडेल ! खचित पुरुष जात स्त्रियांविषयीं खरा पवित्रभाव हृदयांत धारण करील तर पाप हा शब्दच स्त्रीवर्गांत सांपडावयाचा नाहीं ! खरोखर त्या महात्म्याच्या हजाराव्या हिशानें जरी एखादा सद्गुणी पुरुष मला आरं-भींच भेटता तर मी दुर्विचारांच्या खोल खड्डयांत अशी बुडाली नसतें ! "

"बस ! बस्स ! रूपिणी, तुझें हें ब्रह्मज्ञान ऐकण्याकरितां मी येथें आलों नाहीं किंवा पुरुषजात पापी कीं स्त्रीजात पापी या वादाशींही मला कांहीं करावयाचें नाहीं. यावेळीं तुझ्या प्रेमानें मी अगदीं वेडा

झालों आहे. मला माझ्या जिवाची देखिल परवा नाहीं! ह्मणून तूं खुषीनें जरी माझें ह्मणणें मान्य केलें नाहींस तरी मी आपल्या सामर्थ्याच्या जोरावर आज आपला इच्छित हेतू तडीस नेल्याखेरीज कधींही राहणार नाहीं!"

"जारे मुडदारा!" रूपिणी त्वेषानेंच ह्मणाली.

"तुझेंच काय पण तुझ्या सारख्या जगांतील एकंदर नीच पुरुषांचें एकवटलेलें सामर्थ्यही आतां या रूपिणीस भ्रष्ट करूं शकणार नाहीं! तूं माझ्या अंगाला नुसतें बोट तर लाव, कीं, तूं नाहीं तर मी या दोघांपैकीं कोणी तरी त्याचक्षणीं गतप्राण झालेलें आढळून येईल!" हें बोलत असतांना तिचें सर्वांग थरथर कांपत असून तिचे डोळे इंगळाप्रमाणें लाल झाले होते!

देवदत्त एवढा पाजीपणांत निढावलेला पण तिची ही घोर प्रतिज्ञा ऐकतांच त्याचें धैर्य डळमळलें. त्याच्या मनांत आतां अनेक विरुद्ध विचार घोळूं लागले. आपल्या हेतूच्या सिद्धीस प्रस्तुत परिस्थिती अगदीं प्रतिकूल आहे असेंही त्यास वाटूं लागलें! शिवाय तिचा नवरा येण्याची तर त्यास क्षणोक्षणीं भीति वाटतच होती! अखेर मागचा पुढचा नीट विचार करून, त्यानें तेथून पाय काढतां घेण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें तो बाहेर पडलाही मात्र जातां जातां "मी आपला हेतू सिद्धीस नेल्याखेरीज कदापि राहणार नाहीं," अशी धमकी तिला देण्यास तो विसरला नाहीं!

# प्रकरण ४ थे.

## एक आणीबाणीचा प्रसंग

देवदत्त रूपिणीस धमकी देऊन गेल्यानंतर त्याची व तिची पुन्हां भेट झाली नाहीं, किंवा त्याचें काय झालें हें ही तिला कळलें नाहीं. मात्र तो धमकी देऊन गेल्यानंतर तिजवर एक चमत्कारिकच प्रसंग येऊन गुजरला.

रूपिणीच्या नवऱ्याचा असा एक नित्यक्रम असे, कीं, प्रहर रात्र टळली ह्मणजे शेतांतून घरीं यावें. आणि पहांटेस कोंबडा आरवतांच पुन्हां शेतास जावें. त्याच्या बायकोच्या वर्तनांत सुधारणा झाल्यापासून तर त्याचा हा निश्चय कधींच चुकला नाहीं. त्याला आतां घरीं येण्याची किती तरी ओढ लागे, आणि केवढा तरी उल्हास वाटे !

गडद काळोख असो, कीं, पर्जन्याची झड लागलेली असो, तो कशाचीही परवा न करितां मोठ्या उत्कंठेनें घराकडे येत असे.

गडद काळोखांत नुकत्याच उज्वल झालेल्या त्याच्या रमणीच्या मुखचंद्राची स्मृति त्यास दीपाप्रमाणें मार्ग दर्शक होई. आणि घरीं आल्यावर तर तिच्या सस्मित मुखांतून निघालेल्या भाषणांनीं त्याचा श्रम शीण नाहींसा होई ! त्याला आपलें घर म्हणजे आतां स्वर्ग वाटूं लागलें !

रमणी ! केवढें हें तुझें सामर्थ्य !

रात्र प्रियपत्नीच्या सहवाससुखांत घालवून पहांटेस पुन्हां नव्या उमेदीनें व उल्हासानें जागृत होऊन शेतास जावें असा त्याचा नित्यक्रम असे.

या क्रमाप्रमाणें तो एके दिवशीं पहांटेस कोंबडा आरवतांच जागा झाला, व शेताकडे जाण्यास निघाला. जाते वेळीं तो आपल्या बायकोस जागें करून जात असे. त्याप्रमाणें आजही त्यानें तिला उठविलें. जागृत होतांच ती त्याजबरोबर अंगणांत आली. पण तेथें येतांच आपला नवरा आज नेहमींपेक्षां फार लौकर शेतांत जात आहे असें तिला दिसून आलें. अशा अपरात्रीं बाहेर जाणें बरें नाहीं असें तिला वाटून, तिनें त्याप्रमाणें त्यास कळविलें. पण ' ही पहाट आहे अपरात्र नाहीं, नुकताच कोंबडा ओरडला होता, तेव्हां भिण्याचें कारण नाहीं, असें त्यानें तिला कळविलें.

" ओरडला असेल मेला कोंबडा ! त्याला काय ? " त्याच्या भाषणानें समाधान न पावतां रूपिणी ह्मणाली. " केव्हां तरी ओरडावयाचें ! पांखराला कांहीं अक्कल का असते ? ".

" वेडी आहेस तूं !" तिचा नवरा ह्मणाला. " पांखरांला कांहीं कांहीं बाबतींत मनुष्यापेक्षांही जास्त अक्कल असते, समजलीस ? आणि त्यांतून कोंबडे तर पहांट झाल्याखेरीज कधींच आरवावयाचे नाहींत. "

"बरें, आपण ह्मणतां तसें असेल. पण मेली माझ्या मनाला थोडी रुखरुख वाटते, तर जरा उशिरां का जाणें होईना ! एखादे दिवशीं झाला तर झाला उशीर. पण गडे ! आतां नाहींच जायचें आँ ! " पतीच्या गळ्यास मिठी मारून त्याच्या तोंडापुढें तोंड नेऊन रूपिणी मोठ्या लडिवाळपणानें ह्मणाली.

"आज काय हा भलताच हट्ट धरिलास तूं?" तिचा नवरा ह्मणाला. "मी जर रोजच्या नियमाप्रमाणें लौकर शेतांत गेलों नाहीं तर सगळ्या कामाचा कसा घोंटाळा उडून जाईल हें तुला समजत नाहीं कां? मी आलों नाहीं असें पाहून गडी माणसें बैलांस चरावयास न नेतां स्वस्थ निजतील, आणि उपाशीं पोटींच त्या मुक्या प्राण्यांस मोटेला जुंपतील. एवढी एकच गोष्ट तूं लक्षांत घेतलीस तरी पुरे आहे."

"बरें तर मग मी आपल्या करितांच ह्मणत होतें." इतकें बोलून तिनें त्याच्या गळ्यांतील मिठ्ठी सोडली.

या वेळीं पत्नीचे प्रेमळ शब्द मोडून जाण्यांत त्यालाही वाईट वाटलें. पण तो कर्तव्यतत्पर शेतकरी होता!

नवरा गेल्यानंतर रूपिणी पुन्हां आपल्या खोलींत येऊन निजली. पण तिला पुन्हां झोंप लागते न लागते तोंच खोलीचें दार वाजलें. त्यासरशीं ती जागी झाली आणि पाहते तों आपला नवरा पुढें उभा. आपण इतकें सांगितलें तरी ऐकिलें नाहीं आणि आतां आपण होऊनच परत यावयाचें कसें झालें याचें तिला मोठें गूढ पडलें. तथापि त्याला पाहतांच ती घाबऱ्या घाबऱ्या उठून उभी राहिली आणि ह्मणाली:—

"मधूनच परत येणें झालें वाटतें? कां बरें कांहीं कमी जास्त तर नाहीं ना झालें बाई? निघते वेळीं मला जी रुखरुख वाटत होती ती उगीच नव्हती तर?"

"छे: छे: कमी जास्त कांहीं नाहीं. तूं उगीच भिऊं नकोस!"

"तर मग मी इतकें सांगितलें तरी ऐकिलें नाहीं आणि आतां कसें परत येणें झालें?"

" तुझ्या करितां ! "

" ह्मणजे ? "

" सांगितलें यांतच समजून घ्यावें ! तुला यापेक्षां कां स्पष्ट सांगावयाला हवें ! अरेरे ! फारच खुळी ! " एवढें बोलून तो खूप मोठ्यानें हंसला.

त्याच्या या हंसण्यानें आणि वरील खोंचदार भाषणानें रूपिणी एकदम दचकली ! आणि तिला कसलासा संशय येऊं लागला ! तिची ही साशंक वृत्ति पाहून त्यानें एकदम तिचा हात धरला आणि ह्मटलें:—

" वेडे ! कसल्या विचारांत पडली आहेस ? चल, उजाडावयाला फारसा अवधि नाहीं मग निःष्कारण फुकट वेळ कां घालवतेस ! "

आतां मात्र तिला ठाम वाटूं लागलें कीं, हा कांहीं अपला नवरा नव्हे. " हा मेला कोणी तरी लफंग्या असावा. " ती स्वतःशींच विचार करूं लागली. " अगदीं तसा तोंडवळा असला ह्मणून काय झालें ? सारख्या तोंडवळ्याची माणसें जगांत नसतात कां ? छेः ते मात्र खात्रीनें नव्हेत. छेः छेः असा फाजिलपणा साऱ्या जन्मांत त्यांच्या ठिकाणीं मला कधीं आढळून आला नाहीं. मग एवढ्या अर्ध्या घटकेंत स्वभावांत असा फरक कसा पडेल ? छेः बाई, इथें कांहीं तरी खास घोंटाळा असावा ! कधीं कधीं स्वर्गांतील देव नानाप्रकारचीं सोंगें घेऊन एखाद्या माणसाच्या व्रताची परीक्षा घेत असतात असें मी ऐकिलें आहे. तेव्हां न जाणों, तशांतलाच कांहीं हा प्रकार नसेलना ! तें कांहींही असो, हा जरी माझा प्रत्यक्ष पती असला तरी मला ज्या अर्थीं तो परकीय पुरुष असल्याविषयीं संशय येत आहे, त्या अर्थीं त्यास आपल्या अंगाला हात लावूं न देणेंच योग

होईल ! मग बेहत्तर आहे तो प्रत्यक्ष पति असला तरी ! यामुळें यांना राग आलाच तर तो मला क्षणभरानें दूर करितां येईल पण जर कां माझें चारित्र्य मलीन झालें तर तें मात्र मला पुन्हां उज्वल करितां येणार नाहीं. ”

हे विचार तिचे मनांत येतांच तिचा कांहीं ठाम निश्चय ठरला आणि त्याबरोबर तिनें त्याच्या हाताला झटका मारून खोलीच्या बाहेर उडी टाकली.

पोट घरीं गाठलेली नरद निसटून जातांच द्युतकाराची जी अवस्था होते तशीच स्थिति रूपिणीच्या नवऱ्याची झाली ! ती तेथून पळालेली पाहतांच त्याच्या अंगाचा भडका झाला ! दुःखानें, त्वेषानें आणि पश्चात्तापानें त्याचें डोकें फिरून गेलें ! तथापि आपले हे सर्व मनो-विकार आवरून तो तिच्या पाठोपाठच धांवला !

रूपिणी खोलीच्या बाहेर पडतांच सासुसासऱ्याच्या शय्यागृहांत शिरली, इतक्यांत हाही तेथें घुसून तिचें मणगट धरून तिला बाहेर ओढूं लागला. कधींच नाहीं आणि आजच आपला मुलगा इतका अमर्यादशील कसा बनला याचें त्या वृद्ध जोडप्याला मोठें गूढ पडलें ! बाकी तो आपला मुलगा नसेल अशी नुसती शंका घेण्याचें देखील त्यांस कांहीं कारण नव्हतें !

“ झाला असेल दोघांचा कांहीं तरी प्रेमकलह. पोरांची जात तर आहे ! ” असा विचार त्या उभयतांच्या मनांत येऊन, त्यांनीं रूपि-णीला त्याजबरोबर जावयास सांगितलें. पण यावर ती लागलेंच ह्मणाली–“ सासुबाई ! इथें कांहीं तरी दगा आहे खास. तुह्मी बरें ह्मणा कीं वाईट ह्मणा, पण या माणसास कांहीं मी आपल्या अंगाला हात लावूं द्यावयाची नाहीं ! मग तुह्मी साऱ्यांनीं मिळून

माझा जीव घेतला तरी बेहत्तर !" आतां तिचा संशय अधिकच दृढ झाला.

तिचें हें भाषण ऐकून त्या वृद्ध जोडप्याचा अगदीं निरुपाय झाला. तिच्या या ह्मणण्यांत त्यांना निदान वाईट असें कांहीं दिसलेंच नाहीं. शिवाय त्या गृहस्थाच्या उद्धटपणावरून त्यांनाही आपल्या सुनेप्रमाणेंच त्याजविषयीं संशय येऊं लागला होता.

पण रूपिणीच्या या वर्तनानें तिच्या नवऱ्याची–निदान रूपिणीच्या मताप्रमाणें तिच्या नवऱ्याचें हुबेहुब रूपांतर केलेल्या त्या गृहस्थाची मात्र, तळव्याची आग मस्तकास गेली आणि त्याभरांत त्यानें ताडदिशीं तिच्या तोंडांत लगाविली ! त्या सरशीं रूपिणीस चक्कर येऊन ती खालींच पडली ! त्या नराधमानें एवढ्यावर तरी गप्प बसावयास पाहिजे होतें ! पण त्याचा भडकलेला कामाग्नि तसें कोठून होऊं द्यावयाला ? तो तिला फरफटतच आपल्या शय्यागृहाकडे ओढून नेऊं लागला ! मग मात्र त्या वृद्ध जोडप्यास दम निघेना ! त्यांनीं ताबडतोब पुढें होऊन तिला तसें ओढून न नेण्याविषयीं त्यासच अडथळा केला. यावेळीं त्या तरुणास त्यांच्याविषयींहि इतका राग आला, कीं, त्यांचीहि चांगलीच कणिक मऊ करावी असें त्यास वाटलें. पण असें करणें आपल्या पुत्रत्वास शोभणार नाहीं असा शहाणपणाचा विचार ताबडतोब त्याच्या मनांत येऊन, त्यानें त्यांच्याशीं गोड बोलूनच आपलें कार्य सिद्धीस नेण्याचा प्रयत्न चालविला.

या युक्तीनें तो विजयी होणार इतक्यांत हुबेहूब त्याच्यासारखाच आणि त्याच्या इतक्याच वयाचा दुसरा एक तरुण तेथें येऊन दाखल झाला ! त्याबरोबर या पहिल्या तरुणाची जी त्रेधा उडाली तिचें यथार्थ चित्र रेखाटणें अशक्य आहे, तरी त्यानें आपले मनोविकार बाहेर न दिसूं देण्याची पराकाष्ठेची खबरदारी घेतली होती.

हा मागून आलेला तरुण तर नुसता संतापानें लाल झाला होता; आंत येतांच रूपिणीचें मणगट धरलेल्या त्या तरुणास 'माझ्या बायकोचें मणगट धरणारा तूं चोर कोण ?' असें ह्मणून त्यानें एक जोरानें गचांडी दिली. त्याबरोबर 'माझ्या घरांत शिरून माझ्या बायकोला आपली बायको ह्मणणारा आणि मला गचांडी देणारा तूं चोर कोण ?' असें ह्मणून त्या पहिल्या तरुणानेंहि या मागून आलेल्या तरुणास जोरानेंच गचांडी दिली.

त्या दोघांची याप्रमाणें हमरातुमरी चालली असतांना बिचाऱ्या आईबापांच्या जिवाची मात्र त्रेधा उडाली ! त्यांना आपला खरा मुलगा कोणता हेंच समजेना; त्यांच्या दांडगाईनें रूपिणीहि शुद्धीवर आली. पण तिचीहि आपल्या सासुसासऱ्याप्रमाणेंच अवस्था झाली. आपला नवरा कोणता हें तिलाही ओळखतां येईना ; मात्र आपला संशय खरा ठरला आणि आपण एका अट्टल बदमाषाच्या कारस्थानांतून बचावलों याबद्दल तिला समाधान वाटलें. पण तिचें हें समाधान फार वेळ टिकलें नाहीं, कारण तिजवरील संकट अजून मुळींच नाहींसें झालें नव्हतें. इतकेंच नव्हे, तर त्याचें भयंकर स्वरूप अजून प्रकट व्हावयाचें होतें यांतून आपण आपल्या पतीसह धडपणें कसें सुटूं हाच एक विचार तिचें देहभान नाहींसें करण्यास पुरेसा होता.

# प्रकरण ५ वें

## मग खरा नवरा कोण ?

त्या दोघांचा याप्रमाणें बराच वेळ झगडा चालला तरी त्यापैकीं कोणीच हार जाण्याचें चिन्ह दिसेना ! किंवा त्यापैकीं कोणीच आपण लबाड आहों हें कबूल करीना ! यामुळें तर त्या म्हाताऱ्या आईबापांच्या जिवांची खूपच त्रेधा उडाली. या कारस्थानामुळें आपण आपल्या खऱ्या मुलास खरोखरच मुकूं कीं काय, अशी त्या बिचाऱ्यांस धास्ती पडून तीं मोठमोठ्यानें रडूं लागलीं ! रूपिणीचीही तीच अवस्था झाली !

यावेळीं चांगलें उजाडलें असल्यामुळें त्यांच्या या रडण्या ओरडण्यानें शेजाऱ्यापाजाऱ्यांची व तमासगिरांची तेथें बरीच दाटी झाली होती !

पण त्या तरुणांच्या भांडणाचें कारण आणि त्या उभयतांचे चेहरे आवाज, वय, आणि पोषाख यांचा सारखेपणा बाटून त्यांचीही अक्कल गुंग होऊन गेली ! आईबापाला किंवा बायकोला जेथें आपला मुलगा किंवा नवरा कोणता हें ओळखतां येईना तेथें इतर जनांची काय कथा !

लोकांनीं त्या दोघांना नाना प्रकारचे प्रश्न विचारिले, पण ते दोघेही रूपिणीवर आपला सारखाच हक्क तितक्याच जोरानें सांगूं लागले. आणि दोघेहि एकमेकांस चोर व तोतया ह्मणूं लागले.

'अगोदर आलेला. व 'मागून आलेला. हें एक त्या दोघांत भेद पाहण्याचें साधन होतें. पण उभयतांच्या मारामारींत आणि ढकलाढकलींत तेंहि नष्ट झालें होतें.

झालें, अखेर जमलेल्या तमासगिरांपासून रूपिणीचा खरा नवरा कोणता हें ओळखून काढण्यास तर कांहीं सहाय्य झालें नाहीं, पण उलट तिच्या संबंधींच्या कुत्सित टीकेला मात्र ऊत आला.

खरोखर कावळा जसा व्रणासाठीं तसा समाज दुसऱ्याच्या व्यंगासाठीं नेहमीं टपून बसलेला असतो. आणि एकदां त्यास तें सांपडलें म्हणजे त्याला आपण अगदीं कृतार्थ झाल्यासारखें वाटतें. त्यांतून त्या व्रणाचा संबंध स्त्रियांशीं असेल तर त्याच्या आनंदाला पारावारच उरत नाहीं.

रूपिणीनें शीलव्रत घेतल्यापासून ती त्या गांवांतल्या कुत्सित मंडळीच्या बेमुमार टीकेला आधींच पात्र झाली होती. त्यांना तिचें तदनंतरचें शुद्ध वर्तन ह्मणजे नुसतें ढोंग वाटत होतें, आणि पुन्हां त्यांतच ही भानगड उपस्थित झाल्यामुळें तर त्यांना चांगलेंच फावलें. त्यांनीं या प्रकरणाशीं तिचा नसतां संबंध जोडून तिजवर वाटेल तसली कुत्सित टीका करावयास आरंभ केला. "आपल्या शीलव्रताचा बिघाड होऊं नये म्हणून नवऱ्याच्या, एक समयावच्छेदेंकरून अनेक आवृत्त्या निर्माण करण्याची ही रूपिणीचीच शक्कल असावी!" एवढें एकच वाक्य त्या टीकेचा मासला ह्मणून पुरें आहे!

चुकलेल्या माणसास सुधारावयाचें तर एका बाजूला राहो, पण तें आपण होऊनच सुधारणेच्या मार्गाला लागलें असलें तरी त्याची पहिली चूक पुनःपुन्हां त्याच्या डोळ्यापुढें धरून समाज त्यास सळो कां पळो करून कसा सोडितो, आणि या दुसऱ्या अवस्थेपेक्षां

आपली पहिली पतितावस्थाच त्यास शतपट सुखावह भासावयास कशी लावितो हें रूपिणीच्या वरील उदाहरणावरून चांगलें लक्षांत येईल. असो, रूपिणीला असली असह्य टीका सहन करण्याचे तेव्हांपासून अनेक प्रसंग आले होते, पण ती तिजमुळें बिलकुल डगमगली नाहीं, किंवा आपल्या निश्चित मार्गापासून ढळली नाहीं !

रूपिणीच्या निग्रहाबद्दल वाचकांस आश्चर्य वाटेल, पण तिच्या स्वभावांत असलेल्या एका विशेष गोष्टीकडे लक्ष दिलें तर तसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. मनोवृत्तीचा उत्कटपणा हेंच तिच्या स्वभावांतील विशिष्टत्व होय. अशा स्वभावाचीं माणसें नेहमीं या नाहीं तर त्या टोंकावर असावयाचीं. मधल्या स्थितींत तीं असणें केवळ दुर्मिळच; दुर्गुणांत रत झालीं तर पराकाष्टेची दुर्गुणी होतील, सद्गुणाकडे वळल्यास त्याचें शिखर गांठल्याखेरीज रहावयाचीं नाहींत.

असो प्रस्तुत भानगड ह्मणजे रिकामटेकड्या स्त्रीपुरुषांना करमणुकीचें व मौजेचें एक खमंग पक्वान्नच झालें; व त्याचा यथेच्छ स्वाद घेण्याकरितां तशा प्रकारची पुष्कळ मंडळी तेथें जमली सुद्धां. पण त्यामुळें या संकटांत सांपडलेल्या माणसांला उलट त्रास कसा झाला हें वरील वर्णनावरून लक्षांत येईलच. अखेर त्यांतल्या कांहीं सभ्य माणसांनीं राजदरबारांत जाऊन या प्रकरणाचा निकाल करून घेण्याविषयीं त्या दोघां तरुणांस आणि रूपिणीच्या सासुसासऱ्यास सूचना केली, आणि तदनुसार ते राजसभेस गेले.

त्या विलक्षण खटल्याची हकीकत ऐकून आणि त्या दोघां तरुणांस पाहून **श्रेणिकाच्या** दरबारांतील मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. यावेळीं न्यायाधिशाचे जागीं नुकतीच **युवराज अभयकुमारा**ची नेमणूक झाली होती. मागें अशाच प्रकारच्या एक दोन विलक्षण खट-

त्यांत अभयकुमारानें आपलें अलौकिक न्यायचातुर्य प्रकट करून त्या प्रकरणांतील सत्य बाहेर काढावयास **श्रेणिक**महाराजास सहाय्य केलें असल्यामुळें त्यास हें महत्वाचें पद प्राप्त झालें होतें.

तथापि या खटल्याची हकीकत ऐकून त्याचीही अक्कल गुंग होऊन गेली. त्यानें त्या दोघांहि तरुणांची कसून तपासणी केली व इतर बऱ्याच माहितगारांच्या साक्षी घेतल्या, तरी रूपिणीचा नवरा कोण हें त्याच्या बिलकूल लक्षांत येईना.

या वैचित्र्य पूर्ण जगांत केवळ जन्मतांच दोन माणसांचे चेहरे सारखे असणें ही गोष्ट केवळ असंभवनीय आहे, या विषयीं त्याला बिलकुल शंका नव्हती; आणि या दोघांपैकीं कोणी तरी एक लबाड असला पाहिजे ही गोष्ट तर अगदीं उघडच होती. तथापि यापैकीं लबाड कोण आणि त्याची ही लबाडी बाहेर काढावी कशी हें काय तें मोठें गूढ होतें, आणि पुष्कळ विचार केला तरी तें कसें उलगडावें हें त्याला सूचेना.

रूपिणीचें पूर्वीचें दुषणास्पद वर्तन आणि त्याप्रमाणेंच मागाहून तिच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली अढळ सद्गुणप्रीति या दोहोंचीही माहिती त्यास बऱ्याच साक्षीदारांकडून झाली होती. कांहीं साक्षी-दारांनीं तर तिची ही सद्गुणप्रीति ह्मणजे निवळ ढोंग आहे असें त्यास भासवून त्याचे मन तिजविषयीं कलुषित करण्याचा प्रयत्न केला होता पण तो सफल झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या मनांत उलट तिजविषयीं आदर वाटूं लागला आणि तिच्या या नूतन विशुद्ध प्रवृत्तीस पोषक असाच न्याय आपल्या हातून तिला मिळावा अशी तो मनांतल्या मनांत परमात्म्याची प्रार्थना करूं लागला. खचित सद्गुणास त्याच्यापेक्षां कमी चाहणाऱ्या अशा एखाद्या

न्यायाधिशाकडे जर प्रस्तुतचा खटला जाता तर रूपिणीच्या पूर्व चरिताकडे लक्ष देऊन त्याला कोणी तरी एखादा तिचा नवरा ठरविण्यास त्यानें फारसा उशीर लाविला नसता.

नंतर अभयकुमाराच्या डोक्यांत एक विलक्षण कल्पना येऊन, त्यानें त्या दोघांसहि दोन निरनिराळ्या खोल्यांत कोंडून ठेविलें, आणि त्यांस 'जो यांतून आपोआप बाहेर येईल तोच-रूपिणीचा खरा नवरा समजला जाईल' अशा प्रकारची सूचना दिली.

न्याय करण्याची ही अजब तऱ्हा पाहतांच त्यां दोघांपैकीं एक जणाची तर कंबरच खचली आणि तो मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "महाराज ! असाच जर आपला न्याय असेल तर त्याचा हा तमाशा तरी कशाला उगीच करितां ! हाय रे दैवा ! हा श्रेणिकाचा मुलगा मोठा न्यायी ह्मणून सगळें जग वाहवा करीत आहे, पण त्याच्या न्यायाचा मासला हा असा ? अथवा त्याच्याकडे तरी काय दोष ? मीच जन्माचा कपाळकरंटा ? सोड, राजपुत्रा, मलाच येथून काळें करूं दे. ह्मणजे तुला न्यायाचा असा अजब तमाशा करण्याची तरी यातायात पडणार नाहीं." तो हें बोलणें बोलत असतांना त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. तो यापुढें आणखीही कांहीं बोलणार होता, पण मग तसें करण्यास शिपायांनीं त्यास मनाई केली.

पण जी गोष्ट एकास दुःखप्रद झाली तीच दुसऱ्यास अत्यंत आनंदकारक वाटूं लागली. या अटीनें त्यास एवढा हर्ष झाला, कीं, त्याच्या भरांत 'आतां रूपिणी माझी, आतां रूपिणी माझी, असें ह्मणत नुसता नाचूं लागला.

त्याचें प्रत्यक्ष नृत्य जरी दरबारांतील मंडळीस दिसलें नाहीं तरी त्याचे वरील विजयदर्शक उद्गार मात्र सर्वांस ऐकावयास आले.

खरा प्रकार काय आहे तो याप्रमाणें बाहेर पडला. वास्तविक पाहिलें तर याच वेळीं या प्रकरणाचा अखेर निकाल करावयास अभय-कुमारास कांहीं हरकत नव्हती. कारण त्याच्या प्रमाणेंच दरबारांतील इतर चाणाक्ष लोकांसही रूपिणीचा खरा नवरा कोण हें आतां स्पष्ट कळून आलें होतें. पण आपल्या न्यायांतील सत्याचा प्रकाश अगदीं मठ्ठ माणसाच्याहि डोक्यांत पडावा, अशीच अभयकुमाराची नेहमींची न्याय करावयाची पद्धत असल्यामुळें या खेपेसही त्यानें तिचाच अव-लंब केला.

याप्रमाणें थोडा वेळ गेला नाहीं तोंच खोलींत कोंडून ठेविलेल्या त्या दोघांपैकीं एकजण अगदीं अचानक बाहेर आला !

हा विलक्षण प्रकार पाहतांच सगळें सभागृह क्षणभर आश्चर्यानें थक्क होऊन गेलें ! पण त्याबरोबरच रूपिणीचा खरा नवरा कोण आणि कांहीं अलौकिक सामर्थ्यानें त्याचें हुबेहुब स्वरूप घेतलेला तोतया कोण, हें तेथें जमलेल्या सर्व सभासदांच्या लक्षांत येण्यास उशीर लागला नाहीं.

# प्रकरण ६ वें.

## देवदत्ताचा कबुलीजबाब !

तो तरुण बाहेर येतांच अभयकुमारानें 'ठेवा या हरामखोराला पकडून!' अशी एकदम गर्जना केली. त्याबरोबर त्यास चतुर्भुज केलें. नंतर अभयकुमार त्याजकडे वळून अत्यंत शांतपणानें ह्मणाला:—

"तरुण गृहस्था! तुला अजूनही जर मजकडून दयेची अपेक्षा करावयाची असेल तर, आपलें खरें स्वरूप प्रगट करून आपली खरी हकीकत काय असेल ती सांग."

आतां आढेवेढे घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें त्या तरुण गृहस्थास कळून चुकलें! आपण संपादन केलेल्या अलौकिक सामर्थ्याच्या जोडीस खरी अक्कल थोडीशी जरी आपल्या अंगांत असती—त्या खोलींतून बाहेर निघण्याचा अशाप्रकारें मूर्खपणा केला नसता—तर रूपिणीच्या प्राप्तीची कांहीं तरी आशा होती. निदान आपणास खोटें ठरविण्याची तरी या न्यायाधिशाची प्राज्ञा नव्हती. पण आतां त्याचा काय उपयोग? आतां आपलें पहिलेंच ह्मणणें कायम ठेवणें ह्मणजे जास्त गोत्यांत येणें होय! त्यापेक्षां यांना सगळी खरी खरी हकीकत सांगून यांच्या दयेचीच अपेक्षा करावी, हें उत्तम."

असा विचार करून, त्यानें आपल्या तोंडांतून एक गुटिका काढून ती अभयकुमारापुढें ठेविली. पण त्याबरोबर जो विलक्षण चमत्कार घडून आला त्यामुळें तर सर्व सभासद नुसते आश्चर्य समुद्रांतच बुडून गेले! त्या तरुणाचें एकदम रुपांतर होऊन तो सर्व नगरवासी लोकांस परिचित असलेला 'देवदत्त' बनला!

वाचक हो! या तरुणाचें मूळ रूप हेंच! आणि हा दुसरा तिसरा कोणी नसून तिसऱ्या प्रकरणांत रूपिणीला धमकी देऊन नाहींसा झालेला आपल्या अत्यंत परिचयाचा तो देवदत्तच. यानें एवढी अलौकिक करामत कोठें आणि कशी संपादन केली हें पुढील हकिकतीवरून आपणास समजेलच.

सर्व सभागृह शांत झाल्यानंतर त्यानें आपली हकीकत सांगावयास प्रारंभ केला. प्रथम रूपिणीची आपली रानांत अवचित भेट कशी झाली व त्यानंतर कबूल केल्याप्रमाणें ती आपणाकडे न आल्यामुळें, तिच्या घरीं जाऊन आपण तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला पण तो कसा निष्फळ झाला, ती सारी हकिकत सांगून तो पुढें ह्मणाला:—

"तिनें अशा प्रकारें माझा मनोभंग केल्यानंतर तर मला तिच्या प्राप्तीविषयींचें वेडच लागून गेलें! मी पुढें अनेक प्रयत्न केले, पुष्कळ मध्यस्थ स्त्रियांना तिचें मन वळविण्यासाठीं प्रयत्न करावयास लाविलें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं! उलट त्या हलकट स्त्रियांनीं माझे पैसे मात्र बरेच लांबविले! अखेर जारणमारणादि विद्या संपादन करून रूपिणीला वळणीवर आणावें, किंवा एखादा वशीकरण मंत्र साध्य करून घेऊन तिला आपलीशी करावी असा मी निश्चय केला!

पण या कामांतही माझी बरीच निराशा झाली! लफंग्या पंचाक्षऱ्यांनीं, आणि लुच्चा गोसावड्यांनीं गोड गोड थापा मारून मला बरेंच नागविलें! आणि घरदार विकून जो पैसा मी गोळा केला होता त्यांपैकीं त्यांनीं बराच लंबा केला! तथापि इतकें झालें तरी रूपिणीला वश करून घेण्याचा माझा नाद मात्र बिलकुल कमी झाला नाहीं!

या कामीं शारीरिक त्रास तरी मला किती सोसावा लागला म्हणून सांगू! अशा प्रकारची विद्या जाणणारा मनुष्य अमुक ठिकाणीं राहतो असें मला कळलें, कीं, मी थंडी उन्ह न पाहतां तेथें जावयाचाच! मग पुढें कांहींही होवो!

" बरें, मांत्रिकांस गांवोंगांव शोधित फिरण्याचा एवढाच त्रास मला भोगावा लागला असें नाहीं, तर ही विद्या साध्य होण्याकरितां निरनिराळे मांत्रिक जीं निरनिराळीं किंवा तींच तींच साधनें मला करावयास सांगत, तीं करीत असतांना तर नुकत्याच सांगितलेल्या त्रासापेक्षां किती तरी भयंकर त्रास मला सोसावा लागे!"

कोणीं नदींत गळ्याइतक्या पाण्यांत बसून मंत्रसाधन करावयास सांगत, तर कोणी स्मशानांत नग्न उभे राहून साधन करावयास सांगत! कोणाच्या साधनास झाडास उलटें टांगून घेण्याची अवश्यकता असे, तर कोणी एखादा भलताच घाणेरडा पदार्थ खावयास सांगे! ग्रहण अमावास्यांनींयुक्त शनिवार म्हणजे या साधनांचा शुभवार आणि उत्कृष्ट मुहूर्त म्हणजे रात्रीचे बारा हीं अगदीं ठरलेलीं असावयाचीं! कार्यनाशक म्हणून ज्याविषयीं ज्योतिर्विदांची ठाम समजूत तोच मुहूर्त अगदीं उत्कृष्ट म्हणून पंचाक्षरांची पक्की खात्री. ज्या मुहूर्तावर ज्योतिषांची विद्या मरावयाची त्याच मुहूर्तावर पंचाक्षऱ्यांची जिवंत व्हावयाची!

"पण मी हे सर्व पंचाक्षरीय मुहुर्तेही बरोबर साधले पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं! उलट माझी फजिती व हाल मात्र बरेच झाले!"

"या साधनासाठीं रात्रीं फिरत असतांना कैक वेळां चोर समजून पुष्कळ लोकांच्या हातचा मला खरपूस मार खावा लागला. आणि नदींत गळ्याइतक्या पाण्याचा शोध करितां करितां कधीं कधीं त्याच्या तळाशींच जाण्याचा प्रसंग आला. एखादे वेळीं नदींत उभें राहून मंत्रोच्चाराकरितां ह्मणून तोंड उघडावें, तोंच त्यांत पाणी शिरून तें कायमचें बंद होण्याचा प्रसंग यावा! याशिवाय घंटेच्या घंटे अशा प्रकारें थंड पाण्यांत घालविल्यानें हींवतापानें महिनेच्या महिने अंथरुणावर खिळून राहण्याचे प्रसंग येत ते निराळेच!"

"एकदां अशाच एका साधनासाठीं एका झाडाला टांगून घेत असतां उलट तेंच माझ्या अंगावर आलें. मग मला कोठें कळलें कीं, आपण ज्यास टांगून घेत होतों तें झाड फारच कोवळें आहे."

"तथापि एकदां एका स्मशानांत मजवर जो प्रसंग गुदरला, तो फारच भयंकर होता! त्याचें स्मरण झालें ह्मणजे माझ्या अंगावर अजूनही कांटा उभा राहतो. अमावास्येची रात्र होती आणि साधन उताणे निजून करावयाचें होतें. मंत्रोच्चार करावयाचा तो मनांतल्यामनांत, आणि वाटेल तें झालें तरी तोंडांतून 'ब्र' ह्मणून काढावयाचा नाहीं, असा आमच्या पंचाक्षऱ्यांचा सक्त हुकूम. झालें! याप्रमाणें मी साधनास आरंभ करून कांहीं थोडा वेळ लोटला नाहीं तोंच त्या गांवांतील कांहीं मंडळींनीं तेथें एक प्रेत दहन करण्याकरितां आणिलें. अंधारामुळें त्या लोकांस मी प्रथम दिसलों नाहीं! पण पुढें त्यांनीं पेटविलेल्या चिताग्नीचा प्रकाश जेव्हां चोंहींकडे पसरला

